गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते ।

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक १५ वें,

# राजा तोडरमल.

लेखक—'शांताराम.'

[ प्रथमावृत्ति ]



मुंबई,

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी.

सप्टेंबर १९०५.

PRINTED AT THE 'NIRNAYA-SAGAR' PRESS,

Bombay.

# अनुक्रमणिका.

## प्रकाशकांचे दोन शब्द.

प्रस्तुत पुस्तक प्रसिद्ध बंगाली लेखक श्रीयुत रमेशचंद्र दत्त I. C. S., C. I. E. यांच्या 'बंगविजेता'नामक लोकप्रिय कादंबरीचें भाषांतर असून तें आमचे मित्र 'शांताराम' यांच्या प्रथम प्रयत्नाचें फळ आहे.

मूळ बंगाली पुस्तकाचीं एकंदर ३५ प्रकरणें आहेत; परंतु मूळपुस्तकांतील पहिल्या प्रकरणाचीं आम्हीं 'प्राक्कथन' आणि 'रुद्रपुरास आगमन' अशीं दोन निरनिराळी प्रकरणें केलीं आहेत; त्याचप्रमाणें प्रस्तुत पुस्तकांतील 'मित्रस्मरण' (प्र. २५) आणि 'अपरिचित शत्रु व परिचित मित्र' (प्र. २६) हीं दोन प्रकरणें मूळपुस्तकांत 'राजा तोडरमल्ल' (प्र. १४) या प्रकरणापुढें दिलीं आहेत; परंतु तीं २४ व्या प्रकरणापुढें दिल्यानें सुसंगत दिसतील असें वाटल्यावरून तशी योजना केली आहे.

**मनोरंजक ग्रंथप्रसारकमंडळीचें ऑफिस, गिरगांव-मुंबई,**
ता. ३० सप्टेंबर, १९०५.

**काशीनाथ रघुनाथ मित्र,**
व्यवस्थापक म. ग्रं. प्र. मंडळी.

# राजा तोडरमल.

## प्रकरण १ लें.

### प्राक्कथन.

बंगाल व बहार देश, इ० स० १२०४ सालापर्यंत हिंदु राजांच्या अमलाखालीं होता. परंतु पुढें हिंदुराजांस हुसकावून लावून पठाण लोकांनीं हा प्रांत बळकाविला व इ० स० १५७४ सालापर्यंत, म्हणजे सुमारें ३७० वर्षें, या प्रांतावर आपला अंमल गाजविला. हे पठाणलोक वेळप्रसंग पाहून दिल्लीच्या बादशहाचें मांडलिकत्व कबूल करीत व इतर वेळीं बहुतेक स्वतंत्रपणेंच राज्यकारभार पहात असत. युरोपांतील 'फ्युड्ल सिस्टीम'सारखीच बहुतेकांशीं यांची राज्यपद्धति होती. राजगादी रिकामी पडतांच केव्हां केव्हां गादीचा वारस राजपुत्र तिच्यावर आरोहण करी, तर केव्हां केव्हां एखादा बलिष्ठ सेनापतीच ती पटकावून बसे. राज्यांतील एखाद्या उत्कृष्ट प्रांताचें स्वामित्व राजाकडे राहून इतर जिल्ह्यांवर मुख्यमुख्य सरदारांची सत्ता असे. हे सरदारहि आणखी आपापल्या जिल्ह्यांची विभागणी आपल्या ताब्यांतील कामदारांत करीत. हे सरदार लोक प्रसंगानुसार बंगालच्या राजाची ताबेदारी मान्य करीत तर केव्हां केव्हां स्वतंत्रपणेंहि वागत असत. सारांश, 'मारील त्याची तरवार' असाच या वेळीं बहुतेक प्रकार असे.

पठाण लोकांच्या कारकीर्दीत हिंदु जमीदार वर्गाच्या ठायीं बरेंच सामर्थ्य आणि सत्ता असे. एवढी कीं, बंगाल्यांतील पठाणराजांमध्यें आपल्याला एका हिंदु राजाचेंहि नांव आढळून येतें. पूर्वी एक साधारण जमीदार असलेल्या गणेशराजानें आपल्या बाहुबळावर इ० स० १३८५ सालीं बंगालची राजगादी प्राप्त करून घेतली व सात वर्षें-पर्यंत निर्विघ्नपणें राज्यशकट हांकिला. त्याच्या मुलानें पुढें मुसलमानी

धर्माची दीक्षा घेतली; तथापि गणेशराजाच्या वंशानें एकंदर ४० वर्षे बंगालदेशचें राज्य केलें.

पुढें मोंगलांनीं बंगाल प्रांत काबीज केला त्या वेळीं या हिंदु जमीदारांजवळ आठ लक्ष पायदळ, तेवीस हजार घोडेस्वार आणि चार हजार लढाऊ जहाजें, एवढी सैन्यसामुग्री होती. जमीदार लोक बहुतेक कायस्थ ज्ञातीचे असून वास्तविक म्हटलें तर तेच बंगालचे खरे राजे होते. देशांतील शेतकरी आणि प्रजाजन पूर्णपणें या जमीदारांच्या अंकित असत. प्रजेमधील फिर्यादीअर्यादी, तंटेभांडणें यांचा निकाल हे जमीदार लोक किंवा जमीदारांनीं नेमलेले प्रतिनिधीच करीत. चोर, लुटारू व इतर गुन्हेगारांचा बंदोबस्त करणें, त्यांनां शासन करणें, त्याचप्रमाणें गांवोगांवीं शांतता ठेवणें, लोकांच्या हिताहिताकडे पहाणें, इत्यादि कामें हे जमीदारच करित असत. जमीदार लोक हेच प्रजेचे पालनकर्ते, न्यायकर्ते, रक्षणकर्ते आणि राजे होते. सारांश, पठाणादिकांच्या कारकीर्दींत खरें ह्मटलें तर बंगाल्यांत जमीदारांचीच सत्ता होती.

शेवटचा पठाण राजा दाऊदखान गादीवर बसला त्याच्या दुसऱ्याच वर्षी, ह्मणजे इ० स० १५७४ सालीं अकबरानें बंगालदेशावर स्वारी केली. अकबरबादशहानें स्वतः पाटणानगर हस्तगत करून मनाईमखानाची मुख्य सेनापतीच्या जागी नेमणूक केल्यावर तो दिल्लीला परत गेला. मनाईमखान हा आपला नांवालाच सेनापति होता. खरें ह्मटलें तर क्षत्रियचूडामणी राजा तोडरमल्ल यानेंच पठाणांपासून बंगालदेश जिंकून घेतला होता. दाऊदखानाचा वेळोवेळीं पराभव करून राजा तोडरमल्लानेंच शेवटीं कटकच्या घनघोर महायुद्धांत जयप्राप्ति मिळविली. दाऊदखान भयभीत होऊन दांतीं तृण धरून तोडरमल्लाला शरण आला व त्यानें तह करून फक्त ओरिसा प्रांताचें तेवढें स्वामित्व आपल्यापाशीं ठेवून बाकी बंगाल आणि बहार हे दोन्ही प्रांत मोंगलांच्या स्वाधीन केले. तहाप्रमाणें सर्व व्यवस्था लाविल्यावर राजा तोडरमल्ल

दिल्लीला परत गेला; परंतु तोडरमल्ल दिल्लीला जातांच दाऊदखान तहाच्या सर्व अटी विसरला व त्यानें बंगाल प्रांत पुनः आपल्या ताब्यांत आणिला. पुढें १५७६ सालीं अकबरबादशहानें हुसेन कुलीखानाला सेनापतीच्या जागीं नेमून दाऊदखानाचें पारिपत्य करण्यास पाठविलें. हे हुसेन कुलीखानहि मनाइमखानाचेच बंधु होते! राजा तोडरमल्लालाहि बरोबर पाठविलें होतें. तोडरमल्लानें दुसऱ्यांदा बंगाल प्रांतावर स्वारी करून राजमहालच्या भारती युद्धांत दाऊदखानाचा पूर्ण पराभव केला व त्याला समरभूमीवर कायमचें निजविलें. याप्रमाणें सर्व बंगालदेश मोंगलांच्या ताब्यांत आल्यावर अकबर बादशहानें हुसेन कुलीखानाला या प्रांताचा सुभेदार नेमिलें आणि तोडरमल्ल पुनः दिल्लीस गेला.

१५८० सालीं बंगाल्यांत पुनः भयंकर बंडाळी माजली. हें बंड बाहेरचें नसून घरांतलेंच होतें. अकबरानें नेमिलेला खुद्द मोंगल सेनापति आणि दुसरेहि कित्येक मोंगल सरदार यांनींच हें बंड उभारिलें होतें. अकबर हा मोठा बुद्धिमान्, धोरणी आणि दूरदर्शी बादशहा होता. ज्या हिंदुसरदारानें दोन वेळ मोठ्या निकरानें लढून पठाण शत्रूचा निःपात केला व बंगाल्यांत मोंगलांची सत्ता प्रस्थापित केली, त्या राजा तोडरमल्लाशिवाय दुसऱ्या कोणाच्यानेंहि या बिकट प्रसंगीं देशांतील प्रबळ हिंदु जमीदारांस आपल्या पक्षास घेऊन घरभेद्या बंडखोर मोंगल सरदारांचें कारस्थान हाणून पाडवणार नाहीं, असा पोक्त विचार करून त्यानें राजा तोडरमल्लालाच मुख्य सेनापतीचीं आणि बंगालदेशच्या सुभेदारीचीं वस्त्रें अर्पण केलीं व सर्व अधिकार देऊन तिकडे पाठविलें. या वीरपुरुषानें तिसऱ्यांदा बंगाल देश जिंकून दोन वर्षेपर्यंत बंगाल, बहार आणि ओरिसा या प्रांतांचा राज्यशकट कशा प्रकारें हांकिला, तें या कादंबरींत सांगण्याचा आमचा मानस आहे. ह्या कादंबरींत १५८०सालची हकीगत सांगावयाची असल्यामुळें, अर्थातच या काळीं हिंदु आणि मुसलमान, जमीदार आणि प्रजा, व पठाण आणि मोंगल यांच्यामध्यें कशा प्रकारचा संबंध होता,त्याचेंहि संक्षेपानें वर्णन केलें आहे.

## प्रकरण २ रें.

## रुद्रपुरास आगमन.

While the ploughman near at hand,
Whistles o'er the furrowed land,
And the milkmaid singeth blithe,
And the mower whets his scythe,
And every shepherd tells his tale,
Under the hawthorn in the dale.

*Milton.*

एके दिवशीं प्रातःकाळीं एक ब्रह्मचारी नदिया जिल्ह्यांतून वहात जाणाऱ्या इच्छामती नदीच्या तीरावरील एका खेडेगांवीं चालला होता. यावेळीं चारी बाजूंस हिरव्यागार आणि लांबच लांब पसरलेल्या शेतांची अपूर्व शोभा दिसत होती. हिरव्यागार अशा त्या शेतांमध्यें प्रातःकाळचा वायु कौतुकानें क्रीडा करित होता. शेतेंहि वायूच्या समागमसुखानें जणों त्याजबरोबर आनंदानें नृत्य करित होतीं. दूर—अति दूर एकदोन खेडेगांव दिसत होते. गांवांतील घरें वगैरे तर दिसत नव्हतींच; परंतु गर्द हिरव्याचार झाडांच्या दाटीवरून तेथें गांव असावें, असा सहज तर्क होत होता. आकाश अत्यंत स्वच्छ आणि नीलवर्ण होतें. पक्षिगण मधुर गान करण्यांत दंग झाला होता. त्याचप्रमाणें आपापल्या शेतांकडे निघालेले शेतकरी लोकहि उल्हसित चित्तानें गाणें गात चालले होते. वाट चालतां चालतां ब्रह्मचाऱ्यांनें एका वाटसरूस प्रश्न केला "भाई, रुद्रपुर इथून कितीसें दूर आहे?"

वाटसरूनें उत्तर दिलें "फार दूर नाहीं. सुमारें अर्धा कोस."

या मनुष्याचें वय चाळिशीच्या सुमारें होतें. ब्रह्मचाऱ्याला नम्रपणें प्रणाम करून तो ह्मणाला "महाराज, आपण रुद्रपुरास जात आहां का? मी तिथलाच रहाणारा. चला, आपण दोघेहि बरोबरच जाऊं. आपलें नांव काय? आपलें घर कुठें?"

ब्रह्मचाऱ्यानें उत्तर दिलें "माझें नांव शिखंडीवाहन. इच्छामती नदीच्या कांठावरील महेश्वर मंदिरांत मी रहातों. आपलें नांव काय?"

तो मनुष्य ह्मणाला "मला नवीनदास ह्मणतात. इथें जवळच माझें शेत आहे, तिकडे मी आलों होतों."

ब्रह्मचाऱ्यानें विचारिलें "कायहो, या वर्षी पीक कसें काय आहे?"

नवीनदासानें उत्तर दिलें "महाराज, आज जवळजवळ चाळीस हिंवाळे मीं पाहिले आहेत; परंतु एवढ्या काळांत असें सुंदर पीक माझे पहाण्यांत कधींहि आलें नाहीं. या वर्षी परमेश्वराची आमच्यावर मोठीच कृपा आहे."

थोड्या वेळानंतर नवीनदास पुन: ह्मणाला "आमच्या जमीदाराच्या मुलाची हकीगत आपल्या कानीं आली आहे का?"

"नाहीं बुवा; काय प्रकार आहे?"

"तो एक प्रकारें वेडाच झाला आहे. या वेडाचें कारण काय आहे, परमेश्वर जाणे! त्याचें वेड दूर होण्यासाठीं त्याच्या वडिलांनीं कितीतरी प्रयत्न केले, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. आपण शिकलेपढलेले आहांत, त्याच्या वेडाचें कारण आपल्याला सांगतां येईल का?"

"शास्त्रांत वेड लागण्याचीं कारणें अनेक सांगितलीं आहेत; आवडत्या माणसाचा वियोग, स्त्रीचें प्रेम,"

• नवीनदास मध्येंच ह्मणाला "छे:, यांपैकीं एकहि कारण दिसत नाहीं. तो इतक्या कांहीं विसंगत गोष्टी बोलतो कीं, एकीचाहि मेळ दुसरीशीं बसत नाहीं. मलातर वाटतें कीं, अति विद्याभ्यासामुळेंच तो वेडा झाला असावा."

"त्याच्या बरळण्यांत काय काय उद्गार निघतात? तुह्मीं कधीं ऐकलें आहे का?"

"कधीं ह्मणतो, याचा सूड घेणें हेंच कर्तव्य होय. कधीं ह्मणतो, स्त्रीरत्न हेंच परमरत्न आहे. कधीं ह्मणतो, बंधुहत्येसारखें दुसरें भयंकर

पाप नाहीं. कधीं ह्मणतो, प्रजेचे कष्ट स्वस्थपणें पहात रहाण्यापेक्षां मरून गेलेलें काय वाईट ?"

बराच वेळपर्यंत विचार करून शिखंडीवाहन ह्मणाला "मला वाटतें, त्यानें कांहींतरी घोर पापकर्म केलें असावें. महत्पातकामुळें चित्ताची वृत्ति अशीच व्हावयाची."

नवीनदास ह्मणाला "पण, त्याच्या हातून कांहीं पातक घडेल, असें संभवत नाहीं."

इतकें ह्मणून तो किंचित्काल स्तब्ध राहिला. जणूं काय कसल्यातरी मागल्या गोष्टीचें तो स्मरण करित होता. थोड्या वेळानें नवीनदास ह्मणाला "आमच्या जमीदाराचा मुलगा इतका सच्छील आहे, त्याचें अंतःकरण दयेनें इतकें भरलेलें आहे कीं, त्याच्या हातून एखादें क्षुल्लक पातकहि घडून येईल, अशी नुसती शंका घेणेंसुद्धां बरोबर होणार नाहीं. आज अजमासें बारा वर्षें झालीं असतील, मी इच्छापुरास गेलों होतों. दोघांचौघां कुळांकडे कांहीं बाकी थकल्यामुळें जमीदारानें त्यांनां एका खोलींत कोंडलें होतें. त्यावेळीं आमच्या या जमीदाराच्या मुलाचें वय केवळ सातआठ वर्षांचें असेल. त्यानें हळूच लपून खोलीचें दार उघडलें व प्रत्येकाच्या हातावर दोन दोन रुपये ठेवून त्यांला तेथून घालवून दिलें. त्यांनींहि आनंदानें आपापली बाकी भरून टाकली व ते चालते झाले."

"बरें पुढें ?"

"पुढें काय ! त्या कुळांनीं आपली बाकी कुठून भरली, त्यांनां एकाएकीं रुपये कसे मिळाले, याविषयीं कोणासच तर्क होईना. अखेरीस जेव्हां ते लोक आपापली बाकी चुकती करून घरोघर चालते झाले, तेव्हां त्या बालकानें भीतभीत आपल्या वडिलांकडे सर्व गोष्ट कबूल केली. वडिलांनीं त्या बालकास हृदयाशीं घट्ट धरून त्याचें प्रेमानें चुंबन घेतलें. त्यावेळीं मी दारांतच उभा होतों. माझे नेत्र अश्रूंनीं भरून आले."

अशा प्रकारें गप्पागोष्टी बोलत ते उभयतां रुद्रपुरास येऊन पोहोंचले. नानाप्रकारच्या मोठमोठाल्या झाडांनीं गांव अगदीं झांकून गेलें होतें. झाडांच्या हिरव्याचार गच्च पानांतून मार्ग काढितकाढित सूर्यकिरण खालीं रस्त्यावर आणि सुकलेल्या पानांच्या राशींवर येऊन पडले होते. झाडांच्या फांद्यांवर बसून कोकिळ, साळुंकी, शुक, पपैया-प्रभृति नानाजातींचे पक्षी श्रुतिमनोहर कलरवांनीं आणि हृदयंगम आलापांनीं आपापल्या मनांतील आनंद प्रदर्शित करित होते. सरोवरांमध्यें रम्य व चित्ताकर्षक कमलें विकसित झालीं होतीं. जागजागीं झाडांखालून एखाददुसरी झोंपडी दिसत होती. कोठें कोठें एखाददुसरा शेतकरी गाणें गात चालला होता. शेतकऱ्यांच्या स्त्रिया कंबरेवर कळशा ठेवून ठुमकत मुरडत पाणी आणावयास जात होत्या. शिखंडीवाहनानें नवीनदासास प्रश्न केला "महाश्वेता नांवाची एक विधवा या गांवीं रहात असते, तिचें घर तुम्हांला ठाऊक आहे?"

नवीनदास ह्मणाला "चला, या माझ्याबरोबर, मी तुह्मांला दाखवितों."

नंतर ते उभयतां एका रस्त्याला लागून महाश्वेतेचे घरीं गेले. शिखंडीवाहनानें महाश्वेतेचे घरीं आपला मुक्काम केला. ब्रह्मचाऱ्यास अत्यंत नम्रतापूर्वक प्रणाम करून आणि त्याचा प्रेमानें निरोप घेऊन नवीनदास नंतर आपल्या घरीं गेला.

## प्रकरण ३ रें.

## व्रतधारिणी.

She stole along, she nothing spoke,
The sighs she heaved were soft and low,
And naught was green upon the oak,
But moss and rarest mistletoe:
She kneels beneath the huge oak tree,
And in silence prayeth she.

*Coleridge.*

दोन प्रहर रात्र झाली आहे. आज शुक्ल पक्षांतील चतुर्दशी असतांहि आकाश मेघांनीं भरून गेल्यामुळें शेतें, गांव, अरण्य हीं सर्वच अंधकारांत दडून बसलीं आहेत. वृक्षलतादिकांवरील खद्योतमाला निबिड अंधकारांत फारच मनोहर दिसत आहे. इच्छामती नदीचें पात्र जलानें तुडुंब भरलें असून ती मोठ्या वेगानें धो धो वाहत आहे. रात्रीच्या वेळच्या जोरदार वाऱ्यामुळें नदीच्या पृष्ठभागावर लाटा अधिकच उचंबळत आहेत. निबिड कुंजवनांतून 'सों सों' शब्द करित वायु स्वैरगतीनें वाहत आहे. वारा आणि लाटा यांच्या खेरीज आणखी कशाचाहि शब्द ऐकूं येत नाहीं. सर्व जगत् निद्रिस्त झालें आहे.

अशा प्रकारच्या गडद अंधकारांत व थंड वाऱ्यांत नदीमध्यें ही एकटीच शुभ्रवसन परिधान केलेली कोण बरें स्त्री स्नान करित आहे ? ही व्रतधारिणी तर नसेल ! काळ्याकुट्ट अंधकारांत हिच्या देहावरील एका शुभ्र वसनाव्यतिरिक्त आणखी कांहींहि दिसत नाहीं. स्नान झाल्यावर ती वनपुष्पें खुडावयास लागली. नंतर जवळच्या एका मोठ्या पुरातन वटवृक्षाखालील शिवमंदिरांत तिनें प्रवेश करून मंदिराचीं दोन्हीं दारें लावून घेतलीं.

मंदिरांत समोरच एक लहानशी शुभ्र पाषाणाची शिवमूर्ति आणि कोनाड्यांत असलेला एक मंद दिवा, यांशिवाय आणखी कांहींहि

दिसत नव्हतें. दिव्याचा प्रकाश त्या स्त्रीच्या सर्वांगावर पडला होता. तिच्या यौवनकालाचें अतिक्रमण केव्हांच झालें होतें. सध्या तिचें वय चाळीस वर्षांचें होतें; परंतु तिच्या मुद्रेवरून, मधूनमधून दिसणाऱ्या तिच्या मस्तकांतील एखादद्दुसऱ्या शुभ्र केशांवरून, आणि विगलित गात्रांवरून तिचें वय पन्नासांपेक्षांहि अधिक असावें, असा पहाणाराचा सहज समज होत असे. ती क्षीण आणि उंच दिसत होती, तरी पण तिच्या अंगाचा नाजुकपणा अजून नाहींसा झाला नव्हता. ललाट उच्च आणि प्रशस्त होतें, परंतु त्याच्यावर चिंतेच्या रेषा स्पष्टपणें उमटलेल्या दिसत होत्या. तिच्या मस्तकावरील शुभ्रकृष्ण केशांचे गुच्छचे गुच्छ तिच्या तोंडावर, स्कंधांवर व हृदयावर रुळत होते. नेत्र इतके उज्ज्वल दिसत होते कीं, तशी उज्ज्वलता एखाद्या नवयौवना तरुणीच्या नेत्रयुगलामध्येंहि क्वचितच दिसली असती. परंतु ही यौवनकाळांतील उज्ज्वलता नव्हती. तर हृदयप्रदेशांत सतत भडकत असणाऱ्या चिताग्नीच्या ठिणग्याच जणूं काय तिच्या डोळ्यांतून पडत होत्या! ओष्ठ अत्यंत चिक्कण व दृढप्रतिज्ञासूचक होते. तिचें सर्व शरीर गंभीर आणि उन्नत दिसत होतें. तशांत तिनें वैधव्यदर्शक शुभ्रवस्त्र परिधान केल्यामुळेंतर तिच्या मुद्रेवर अधिकच गांभीर्य विराजमान झालें होतें. बरोबर आणलेलीं सर्व फुलें तिनें त्या शिवमूर्तीसमोर ठेविलीं व तिला साष्टांग दंडवत घातला.

उपासना करतां करतां बराच काळ लोटला. क्रमाक्रमानें वायु प्रचंड गोंगाट करूं लागला. वटवृक्षाच्या जुनाट आणि दाट फांद्यांतून कड—कड—कड—असा ध्वनि निघूं लागला. मंदिराचीं दारें खडखड आदळूं लागलीं. दिव्याची ज्योति थरथर कांपूं लागली. परंतु त्या स्त्रीच्या शांत आणि गंभीर मुद्रेंत यत्किंचितहि फरक झालेला दिसून आला नाहीं. डोळे मिटून व एकाग्र ध्यान करून जवळ जवळ एक प्रहरभर तिची आराधना चालली होती. तिच्या मनाची कामना काय

होती, कोणत्या हेतूच्या फलप्राप्तीकरितां ती इतकी मनोभावानें व एकाग्रतेनें शिवाची आराधना करित होती, हें सांगण्याचें आह्मी इतक्यांतच साहस करित नाहीं.

उपासना समाप्त झाल्यावर त्या स्त्रीनें हातांत दिवा घेऊन बाहेर येण्याच्या हेतूनें मंदिराचें दार उघडलें. दार उघडतांच वाऱ्यानें दिवा एकदम विझाला. रात्रीची वेळ. सर्वत्र घोर अंधकार पसरलेला. वायु बेफाम वृत्तीनें स्वैर वाहत होता. परंतु अशा समयींहि तिळमात्र न डगमगतां ती स्त्री हळूहळू रुद्रपुराच्या मार्गानें आपल्या घराकडे जाऊं लागली. मार्ग अतिशयच अरुंद. दोन्ही बाजूंला दाट जंगलच जंगल लागलेलें. आणि पानांनीं गजबजलेल्या व रस्त्याच्या दोन्ही बाजूंस असलेल्या मोठमोठ्या वृक्षांच्या डहाळ्या एकमेकांत घुसून गेल्यामुळेंतर त्या अंधकाराचें स्वरूप अधिकच भयप्रद झालें होतें. त्या झाडांमधून कोठें कोठें एखाददुसरी झोंपडी दृष्टीस पडत होती; परंतु या झोंपड्यांत रहाणारे सर्व जण या वेळीं गाढनिद्रेंत मग्न झाले होते. रातकिड्यांचा शब्दहि ऐकूं येत नव्हता. अशा वेळीं वाट चालतां चालतां अनेक वळणें घेत घेत ती स्त्री एका झोंपडीजवळ येऊन उभी राहिली, व तिनें दारावर हळूच थाप दिली. लवकरच दरवाजा आंतून उघडला व ती आंत शिरली. हातांत दिवा घेऊन दार उघडा-वयास आलेल्या सुंदर बालिकेनें पुनः दार बंद केलें.

वाट चालत असतांना ती स्त्री केवढ्यातरी घोर चिंतेंत मग्न झाली होती; परंतु दार उघडावयास आलेल्या त्या बालिकेचें सुहास्य मुखकमल पहातांच तिची चिंता तात्काळ दूर झाली आणि मुद्रेवर हळूहळू शुद्ध आणि पवित्र अशा वात्सल्यप्रेमाचें प्रतिबिंब दृग्गोचर होऊं लागलें. "सरूबाळ, इतकी रात्र झाली तरी तूं अजून जागीच आहेस? जा बेटा, आतां नीज जा." असें ह्मणून महाश्वेतेनें अत्यंत प्रेमभरानें त्या मुग्ध बालिकेला आपल्या हृदयाशीं घेतलें.

सरलेनें उत्तर दिलें "आई, रात्र बरीच झाली हें मला कळलेंच नाहीं. ब्रह्मचारीबुवा महाभारतांतील कथा सांगत होते आणि मी आपली बसल्या बसल्या ऐकत होत्यें. मला वाटतं, भारतांतल्या गोष्टी ऐकायला मिळाल्यास रात्रीं मला झोंपेची आठवणसुद्धां होणार नाहीं."

बालिका दिवा घेऊन निजावयास जाऊं लागली, त्या वेळीं माता बराच वेळपर्यंत अनिमिषलोचनांनीं तिच्याकडे पहात उभी राहिली; मनांतल्या मनांत ती ह्मणते "बेटा, तूंतर माझं जीवनसर्वस्व आहेस! विधात्यानं हें अमूल्य रत्न, हें अनुपम सुंदर पुष्प, केवळ वनशोभे-करितांच का निर्माण केलं आहे?" असें ह्मणतह्मणत ब्रह्मचारीबुवा बसले होते त्या खोलीकडे ती चालती झाली.

सरला आपल्या निजावयाच्या खोलींत जाऊन निजली. तिनें दिवा कोनाड्यांत ठेविला. आई लवकरच निजावयास येईल, असें समजून तिनें दाराला कडी घातली नाहीं, किंवा दिव्याला निरोपहि दिला नाहीं. सरला वयानें तेरा वर्षांची होती. यौवनकुसुमाची ही मोहक कळी, अद्याप पूर्ण विकास पावली नव्हती. तिच्या मुद्रे-वरून ती अजून एखाद्या अल्लड पोरीप्रमाणेंच दिसत होती. तिच्या अवयवांमध्यें किंवा मुखावर सौंदर्याची छटा किंवा लावण्याचें चिन्ह दिसत नव्हतें. कविगण ज्या प्रकारच्या सौंदर्याचें प्रेमभरानें वर्णन करावयास अत्यंत उत्सुक असतात, तसल्या प्रकारचें सौंदर्य सरलेंत कांहींच दिसत नव्हतें. तरीहि तिचें शरीर अत्यंत नाजुक होतें. मुखमंडळावर स्वर्गीय माधुर्य आणि सरलता स्पष्ट दिसत होतीं. बालिकेचें हृदय सुशीलता, सरलता, मनुष्यमात्राविषयीं पवित्र प्रेम आणि अकृत्रिम स्नेह यांनीं तुडुंब भरलेलें आहे, असें तिच्या मुद्रेकडे फक्त एकवार पाहिल्यानेंच स्पष्ट कळून येत होतें. सरलेचें सर्व सौंदर्य कायतें तिच्या त्या दोन डोळ्यांत भरलें होतें. आईप्रमाणेंच तिचे दोन्ही नेत्र अति उज्ज्वल, परंतु शांत, सरळ आणि माधुर्यपूर्ण होते. तिचे ओंठ

जरी विशेष चिक्कण नव्हते, तरी पण ते अत्यंत लुसलुशीत, सुधारसानें थबथबलेले, आणि सदा मधुर हास्यानें विकसित झालेले दिसत असत. मस्तकावरील इकडेतिकडे विखुरलेल्या काळेभोर कुरळ केशांनीं तर किशोरवयांतील तिचा अल्लडपणा आणि सरलता हीं अधिकच वृद्धिंगत केलीं होतीं. तिचें सर्वांग कोमल आणि मृदु होतें. दिवसभर काम करून श्रांत झाल्यामुळें सरला अंथरुणावर अंग टाकते न टाकते तोंच तिला गाढ निद्रा लागली; जणूं, पूर्ण विकास पावलेल्या कमळानें निशासमय होतांच पुनरपि आपल्या पाकळ्या मिटून घेतल्या.

या दोघी मायलेंकी रहात होत्या, ती अगदीं सामान्य प्रतीची झोंपडी होती.एका खोलींत स्वयंपाकाची व्यवस्था केली होती व दुसऱ्या खोलींत गाईंच्या गोठ्याची योजना केली होती. याशिवाय आणखी दोन मोठ्या खोल्या होत्या. त्यांपैकीं एकींत या दोघी मायलेंकी आणि एक दासी अशा तिघी जणी निजत असत; दुसऱ्या खोलीचा दिवसा कामकाज करण्याकडे उपयोग होत असे; आणि कोणी अतिथि अभ्यागत आला असल्यास तेथें त्याची रात्रीं निजावयाची तजवीज होत असे. गोठ्यांत दोनतीन गाई होत्या. अंगणांत एक धान्याची कोठी होती. झोंपडीच्या मागच्या बाजूस एक लहानसें सुंदर परसूं होतें. त्यांत डाळिंब, पेरू, पपनस इत्यादि कित्येक सुंदर व मधुर फळझाडें होतीं; त्याचप्रमाणें सरलेनें आपल्या हातानें लावलेलीं बरीचशीं फुलझाडें व वेली होत्या. ती झोंपडी जरी अगदीं सामान्य प्रतीचीच होती, तरी तिच्यांत रहाणारीं माणसें मात्र अगदींच सामान्य नव्हतीं, हें तेथें कोणीहि आगंतुक गेल्यास त्याला लागलेंच कळून येत असे. घरांतील सर्व सामान उत्तम प्रतीचें, स्वच्छ आणि सुंदर होतें. कापड-चोपड व घरांतील इतर वस्तु जरी सामान्य प्रतीच्याच होत्या, तरीपण त्या सर्वदा स्वच्छ आणि व्यवस्थित ठेवलेल्या असत. घर अगदीं

साधेंच होतें, परंतु प्रत्येक खोलींतील सामानाची रचना अगदीं व्यवस्थेशीर आणि टापटिपीनें केलेली असे. अंगण झाडूनलोटून इतकें स्वच्छ ठेविलेलें असे कीं, कुठें एखादी गवताची काडीहि औषधाला सांपडली नसती! यःकश्चित् अशा झोंपडींत रहाणाऱ्या या स्त्रियांची एकंदर वागणूक पाहून, प्रथम प्रथम गांवांतील मंडळींत नाना प्रकारचे कुतर्क निघून आपापसांत कडक टीका होत असे; परंतु गेल्या सात वर्षांत एकसारखें डोळ्यांत तेल घालून त्यांच्या वर्तनावर नजर ठेविली असतांहि गांवांतील लोकांनां त्यांत कांहीं वावगेपणा आढळून आला नसल्यामुळें त्यांचें तें पूर्वीचें मत आतां साफ बदललें होतें. महाश्वेता ही कोणातरी कायस्थ जमीदाराची बायको असून दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें सर्व वैभव, ऐश्वर्य नष्ट होऊन तिला आपलें घरदार सोडून मुलीसह इकडे यावें लागलें असावें, असा गांवांतील सर्व लोकांचा आतां समज झाला होता.

इकडे खोलींत येतांच महाश्वेतेनें शिखंडीवाहनाचा बराच आदर-सत्कार केला, व अति आग्रह करून तिनें त्याला थोडा फराळ करावयास लाविलें व आपणहि कांहीं थोडेंसें खाऊन पाणी प्याली. नंतर ब्रह्मचारीबुवांनां एका उत्तम आसनावर बसवून आपण खालीं जमिनी-वरच बसली व त्यांच्याशीं गोष्टी करूं लागली.सर्व रात्रभर त्या दोघांचें भाषण चाललें होतें. त्याचा कांहीं भाग येथें देतों.

शिखंडीवाहन म्हणाला "बाई, मी धर्मपिता चंद्रशेखर यांचेकडून आलों आहें. पिताजी नुकतेच तीर्थाहून आले आहेत. आज सात वर्षें झालीं, ते तीर्थाटण करावयास गेले होते. हिमालयापासून कावेरी-तीरापर्यंतचीं सर्व तीर्थें करून ते आले."

"पिताजींनीं आपल्या जन्माचं खरोखर सार्थक केलं."

"अखेरीस बंगाल्यांत येतांच त्यांनां कळलें कीं, येथील पठाणराज्य नष्ट होऊन मोंगल बादशहाचा हिंदु सेनापति राजा तोडरमल्ल यानें

ह्या देश पादाक्रांत केला आहे. त्याचप्रमाणें बंगाल्यांतील जमीदार कुलतिलक सुप्रसिद्ध राजा समरसिंह ह्यांनीं परलोकीं गमन केलें. आपल्या व्रताचा आद्योपांत वृत्तांत मीं त्यांनां स्वमुखानें निवेदन केला. तें ऐकून पिताजी विस्मित झाले; परंतु त्यासंबंधीं त्यांनीं आपलें मत कांहींच प्रदर्शित केलें नाहीं. पण मला वाटतें कीं, या व्रतापासून कांहींतरी अनिष्ट घडणार. बाई, अजूनतरी विचार कर, व आपला हट्ट सोडून दे."

महाश्वेता ह्मणाली "महाराज, माफ करा, या संबंधांत मात्र मला कांहींएक सांगूं नका. हें व्रत माझ्या प्राणांचा केवळ अंश आणि जीवनाचा आधार बनून राहिलें आहे. इतका शोक, इतका मनस्ताप सहन करून जी मी अद्याप जिवंत राहिल्यें आहें, इतकी विलक्षण दुःखद स्थिति प्राप्त झाली असतांहि जी मी अद्याप स्वस्थ आहें, तें केवळ या व्रताच्याच प्रभावामुळं ! ज्या दिवशीं या व्रताचं उद्यापन होईल, त्याच दिवशीं हे प्राणहि ह्या कुडींतून उडून जातील !"

महाश्वेतेचें हें निर्धाराचें उत्तर श्रवण करून शिखंडीवाहन तिचें मन वळविण्याच्या प्रयत्नांपासून पराङ्मुख झाला. कांहीं वेळानें तो म्हणाला "सूड घेण्याचा तूं कांहीं विशेष प्रयत्नतरी करिते आहेस का ?"

"एका सिद्ध पुरुषापासून मीं एक अघोर मंत्र घेतला आहे. त्यानं ह्या मंत्र साधन करण्याची जी रीति दाखविली आहे, तीतर त्याहूनंहि अघोर आहे. पण मी अगदीं शांतपणं व दृढनिश्चयपूर्वक सर्व यथासांग करित्यें. रोज सायंकाळीं स्नान करून शुचिर्भूत होऊन दोन प्रहर रात्रपर्यंत देवाधिदेव महादेवाची त्या मंत्रद्वारं मी आराधना करित्यें. जितके दिवसपर्यंत महादेव शत्रूचा निःपात करित नाहीं, तितके दिवस माझी कन्या अविवाहित राहील. सात वर्षपर्यंत माझा हाच क्रम चालणार. तितक्या काळांत जर शत्रूचा निःपात झाला नाहीं, तर मी महादेवा-पुढं कन्येचा वध करून नंतर चितारोहण करीन."

नंतर बराच वेळपर्यंत दोघेंहि अगदीं स्तब्ध बसलीं होतीं. ब्रह्मचाऱ्यानें पुनः विचारलें "बाई, तुझें व्रत कायतें मला पूर्णपणें ठाऊक आहे. मीं तुला हें विचारलें होतें कीं, या व्रताखेरीज सूड घेण्याचा आणखीहि कोणता अन्य उपाय तूं योजिला आहेस का?"

महाश्वेता गंभीरस्वरानें ह्मणाली "ज्यानं हें विशाल विश्व निर्माण केलं आहे, त्याच्या साह्याव्यतिरिक्त स्त्रिया दुसऱ्या कोणत्या उपायाचं अवलंबन करणार?"

सरलस्वभाव ब्रम्हचाऱ्यानें महाश्वेतेस आपल्या व्रतापासून पराङ्मुख करण्याचा आणखी एकवार प्रयत्न करून पाहिला. तेव्हां महाश्वेता म्हणाली "महाराज, आपणास जर मागील हकीगत ठाऊक असती, तर आपण मला असं कधींहि बोललां नसतां. आज मी आपणांस ती सर्व हकीगत सांगत्यें, ती कान देऊन ऐका, व इथून गेल्यावर महात्मा चंद्रशेखर यांनांहि ती सर्व कथन करा."

गतगोष्टींच्या स्मरणानें महाश्वेतेचें सर्व शरीर थरथर कांपूं लागलें. तिची चर्या पालटली. आधींच उज्ज्वल असलेले तिचे नेत्र आतां इतके तेजस्वी झाले कीं, त्यांच्यांतून अग्निज्वाला निघतात कीं काय, असा भास होऊं लागला. दीपज्योति क्षीण आणि फिकट दिसूं लागली. घराच्या बाहेर चारी बाजूंस काळाकुट्ट अंधकार पसरला होता. वायु सों सों असा भयंकर शब्द करित प्रबल वेगानें वाहत होता आणि महाश्वेतेच्या क्षुद्र झोंपडीवर जोरानें आघात करित होता; परंतु गतगोष्टींच्या स्मरणानें उत्पन्न झालेला प्रचंड चिंतारूपी झंझावात महाश्वेतेच्या हृदयकंधरेवर शतपट जोरानें आघात करूं लागला. बराच वेळपर्यंत ती अगदीं निस्तब्ध बसली होती. नंतर ह्मणाली "महाराज, मी पापिणी आहें. दुसऱ्याचं अमंगळ व्हावं या हेतूनं सात वर्षपर्यंत जिनं घोर व्रतानुष्ठान आरंभिलं आहे, ती पापिणी नव्हेतर काय? परंतु एखाद्या सामान्य अत्याचाराचा सूड घेण्यासाठीं मीं हें पापव्रत आरंभिलं नाहीं. लक्ष्य देऊन ऐका."

## प्रकरण ४ थें.

# महाश्वेतेची पूर्वकथा.

But o'er her warrior's bloody bier
The lady dropped nor flower nor tear,
Vengeance deep brooding on the slain,
Had locked the source of softer woe,
And burning pride and high disdain,
Forbade the rising tear to flow.

*Scott.*

"माझे पति राजा समरसिंह राय, कायस्थ कुलास भूषणभूत असून कायस्थ जमीदारांचे ते शिरोरत्न होते. पठाण दाउदखानाबरोबर जेव्हां मोगलांनीं युद्ध आरंभिलं, आणि शहानशहा अकबर यांनीं स्वत: येऊन पाटणा शहरास वेढा घालून गंगानदीच्या पैलतीरावरील हाजीपुर शहर काबीज करण्याच्या अभिलाषेनं जेव्हां त्यांनीं अलमखानास पाठविलं, तेव्हां राजा समरसिंह यांनीं आपल्याबरोबर एक सहस्त्र घोडेस्वार घेऊन अलौकिक पराक्रम दाखविला. हाजीपुर हस्तगत होण्यास राजा समरसिंह यांचेच पराक्रम मुख्य कारण झाले. त्यांचं हें विलक्षण वीरत्व श्रवण करून मोंगलाधिपति अकबरशाह अत्यंत प्रसन्न झाले. पाटणा शहर हस्तगत केल्यावर त्यांनीं तिथं एक मोठा दरबार भरविला होता. त्यांत समस्त हिंदु जमीदारांमधें माझ्या पतिलाच अग्रस्थान दिलं होतं. ही हकीगत घडल्यावर थोड्याच काळानंतर मोंगल सैन्यानं सागरतरंगाप्रमाणं सर्व बंगालदेश व्यापून टाकिला, महापराक्रमी वीरधुरंधर राजा तोडरमल्ल आपल्याबरोबर थोडेसे लोक घेऊन पळपुट्या दाऊदखानाचा पाठलाग करावयास सिद्ध झाले. त्या समयीं, राजा समरसिंहहि अत्यंत उल्हसित चित्तानं, जिकडेतिकडे भयंकर बंडाळी माजलेला बंगदेश पादाक्रांत करावयास तोडरमल्लाबरोबर निघाले. तंड्याहून वीरभूमि, वीरभूमीहून मेदिनीपुर, मेदिनीपुराहून कटक, सारांश, जिथंजिथं राजा तोडरमल्ल गेले, तिथंतिथं माझे पति त्यांच्या उजव्या हाताप्रमाणं सर्वदा बरोबर असत. ज्या ज्या युद्धांत

तोडरमल्ल यांस जय प्राप्त झाला, त्या त्या युद्धांत माझ्या पतींनीं अलौकिक, अश्रुतपूर्व असं वीरत्व आणि साहस दाखविलं होतं. त्या वीरत्वाचा, त्या साहसाचा, हा असाच मोबदला मिळावा का ?

" नंतर कटक नगरासन्निध जें महा घनघोर युद्ध झालं त्यांत मोंगल-सेनापति मनाइमखान जातीनं हजर होता. मोंगल लोकांचा बहुतेक पराभवच झाला होता. खुद्द मनाइमखानानं रणांगणांतून पाय काढला. अलमखान तर रणभूमीवर पतन पावला. परंतु राजा तोडरमल्ल आणि राजा समरसिंह अगदीं निर्भयपणं आणि अति शौर्यानं लढत होते. भय कशास ह्मणतात, हें उभयतांनां लेशमात्र ठाऊक नव्हतं. आपल्या पक्षाची ती स्थिति पाहून राजा तोडरमल्ल ह्मणाले 'अलमखान युद्धांत मरण पावला ह्मणून काय झालं? त्याचप्रमाणं मनाइमखानानंहि पलायन केलं ह्मणून काय झालं ? मला त्याची पर्वा नाहीं! बादशाही आजपर्यंत आमच्या हातींच आहे आणि ती आमच्याच हातीं राहील.' तोडरमल्लाच्या मुखावाटे हे शब्द पडतात न पडतात तोंच माझ्या पतींनीं सिंहासारखें उड्डाण मारून शत्रुसैन्यांत प्रवेश केला. त्यांचं हें विलक्षण साहस पाहून हतवीर्य झालेल्या मोंगल सैन्यास अवसान आलं व तें पुनः धैर्यानं व नेटानं शत्रूवर तुटून पडलं; हांहां म्हणतां दाउदखानाच्या पक्षाचा अगदीं मोड झाला. या युद्धानंतर पठाणांनीं बंगालदेश मोंगलांच्या स्वाधीन करून तह केला. या तहाच्या प्रसंगीं मनाइमखानानं दाउदखानास विचारिलं 'पठाणराज, आपण आमच्या-बरोबर जवळजवळ एक वर्षभर निकरानं लढत आहां; तेव्हां या युद्धांत आमच्या कोणत्या सेनापतीनं सर्वांत अधिक धैर्य आणि शौर्य प्रगट केलं हें आपण अवश्य सांगूं शकाल?' पठाणराजानं उत्तर दिलें 'क्षत्रियकुलचूडामणि राजा तोडरमल्ल, आणि दुसरे बंगदेशीय राजा समरसिंह यांच्याशिवाय दुसरा एकहि वीर मला भेटला नाहीं!'

"हे शब्द दाउदखानाच्या तोंडून निघताहेत तोंच सर्व दरबार जयध्वनि आणि कोलाहल यांनीं दुमदुमून गेला. हांहां ह्मणतां समस्त बंगदेश राजा समरसिंहाच्या कीर्तिरवानं विघोषित झाला. पति युद्धास गेले होते म्हणून मी सदासर्वदा चिंतामग्न असें. चतुर्वेष्टित दुर्गाच्या एका खोलींत मी अशीच एके दिवशीं पतीविषयीं चिंता करित बसल्यें असतां हें वर्तमान माझ्या कानीं आलं. माझ्या प्रिय पतीच्या शौर्याची आणि गौरवाची ही आनंदवार्ता श्रवण करतांच माझं सर्व शरीर एकदम रोमांचित झालं. हाय! आज त्याच समरसिंहानां राजद्रोही ठरवून त्यांचा शिरच्छेद करण्यांत आला. देवाधिदेव महादेव! याला या जगांत पारिपत्य नाहीं का? स्वर्गलोकींहि याचा विचार होणार नाहीं?"

एकाएकीं तार तुटलेल्या वीणेप्रमाणें महाश्वेतेचा गंभीर स्वर एकदम बंद पडला. शिखंडीवाहन ह्मणाला "बाई, गतगोष्टींचें स्मरण करून तूं आपल्या जीवाला व्यर्थ त्रास करून घेऊं नकोस. समरसिंहाच्या शौर्यकथा बंगदेशांत सर्वांस ठाऊक आहेत. राजा समरसिंहाच्या पत्नीनें मागील गोष्टी आतां विसरून जाव्या."

महाश्वेता आवेशानें ह्मणाली "समरसिंहाची पत्नी नाहीं, मी त्यांची राजमहिषी होत्यें! पण सांप्रत निराश्रित विधवा झाल्यें आहें!! मला आतां थोडंच सांगायचं आहे, लक्ष्य देऊन ऐका.

"सतीशचंद्र नांवाचा एक अति चतुर व धूर्त ब्राह्मण पठाणाचा आश्रित होता. पठाणाचा ऐश्वर्यरवि अस्तास गेलेला पाहून त्यानं पठाणाचा पक्ष सोडला व तो राजा तोडरमल्लाकडे गेला. माझ्या पतींनींच त्या गरीब ब्राह्मणाची राजा तोडरमल्लाशीं ओळख करून त्याच्याविषयीं शिफारस केली होती. सतीशचंद्रावर त्यांनीं आणखीहि पुष्कळच उपकार केले होते.

"ब्राह्मण फार धूर्त आणि कार्यदक्ष होता. सैन्यांतील लोकांस वेळचे वेळीं रसद पोंचविणं, आपल्या पक्षास अनुकूल असा शत्रूंबरोबर

तह करून घेणं, वेळप्रसंगीं शत्रूच्या लोकांत फितुरी माजविणं या कामांत त्याचा अगदीं हातखंडा असे. सतीशचंद्रावर राजा तोडरमल्ल यांची फार मर्जी बसली. आणि त्या कृपेमुळं त्याला क्रमाक्रमानं कीर्ति, धन आणि विपुल सम्पत्ति प्राप्त झाली.

"या उत्कर्षाबरोबरच सतीशचंद्राच्या मनांत भयंकर महत्वाकांक्षा उद्भवली. बंगदेशांतील समस्त हिंदु लोकांत आपणास अग्रस्थान मिळावं, ही त्याची प्रबल लालसा होती व त्यामुळं तो मनांतून माझ्या पतीचा अत्यंत द्वेष करूं लागला. महाराज, आपण ह्मणतां कीं, एखाद्यावर उपकार केला असतां तो कृतज्ञ होतो; परंतु माझ्या पतींनीं सतीशचंद्रावर उपकार करून काळसर्पाला घरांत बाळगिलें!

"राजा तोडरमल्ल बंगदेशांतून परत जातांच सतीशचंद्रास संधि सांपडली. त्यानं कांहीं बनावट कागद तयार करून त्यांत ओरिसाचा पठाण राजा दाउदखान याजबरोबर राजे समरसिंह सरकाराविरुद्ध खलबत करित आहेत, असं सिद्ध केलं. बंगालच्या मुसलमान सुभेदाराचा त्या अपूर्व गोष्टीवर लागलाच विश्वास बसला. राजे समरसिंह ह्यांनां राजद्रोही ठरवून फांसावर चढविलं. सरकारची कामगिरी उत्तम प्रकारं बजाविली म्हणून दुष्ट सतीशचंद्राला आमची विस्तीर्ण जहागीर बक्षिस दिली गेली! माझ्या प्रिय आणि पराक्रमी पतीचा अशा कपटानं वध करणारा चांडाळ, आज साऱ्या बंगालदेशचा दिवाण बनून राहिला आहे!!

"महाराज, झाली, संपली माझी गोष्ट. या शोकामुळं मी वेडी बनल्यें आहें. प्राणापेक्षांहि प्रिय अशा माझ्या पतीच्या वधाचा सूड घेण्याकरितांच मीं हें व्रत स्वीकारिलं आहे."

नंतर बराच वेळपर्यंत दोघेंहि स्तब्ध बसलीं होतीं. महाश्वेतेस तिच्या व्रतापासून परावृत्त करणें अगदीं अशक्य आहे; अग्निराशीला एका जलबिंदूनें विझविण्याचा प्रयत्न करणें जसें निरर्थक आणि

उपहासास्पद होईल तसेंच हेंहि होय, असें शिखंडीवाहनास पुरतेपणीं दिसून आलें. तो म्हणाला "मग मी हा सर्व वृत्तांत पिताजींनां कळवूं?"

महाश्वेता म्हणाली "होय, कळवा; आणि त्यांनां हेंहि पण सांगा कीं, आतां पापाचं प्रायश्चित्त अगदीं जवळ आहे; नरहत्या करणारास लवकरच दंड होणार आहे. राजे तोडरमल्ल आतां पुनः बंगदेशांत येणार आहेत. युद्धाचं एकंदर कार्य समाप्त झाल्यावर समरसिंहाची पत्नी आपल्या पतीच्या वधाविषयीं चौकशी चालविण्यास त्यांनां विनंति करणार आहे."

महाश्वेता दांतओंठ चावून आणि चमत्कारिक मुद्रा करून पुढें म्हणाली "पिताजींनां आणखी सांगावं कीं, पक्ष्याच्या छाव्यास व्याधानं शस्त्रानं घायाळ केलं असतां तो बिचारा आपल्या असह्य वेदनांमुळं चिवचिव करून प्राण सोडतो; परंतु मानिनी सर्पिणीच्या अंगावर एखाद्याचा पाय पडला असतां ती आधीं आपल्याला दुखविणाराला दंश करील व नंतर आनंदानं हंसतहंसत प्राण सोडील!"

बोलतां बोलतां महाश्वेता बसल्या जागेवरून उठून एकदम उभी राहिली. तिचें सर्व अंग या वेळीं रोमांचित होऊन थरथर कांपत होतें. नंतर तिनें घराचा दरवाजा उघडला. प्रभातकाळचा प्रकाश तिच्या संकुचित ललाटावर पडतांच ती दचकल्यासारखी झाली. तिनें पाहिलें, वृक्षांच्या अग्रभागांनीं तरुण अरुणकिरणांमुळें सुवर्णवर्ण धारण केला आहे, वृक्षांच्या डहाळ्यांवर नाना जातींचे पक्षी बसून गायनाच्या लकेऱ्या मारित आहेत.

## प्रकरण ५ वें.

## सरला आणि अमला.

We Hermia, like two artificial gods,
Have with our needles created both one flower,
Both on one sampler, sitting on one cushion,
Both warbling of one song, both in one key;
As if our hands, our sides, voices and minds,
Had been in corporate. So we grew together,
Like to a double cherry seeming parted,
And yet a union in partition,
Two lovely berries moulded on one stem.

*Shakespeare.*

पक्षिगण वृक्षांच्या डहाळ्यांवर बसून मधुर गायनानंदांत गर्क होण्याच्या बराच वेळ पूर्वी, सरला आपल्या बिछान्यावरून उठून, शुचिर्भूत होऊन, झाडलोट वगैरे गृहकृत्यें करूं लागली होती. घर, दार, अंगण वगैरे सर्व तिनें झाडून स्वच्छ केलें. सरला राजकुमारी असून हीं असलीं कामें कशी करित असेल, अशी एखाद्याला शंका येणें साहजिक आहे; परंतु त्याला आमचें एवढेंच सांगणें आहे कीं, आपण राजकुमारी आहों, हें सरलेस ठाऊक नव्हतें. पित्याच्या मृत्यू-समयीं ती फारच लहान असल्यामुळें तिला आतां त्यावेळचें स्मरणहि राहिलें नव्हतें. तिच्या आईनेंहि तिला त्यासंबंधांत अगदीं अज्ञान ठेविलें होतें. तिच्या बालिकाहृदयांत अहंकार आणि अभिमान यांचा लेशमात्र संचार झाला नव्हता. सदोदित आपल्या झोंपडींत राहून आपल्या आईवर अगदीं अंतःकरणापासून प्रेम करणें, गरीब शेतकन्यांच्या बायकांबरोबर गप्पागोष्टी करणें आणि त्यांचें प्रेम संपादन करणें, यांखेरीज दुसऱ्या कोणत्याहि उच्च अभिलाषेनें सरलेच्या सरल अंतःकरणांत कधींहि प्रवेश केला नव्हता.

घर, अंगण झाडूनसवरून स्वच्छ केल्यावर सरला एक घागर घेऊन नदीवर स्नानास जाण्याच्या उद्देशानें निघाली. दररोज सूर्योदयापूर्वी

स्नान करण्याचा तिचा परिपाठ असे. मार्गात एका झोंपडीसमोर उभी राहून वीणारवासहि लाजविणाऱ्या मंजुळस्वरानें तिनें "ताई अ?" अशी हांक मारिली. परंतु तिच्या त्या हांकेस उत्तर मिळालें नाहीं. पुनः तिनें "अमला ताई अ?" अशी मृदुस्वरानें हांक मारिली.

"आल्यें ग आल्यें," असें कोणीं आंतून उत्तर दिलें, व लवकरच एक पंधरा वर्षे वयाची, सुंदर तरुणी दार उघडून बाहेर आली.

या तरुणीचे डोळे अत्यंत पाणीदार होते. हृदय चंचल होतें. ती पारव्या रंगाचें कांठदार लुगडें नेसली होती. तिच्या हातांत सोन्याच्या बांगड्या असून पायांत पैंजण होते. कंबरेवर तिनें एक कळशी घेतली होती. बाहेर येतांच सरलेच्या वेणीस हात घालून तिनें प्रेमानें एक हिसडा दिला, व हळूच चिमटा घेऊन ती म्हणते "कोण वेडी आहेस ग तूं? तुला समजत नाहीं, माझे पति वृद्ध आहेत ते मला इतक्या लौकर कसे बरं सोडतील? होय खरंच गडे, त्यांत तुझा तरी काय दोष? तुझ्या आईनं अजून तुझं लग्न करून दिलं नाहीं नि त्या चिंतेमुळं तुला सारी रात्र झोंप लागत नाहीं. तेव्हां उजाडतं न उजाडतं तोंच तूं घराबाहेर पडल्येस." असें ह्मणत ह्मणत तिनें सरलेस आणखी एक चिमटा घेऊन हंसत हंसत तिचा गालगुच्याहि घेतला.

सरला म्हणाली "गडे, तूं मला यायला सांगितलंस ह्मणून मी आल्यें. यांत माझा काय बरं दोष?"

यावर अमलेनें विचारलें "बरं, मीं बोलाविली नसती, तर तूं आली असतीस कीं नाहीं?"

सरलेनें उत्तर दिलें "होय, आल्यें असत्यें."

अमलेनें पुनः प्रश्न केला "कां बरं?"

सरला ह्मणाली "कां, तें मला सांगतां येत नाहीं. सकाळीं उठतांच तुझं हें तोंड डोळ्यांसमोर दिसूं लागतं. जर एखादे दिवशीं तूं दिसलीस नाहीं, तर सारा दिवस मला चैन पडत नाहीं व कामकाजांतहि मन लागत नाहीं."

प्रेमपूर्ण लोचनांनीं अमला सरलेच्या मुखाकडे पाहूं लागली. सरलेचें मुखकमलहि प्रेमतरंगांनीं देदीप्यमान दिसूं लागलें. थोड्या वेळानें अमला ह्मणाली "सरले, तुला ती बातमी कळली का ग? आपल्या जमीदारांच्या इथली कांहीं बातमी माझ्या कानीं आली आहे."

सरला म्हणाली "नाहीं बाई, मीं नाहीं ऐकली. काय बातमी आहे?"

"आमच्या जमीदारांनीं किनई आपल्या मुलाचं एका थोरा मोठ्याच्या मुलीशीं लग्नाचं जुळविलं होतं. मुलगी पण कशी सुंदर आहे म्हणतात, प्रत्यक्ष रतीच! तिचे दोन्ही डोळे तर इतके सुरेख आहेत, जणों-दोन काळे काळे भ्रमरच!"

"बरं पुढं?"

"पुढं काय? लग्नाची सर्व तयारी झाली होती; परंतु मुलानं ऐन वेळीं घोटाळा केला. तो म्हणे कुठं पळून गेला. तो म्हणतो कीं आपण या मुलीशीं लग्न करणार नाहीं."

"कां बरं?"

"कां तें कांहीं मला ठाऊक नाहीं. पण म्हणतात कीं, कोणत्याशा एका खेडेगांवांतील एका गरीबाच्या पोरीस पाहून तो अगदीं दिवाणा झाला आहे. त्या पोरीसाठींतर तो घरदार टाकून नाहींना चालता झाला? गडे, तुलातर त्यानं कुठं बघितलं नाहींना?"

"इश्श मेलं. तुझी बाई आपली सदानकदा थट्टाच! पण ही किनई एक मौजच आहे. बाप लग्न ठरवितो एकीशीं न् मुलगा करूं इच्छितो दुसरीशींच!"

"ही ज्याच्यात्याच्या मर्जीची गोष्ट आहे. बापानं जिच्याशीं त्याचं लग्न ठरविलं आहे, ती जर त्याला मुळांतच पसंत नसली तर?"

"कां बरं पसंत नाहीं?"

"सरले, कितीग वेडी तूं! तुला आतां शिकवूंतरी कुठवर? तूं आपल्या आईला सांग कीं, करून दे माझं लग्न लवकर ह्मणून.

म्हणजे सर्व आपोआप कळूं लागेल तुला." इतकें म्हणून अमलेनें पुन: हंसत हंसत सरलेचा आणखी एक गालगुच्चा घेतला.

अशा प्रकारें थट्टाविनोद करित करित त्या उभय मैत्रिणी नदीच्या घाटावर येऊन पोहोंचल्या. तेथें येतांच एक विचित्रच देखावा त्यांच्या दृष्टीस पडला. एक काळ्याकुट्ट वर्णाची, उंच, धिप्पाड व कंबरेभोंवतीं फाटकें वस्त्र गुंडाळलेली भीषण स्त्रीमूर्ति उभी आहे. तिच्या गळ्यांत शिंपांची माळ लोंबत होती; हातांत एक भला दांडगा सोटा होता; सर्वांगास भस्म फांसलें होतें; डोळे लाल लाल भडक आणि चढलेले होते. ती विचित्र मूर्ति पहातांच दोघीहि चकीत झाल्या. अमलेनें धीर करून तिला विचारलें "कोणग आहेस तूं?"

ती विचित्र स्त्री विकट हास्य करित म्हणाली "मला विश्वेश्वरी वेडी म्हणतात."

अमला विचारते "अस्सं अस्सं! विशी वेडी म्हणतात ती तूंच तर मग! तूं मागंहि एकवार या गांवीं आली होतीस, नव्हे?"

"होय, आल्यें होत्यें."

"तुला म्हणे हात पहातां येतो?"

"होय, येतो."

"माझा हात पहा बरं."

असें म्हणून अमलेनें विशी वेडीला आपला हात दाखविला. थोडा वेळ हात पाहून वेडी म्हणाली "तूं दिवाणाची बायको होणार."

अमला रागाचा आविर्भाव दाखवून म्हणते "चल दूर हो! मेली चावट कुठली! 'तूं दियानाची म्हने ब्यायक्यू होनार!' मेले, माझंतर लगीन झालं आहे! माझे पति जिवंत आहेत. नको मेली ती दिवाणी नि वजिरी! परमेश्वर माझ्या वृद्धपतीनांच उदंड आयुष्य देओ. बरं सांग पाहूं, या माझ्या मैत्रिणीचा विवाह कधीं होईल तो. नवऱ्याच्या काळजीमुळं माझी बाई कशी अगदीं झुरत चालली आहे."

सरलेचा हात आपल्या हातांत घेऊन वेडी न्याहाळून पाहूं लागली. मधून मधून ती तिच्या मुखाकडे पाही, फिरून हाताकडे पाही. बराच वेळपर्यंत असा क्रम चालविल्यावर शेवटीं वेडी म्हणाली "बेटा, तुझ्या दैवांत काय आहे कांहीं कळत नाहीं. तुझं आयुष्यरूपी आकाश मेघांनीं व्यापिलं आहे. काळेकुट्ट ढग आणि घोर अंधकार यांखेरीज तिथं कांहींहि दिसत नाहीं. लवकरच भयंकर प्रळय पातणार आहे. त्यानंतर काय आहे कांहीं समजत नाहीं. या तीन दिवसांत मोठं तुफान उठणार आहे. करितां आजच तूं इथून पळून जा, पळून जा, पळून जा!"

वेडीचें हें भाषण ऐकतांच सरला भ्याली. आपल्या प्रिय सखीची ती अवस्था पाहून अमला वेडीस उद्देशून म्हणते "थांब सटवे, तुझी खोडकीच जिरवित्यें. मी विचारत्यें एक अन् आपण सांगते भलतंच! माझ्या मैत्रिणीचं लगीन कधीं होईल तें सांगण्याचं सोडून देऊन हिनं आपल्या आकाश, मेघ, अंधकार, तुफान, प्रळय यांच्याच गोष्टी चालविल्या आहेत!"

असें म्हणून अमला वेडीच्या अंगावर पाण्याचे शिंतोडे उडवूं लागली. वेडी एकएक पाऊल मागें हटत दूर जाऊन उभी राहिली व तेथून पुनः सरलेला उद्देशून म्हणाली "पळून जा! पळून जा!! पळून जा!!!"

इकडे हळूहळू घाटावर गांवांतील स्त्रियांची गर्दी होऊं लागली. शांती, लक्ष्मी, उमा, रमा, तारा, हरीची आई इत्यादि सुंदरी एकामागून एकेक येऊन आपल्या शुभागमनानें घाटाची शोभा वृद्धिंगत करूं लागल्या. हांहां म्हणतां तेथें एकच गडबड होऊन गेली. कोणी भांडीं घासूं लागल्या, कोणी लुगडीं धुऊं लागल्या, कोणी उभ्या राहून नुसत्या चकाट्या हांकूं लागल्या. सारांश, तेथें एकच हलकल्लोळ माजून राहिला. आपल्या तीरावर जमलेला हा एवढा मोठा स्त्रीसमुदाय पाहून इच्छामती नदीहि द्विगुणित आनंदानें कलकल शब्द करूं लागली. यावेळीं तेथें जमलेल्या प्रौढ तरुण स्त्रियांनीं तर एकच कलकलाट

करून सोडला होता. तरुणी आपापल्या पतीविषयीं मैत्रिणींशीं गुलगुल गोष्टी करूं लागल्या; प्रौढ स्त्रिया परनिंदा करण्यांत दंग झाल्या. सरला आणि अमला आपापल्या घागरी पाण्यानें भरून घेऊन घरीं परतल्या.

अमलेच्या नवऱ्याला आमचे वाचक पूर्वीपासूनच ओळखित आहेत. नवीनदास गांवांतील चारचौघां प्रतिष्ठित मंडळींत मोडत असे. तो स्वभावानें अतीशय शांत आणि सरळ होता. त्याच्याजवळ विषयसंपत्तीहि बरीच होती. सरासरी शंभर बिघे जमीन, वीसपंचवीस गुरेंढोरें, चार पांच नांगर आणि धान्याचीं आठदहा कोठारें त्याच्या मालकीचीं होतीं. शेतीशिवाय तो थोडासा व्यापारउदीमहि करित असे. गांवांत अशीहि एक दाट वदंता होती कीं, नवीनदासानें बराचसा नगद ऐवज जमिनीमध्यें पुरून ठेविला आहे. याशिवाय त्याच्या बायकोच्या अंगावरहि बरेचसे दागदागिने होते. पहिली बायको निवर्तल्यावर बऱ्याच काळानें, ह्मणजे आपल्या वयाच्या पसतिसाव्या वर्षी, त्यानें अमलेशीं दुसरें लग्न केलें होतें. अमला त्यावेळीं दहा वर्षांची असेल. नवीनदास अजून कांहीं वृद्ध झाला नव्हता, तरी पण अमला आपल्या नवऱ्याला विनोदानें सर्वदा 'बुड्ढोबा' या नांवानेंच संबोधित असे. अमलेचें आपल्या पतीवर अतिशय प्रेम असे; परंतु ती फार विनोदप्रिय होती. 'बुड्ढोबा'ची सेवाशुश्रूषा करण्यांत ती दिवारात्र गढलेली असावयाची. परंतु त्याबरोबरच तिची थट्टाहि हरहमेष चालत असे. आणि अशा प्रकारची पत्नी मिळाल्यामुळें 'बुड्ढोबांच्या' आनंदास, सुखास व प्रेमास सीमा राहिली नव्हती.

सरला रुद्रपुरांत आल्या दिवसापासून अमला तिच्यावर आपल्या सख्ख्या बहिणीपेक्षांहि अधिक प्रेम करित असे. प्राणांपेक्षांहि जास्त ती तिच्यावर प्रीति करी. दुःखाच्या वेळीं सरलेचें तें निर्दोष, निर्मल बालमुख पहातांच अमला आपलें सर्व दुःख तत्काळ विसरून जाई.

सुखाच्या वेळीं सरलेचे ते प्रेमपूर्ण नेत्र अवलोकन करतांच अमलेचें सुख द्विगुणित होई. सहा वर्षेपर्यंत सतत एकत्र राहिल्यामुळें त्यांच्या प्रीतीस आतां पारावार राहिला नव्हता. वेळ सांपडतांच सरला अमलेच्या घरीं जाऊन बसे व अमलाहि सवडींत सवड काढून सरलेच्या घरीं जात असे. कधीं कधीं त्या दोघीहि माध्यान्हीं एखाद्या झाडाच्या शीतल छायेंत एकत्र बसून काम करित असत, तर कधींकधीं दोन दोन प्रहर रात्र होईपर्यंत त्या आपल्या एकट्याच बसून गोष्टी करित असत. एकीपासून दुसरीनें दूर व्हावें अशी एकीचीहि इच्छा नसे, व त्यामुळें त्यांच्या गोष्टीहि संपतां संपत नसत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, त्या शरीरानें जरी भिन्न होत्या, तरी पण त्यांचें मन, प्राण, हृदय हीं एकच होतीं.

महाश्वेता आणि ब्रह्मचारी दोघेंहि दाराबाहेर येताहेत, इतक्यांत सरला घरीं आली. आईला पाहून ती ह्मणाली "आई, आज तूं सगळी रात्र निजली नाहींस?"

महाश्वेतेनें उत्तर दिलें "नाहीं बेटा, ब्रह्मचारीबुवांबरोबर गोष्टी बोलत बसल्यें होत्यें. आज तुला नदीवरून यायला इतका उशीर कां लागला? सूर्य किती वर आला पहा."

"हो, खरंच, आज उशीर झाला. आज किनई विश्वेश्वरी नांवाची एक वेडी घाटावर आली होती." इतकें म्हणून सरलेनें घाटावर घडलेला सर्व वृत्तांत आपल्या आईला निवेदन केला. तें ऐकतांच महाश्वेता फार घाबरली. विश्वेश्वरीचा तिनें पुष्कळ शोध करविला, परंतु कांहीं पत्ता लागला नाहीं.

संध्याकाळ झाली होती. रोजच्या नियमाप्रमाणें महाश्वेता नदीवर स्नान करावयास गेली होती. घरांत सरला एकटीच कांहीं काम करित बसली होती. सर्व दिवसभर कामकाज करून थकल्यामुळें ह्मणा, अगर बराच वेळपर्यंत एकटी बसल्यामुळें ह्मणा, यावेळीं सरलेचें मुखमंडल

किंचित् म्लान झालेलें दिसत होतें. जणो संध्याकाळचे छायेबरोबर सरलेच्या हृदयांतहि छाया हळू हळू दाट होत होती. चिंता कशाला ह्मणतात, दुःख ही काय वस्तु आहे, हें त्या निर्दोष बालिकेला हा कालपर्यंत मुळींच ठाऊक नव्हतें. तथापिहि तिचें हृदयाकाश जणों लहान लहान मेघांनीं व्याप्त होत चाललें होतें.भविष्यकाळाची तिला कांहीं भीति नव्हती; तिला कोणती मानसिक पीडाहि नव्हती; तत्रापि तिचें हृदय आपोआप भारग्रस्त होऊं लागलें; सरलेच्या कपाळावर घर्मबिंदु चमकत होते. या वेळीं ती एकटीच कांहीं काम करित बसली होती व अत्यंत मृदुस्वरांत कुठलेंसें एक दुःखाचें गाणें पुनःपुनः घोळूनघोळून म्हणत होती. गानकुशल भृंगाच्या मंजुळ गुंजारवाप्रमाणें सरलेची या वेळीं गुणगुण चालली होती. गाणें एकवार संपलें, दोनवार संपलें, तीनवार संपलें, तरीपण तिच्याकडून तें पुनः चौथ्यांदा म्हणण्याची तयारी होतीच. इतक्यांत पाठीमागून कोणीं हांक मारली "सरले?"

ही हांक मारणारा एक तरुण युवक होता. या तरुणाचें वय विसांच्या सुमारें असेल. त्याचें मुखमंडल अत्यंत सुंदर, तेजस्वी आणि औदार्यव्यंजक, परंतु यावेळीं तें किंचित् म्लान आणि गंभीर दिसत होतें. बऱ्याच दिवसांपासून केंसांची कांहीं एक काळजी न घेतल्यामुळें ते आज पुष्कळच मलिन झाले होते व त्यामुळें तरुणाचें मुख अधिकच उदासीन दिसत होतें. त्याचे दोन्ही डोळे तेजःपुंज होते, परंतु दारिद्र्य अगर चिंता किंवा अशाच कसल्यातरी कारणामुळें त्यांच्यासभोंवतीं काळिमा पसरलेली होती. ललाट प्रशस्त, वक्षस्थल उन्नत आणि विशाल, बाहुयुगल दीर्घ, शरीर गंभीर, शांत आणि सतेज होतें. सारांश, त्याची एकंदर मुद्रा पहातांच तो वीर पुरुष असावा, असा तत्क्षणीं बोध होत असे. सरला गाणें म्हणत होती तोंपर्यंत आंगतुक तिच्यामागें अगदीं स्तब्धपणें उभा राहून अनिमिष लोचनांनीं तिच्याकडे पहात होता. जणूंकाय सरलेच्या त्या करुणाव्यंजक गायनामुळें आगंतुकाच्या

हृदयांत घोर चिंतेचा प्रादुर्भाव झाला होता. याप्रमाणें बराच वेळ स्वस्थपणें उभे राहून शेवटीं तरुणानें हांक मारिली "सरले?"

सरला एकदम दचकून मागें वळून ह्मणाली "कोण! तुह्मी का ते?"

"सरले! संसाराविषयीं तूं इतकी का उदासीन झाली आहेस कीं, पुनःपुनः तेंच तें दुःखाचें गाणें ह्मणत असतेस?"

"नाहीं हो, तसं कांहीं नाहीं. मला आपलं हें एकच गाणं येतं, ह्मणून तेंच तें घोळून घोळून ह्मणल्यें, झालं. अमलाताईनं मला पुष्कळशीं गाणीं शिकविलीं होतीं; पण त्या सर्वांत मला हेंच फार आवडलं, ह्मणून मीं तें पाठ केलं. जेव्हां एकटी असल्यें, तेव्हां आपली आवडीनं ह्मणत असल्यें. मला काय बाई ठाऊक तुह्मी लपून माझं गाणं ऐकत आहां तें?" इतकें ह्मणून तिनें मान खालीं घातली.

कांहीं वेळानें ती पुनः ह्मणाली "आई पूजा करायला गेली आहे; मोलकरीण बाजारांत गेली आहे. तुह्मी क्षणभर बसा इथं, मोलकरीण आत्तां येईल."

एवढा वेळपर्यंत सरला आपल्या झोंपडींत एकटीच असल्यामुळें तिचें मुख म्लान झालें होतें; परंतु आज पुष्कळ दिवसांनीं तिला आपल्या चिरपरिचित सुहृदाची अवचित भेट झाल्यामुळें तिचें मुखकमल तत्काळ हर्षप्रफुल्ल झालें. आनंदानें व उत्सुकतेनें ती त्याच्याशीं बोलूं लागली. सरलेच्या गोष्टी त्या काय असणार? सरलचित्त बालिकांच्या ज्या गोष्टी असतात, त्याच सरलेच्याहि होत्या. प्रथम ती आपल्या आईविषयींच्या गोष्टी सांगूं लागली. नंतर आपल्या कामकाजासंबंधीं बोलूं लागली. नंतर त्या तरुणाला आपल्या त्या लहानशा बागेंत नेऊन आपण स्वतः लाविलेलीं फुलझाडें दाखवूं लागली. अत्यंत प्रेमानें आणि उत्सुकतेनें युवक तें ऐकत होता आणि पहात होता. हळूहळू दाट झाडांमधून क्षितिजाजवळ पूर्णचंद्र दिसूं लागला. प्रथम आकाश सुवर्णवर्ण दिसूं लागलें. नंतर क्रमाक्रमानें चंद्रकिरण वृक्षांच्या

दाट पानांतून खालीं येऊं लागले. लवकरच पूर्णचंद्र नील आकाशांत बराच उंच चढून आला, व आकाश सर्व प्रकाशमय दिसूं लागलें. त्या निर्मल चंद्रप्रभेंत सरलेचें मुख अधिकच मोहक दिसूं लागलें. स्मितहास्यानें सर्वदा युक्त असणारे तिचे ओष्ठ यावेळीं अधिकच सुधामय दिसूं लागले. स्थिर आणि शांत ज्योतिर्मय नयनांत प्रेमरस अधिकच उचंबळूं लागला. त्या तरुणाच्या मुखांतून एकहि शब्द बाहेर पडेना. तो अगदीं स्तब्धपणें उभा राहून अत्यंत प्रेमयुक्त दृष्टीनें सरलेकडे पहात होता. जणूंकाय तो आपली प्रेमपिपासा शमविण्याकरितां आतुर नयनांनीं तिच्या त्या सौंदर्यसागराचें भराभर प्राशन करित होता. परंतु जों जों तो तिच्याकडे पाही, तों तों त्याला त्या लावण्यलतिकेवरून आपली दृष्टी हलवूंच नये असें वाटे. भ्रमरासारखे तिचे ते काळेभोर कुरळ केश, त्या कमानदार भुवया, ते प्रेमप्रफुल्ल नेत्र, सुधारसानें थबथबलेले ते स्मितमधुर ओष्ठ व तें चित्ताकर्षक, मोहक मुखमंडल यांनीं त्याला आपल्या अजब जादूनें जागच्याजागीं खिळून टाकिलें होतें. एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणें तो वेड्यासारखा अगदीं निश्चल उभा होता. बऱ्याच वेळानंतर तो झोंपेंतून एकदम दचकल्यासारखें करून ह्मणाला "सरले!"

इंद्रनाथाचा तो गंभीरस्वर श्रवण करतांच सरला किंचित् विस्मित होऊन त्याच्या मुखाकडे पाहूं लागली. तिनें पाहिलें, इंद्रनाथांचें आधींच म्लान असलेलें मुख आतां अधिकच म्लान झालें आहे.

इंद्रनाथ पुनः ह्मणाला "सरले, मला वाटतें, आतां ही आपली शेवटचीच भेट!"

त्याचें हें भाषण ऐकतांच सरलेचे प्रफुल्ल नयन अश्रूंनीं भरून आले. व्यथितचित्तानें तिनें विचारलें "कां? तुह्मी आतां रुद्रपुरांत रहाणार नाहीं?"

इंद्रनाथ ह्मणाला "नाहीं. आतां मला इथें रहातां येत नाहीं. कां तें तुला मागाहून कळेल."

"असं कां बरं? तुह्मांला इथं रहाण्यांत कांहीं त्रास होतो का? मग आमच्या घरीं कां रहात नाहीं? मी आईला सांगेन. ती मोठ्या आनंदानं कबूल करील. आमचं जें कांहीं थोडकंसं उत्पन्न आहे त्यांत तुह्मांला सुखानं रहातां येईल. कांहीं कमी पडणार नाहीं."

"सरले, तूं दयेची मूर्ति आहेस, स्नेहाची पुतळी आहेस. तुझ्या प्रेमाला पारावार नाहीं. माझे कसलेच हाल होत नाहींत. नवीनदासाच्या घरीं मी पाहुणा आहें. तुझी मैत्रीण अमला माझ्यावर सख्ख्या बहिणीपेक्षांहि अधिक लोभ करिते, हें तुला ठाऊकच आहे. आणि यदाकदाचित् तिच्या घरीं माझी सोय नसती झाली, तरी मला इथें आणखी पुष्कळ ठिकाणीं रहातां आलें असतें; परंतु हें गांव सोडून जाण्याचा माझा दुसराच कांहीं हेतु आहे."

"मग तुह्मी खरोखरच जाणार?"

"मी इथून गेल्यानें तुला कष्ट का होतील?"

"हें काय बरं विचारतां? मला आणखी कोण आहे?"

"सरले, तुझें हें दुःख पाहून माझें हृदय फाटून जातें. परंतु काय करूं? मला आतां इथें मुळींच रहातां येत नाहीं. दे, गडे मला निरोप दे! माझें काम सफळ झालें आणि मी जीवंत राहिलों तर तुला पुनः भेटेन; नाहींतर हीच शेवटची भेट समज." असें म्हणून त्यानें एक लांबचलांब सुस्कारा सोडला.

इंद्रनाथाच्या मुखावाटे पुढें शब्द निघेना. सरलेच्या प्रशांत, नीलोत्पलसदृश नयनांतून घळघळ अश्रु वाहूं लागले. सरलेचें इंद्रनाथावर भावाप्रमाणें प्रेम असे. बंधुप्रेमाव्यतिरिक्त आणखी एखाद्या विशिष्ट प्रेमानें आपल्या हृदयमंदिरांत प्रवेश केला आहे, हें बिचाऱ्या त्या निर्दोष

बालिकेला हा कालपर्यंत ठाऊकहि नव्हतें. इंद्रनाथाचा वियोग होतांना आपल्यास इतकें दुःख होईल, हें तिच्या कधीं स्वप्नांतहि आलें नव्हतें.

त्या पौर्णिमेच्या रात्रीं, चंद्राच्या शुभ्र चांदण्यांत, एकांत उद्यानांत, परस्परांचे हात धरून तीं उभयतां एकमेकांच्या वदनमंडलांचें निरीक्षण करित बराच वेळपर्यंत अगदीं स्तब्ध उभीं होतीं. परस्परांच्या दर्शनामृताचें तीं सतृष्ण नयनांनीं पान करूं लागलीं. शेवटीं त्या निस्तब्धतेचा भंग करून इंद्रनाथानें स्नेहभरानें सरलेच्या नेत्रांतील अश्रुबिंदू पुसून काढले आणि तिला धीर देऊन ह्मटलें "सरले, मी धर्माच्या गौरवाकरितां, पाप्याच्या शासनाकरितां जात आहें. परमेश्वर मला अवश्य साह्य करील. त्याचें साह्य असल्यावर मग भीति कोणाची? स्वीकृतकार्यांत मला अवश्य यश येईल व मी तुला परत येऊन भेटेन."

सरला किंचित् शांत होऊन ह्मणाली "पण कधीं याल?"

"सहा महिन्यांनीं मी परत येईन. आज पौर्णिमा आहे. आजच्या सातव्या पौर्णिमेस मी तुला येऊन भेटेन. नाहीं आलों, तर समज कीं, इंद्रनाथ आतां या जगांत राहिला नाहीं."

इतक्यांत घराचें बाहेरलें दार खडखडलें. मोलकरीण आली असावी असें वाटून सरला दार उघडावयास गेली. ती जात असतां इंद्रनाथ तिच्याकडे अनिमिष लोचनांनीं पहात होता. पहातां पहातां तो मनांतल्यामनांत ह्मणाला "परमेश्वरा, हें रमणीरत्न प्राप्त करून घेण्याच्या कामीं मला साह्य दे. ह्या रत्नास मी अंतरलों तर माझें हृदय मरु भूमी प्रमाणें शुष्क होईल. निराशेनें माझें जीवित व्यर्थ होईल."

## प्रकरण ६ वें.

## रुद्रपुराहून गमन.

And there were sudden partings, such as press
The life from out young hearts, and choking sighs
That ne'er might be repeated. Who could guess,
If e'er again should meet those mutual eyes,
Since upon a night so sweet such awful morn could rise.

*Byron.*

राजा समरसिंहराय हे बंगाल्यांतील समस्त जमीदारांचे वैभवाचे वेळीं सल्लागार मित्र आणि विपत्तीचे वेळीं साह्यकर्ते बंधु होते. त्यांनीं आपल्या साहसानें आणि बाहुबळावर जी ख्याति आणि जें सामर्थ्य संपादन केलें होतें, त्यांचा ते सर्वदा आपल्या धर्मनिष्ठ जमीदारादि बांधवांचें यश आणि गौरव वाढविण्यांतच सदुपयोग करित असत. संकटसमयीं ज्याच्यावर राजा समरसिंहाचे उपकार झाले नाहींत, असा साऱ्या बंगाल देशांत एकहि जमीदार नव्हता. इच्छापूरचा लोकप्रिय जमीदार नगेंद्रनाथ चौधुरी, याच्यावरतर समरसिंहाची विशेषच मर्जी होती. नगेंद्रनाथहि समरसिंहावर आपल्या वडील भावाप्रमाणें प्रेम करी व त्याच्या अनुमतिखेरीज कोणच्याहि कामास हात घालित नसे.

राजा समरसिंहाच्या वधानंतर त्याची विधवा राणी महाश्वेता आणि राजकुमारी सरला, यांचा नगेंद्रनाथानें पुष्कळ शोध करविला; परंतु त्या दोघी गुप्त वेश धारण करून चतुर्वेष्टित दुर्गांतून कोणीकडे निघून गेल्या, त्याविषयीं कोणासच कांहींएक ठाऊक नसल्यामुळें त्यांचा पुष्कळ तपास केला असतांहि पत्ता लागला नाहीं. शिवाय राजा समरसिंहाच्या कन्येविषयीं आपला आदर दिसल्यास दिवाण सतीशचंद्राची आपल्यावर विनाकारण गैरमर्जी होईल, या भीतीनेंहि नगेंद्रनाथानें आपल्या अंतःकरणांतील त्यांच्याविषयींचा स्नेह किंचित् कमी करून त्या दोघींचा तपास करण्याचें पुढें सोडून दिलें. मनुष्य-हृदयांतील स्नेहरज्जु अति सूक्ष्म आणि क्षणिक असतो. परंतु

स्वार्थपरता मात्र तितक्याच उलट प्रमाणानें प्रबळ आणि दृढ होते. दिवसेंदिवस नगेंद्रनाथ आपलें ऐश्वर्य आणि गौरव वृद्धिंगत करण्यांतच निमग्न होऊं लागला. ज्यायोगें आपली संपत्ति, सन्मान आणि सामर्थ्य हीं वाढतील, जेणेंकरून आपल्यावर बंगालदेशाचा सर्व सत्ताधीश दिवाण सतीशचंद्र याची अधिकाधिक मर्जी बसेल, अशाच प्रकारचे त्याचे प्रयत्न अहर्निश चालू झाले. दिवसेंदिवस नगेंद्रनाथाला समरसिंहाच्या हतभागिनी विधवेचें आणि निराश्रित कन्येचें विस्मरणच होत चाललें. एका वर्षाच्या आंतच तो शोकजनक प्रकार नगेंद्रनाथाच्या स्मृतिपथांतून अजीबात निघून गेला. राजा समरसिंह याची कोणीएक अनाथ विधवा आणि निराधार कन्या या जगांत आहे, ही गोष्टदेखील बिचाऱ्याच्या स्मरणांत राहिली नाहीं.

सहृदय वाचकांनो! नगेंद्रनाथाच्या या विचित्र वर्तनाबद्दल आपण त्याच्यावर कृतघ्नतेचा आरोप लादून त्याचा तिरस्कार करण्याची एवढ्यांतच घाई करूं नका. आपल्या तिरस्कारास एकटा नगेंद्रनाथच पात्र नाहीं. या अखिल भूमंडलावर क्षणभर दृष्टि फेंकिल्यास आपल्याला येथें कितीजण बरें आपल्या उपकारकर्त्यांचे पूर्व उपकार स्मरून प्रत्युपकारानें त्यांची फेड करण्याकरितां स्वहितावर जलांजली देणारे दिसतील? आपल्यावर दुसऱ्यानें केलेले उपकार स्मरून आपल्या स्वार्थसाधनापासून किती महाभाग विरत होत असतील? स्नेह, दया, माया ह्या सर्व स्वर्गीच्या वस्तु होत. स्वार्थपरतेसारखा प्रबळ प्रतिद्वंद्वी मिळाल्यास स्नेह किती दिवस टिकणार आहे? मायेचें स्थान दृष्टिआड झाल्यास माया किती दिवस टिकणार आहे? प्रिय वाचकहो! तुह्मींआह्मीं नगेंद्रनाथाचा तिरस्कार करूं नये, हेंच बरें. कारण आपणतरी त्या अपराधापासून दूर आहोंत काय? आज कितीतरी आपले निर्धन बंधुबांधव, इष्टमित्र, आप्तस्वजन आपल्या साह्याची चातकाप्रमाणें अपेक्षा करित आहेत! कितीतरी आपल्या निराधार अनाथ विधवा

भगिनी आपल्या आयुष्याचे खडतर दिवस महायातनांत आणि कष्टांत कंठित आहेत! या दुःखपूर्ण, क्लेशमय संसारांत चोहोंकडे दुःखांच्या राशींच्या राशी दिसत आहेत. त्या समस्त दुःखांचें निवारण करणें व्यक्तिमात्रास असाध्य आहे, अशक्य आहे, ही गोष्ट खरी; परंतु एखाद्या क्षुधार्तास अन्नदान करून त्याच्या आत्म्यास आपण संतोष दिला, एखाद्या तृषार्तास स्नेहवारी पाजून आपण त्याची तृषा शांत केली, एखाद्या हतभागिनीचें दुःखाश्रुमोचन करण्यासाठीं आपण आपला हात पुढें केला, तर आपल्या जन्माचें सार्थक होणार नाहीं काय? आह्मीं आपलें कर्तव्य योग्य रीतीनें केलें असें होणार नाहीं काय? पण आपण प्रस्तुत काय करित आहों? स्वसुखसाधनापलीकडे आपल्या आप्तेष्टमित्रांचें महद्दुःख आह्मांला कोठें दिसत आहे? नाटकजलशांतील गायनाच्या नादानें बधिर झालेल्या आमच्या कानांला आमच्या अनाथ विधवाभगिनींचा आर्तरव कोठें ऐकूं येत आहे? मग बिचाऱ्या नगेंद्रनाथानें याहून अधिक तें काय केलें? आणि त्याचा तिरस्कार करण्यास आम्हांला काय अधिकार पोंचतो?

परंतु नगेंद्रनाथाचा पुत्र सुरेंद्रनाथ यानें मात्र खरोखर या जगांत आपल्यास धन्य करून घेतलें होतें. धनवान् जमीदाराचा पुत्र असतांहि त्याला धनाविषयीं गर्व नव्हता. थोर वंशांत जन्म ग्रहण केला असतांहि गरीब शेतकऱ्यांशीं गप्पागोष्टी करण्यांत आपण कांहीं हीनपणाचें कृत्य करित आहों, असें त्याला वाटत नसे. तो बहुधा त्यांच्याच संगतींत रहात असे. सुरेंद्रनाथ शेतकऱ्यांविषयीं फारच कनवाळू असे. कितीतरी वेळां गुप्त वेषानें गांवोगांव फिरून शेतकऱ्यांशीं त्यानें गप्पागोष्टी केल्या असतील. सायंकाळीं जेव्हां शेतकरी लोक आपापल्या झोंपडींत घरांतील सर्व माणसांसह शेगडीसभोंवतीं बोलत बसत, कुरणांतून चरून आलेलीं गुरें जेव्हां गोठ्यांत आपापल्या

ठिकाणावर जाऊन उभीं रहात, तेव्हां सुरेंद्रनाथ या झोंपडींतून त्या झोंपडींत, त्या झोंपडींतून दुसऱ्या झोंपडींत फिरतांना, झोंपडींतील मंडळीशीं नानातऱ्हेच्या गप्पागोष्टी करतांना,त्यांनां उपदेश देतांना, नेहमीं दृष्टीस पडावयाचा. युगानुयुगें दारिद्र्यानें गांजिलें असतांहि शेतकऱ्यांची ती सदा संतुष्टवृत्ति, अज्ञानी असतांहि त्यांची ती पापभीरुता, संकटांत, विपत्तींत दृष्टोत्पत्तीस येणारें तपस्व्याप्रमाणें त्यांचें अढळ धैर्य आणि सहिष्णुता तो कौतुकानें लक्ष्यपूर्वक अवलोकित असे. अमुक गांवांत विहीर खोदताहेत, अमुक गांवांत धान्य फार महाग झालें आहे, फलाण्या गांवचा सावकार मोठा दयाळू आहे, फलाण्या गांवचा कारभारी शेतकऱ्यांनां गांजित आहे, ह्या व असल्याच प्रकारच्या आणखी पुष्कळ गोष्टी सुरेंद्रनाथ अगदीं लक्ष्य देऊन ऐकत असे. अशा वेळीं तो आपल्या श्रीमंतीचा सर्व डौल विसरून जाई. आपल्या उच्च दर्ज्याचें त्याला विस्मरण होई. नयनाल्हादकर अशा शेतांनीं वेष्टिलेल्या आणि आंबराईनें आच्छादिलेल्या त्या झोंपड्यांतील शेतकरी मंडळीस आपल्या बंधूप्रमाणें समजून त्यांनां तो वारंवार साह्य करित असे.

महाश्वेता चतुर्वेष्टित दुर्गांतून आपल्या लहान कन्येसह गुप्त वेषानें निघून गेल्याचें ऐकतांच सुरेंद्रनाथ त्या दोघी मायलेंकींच्या शोधार्थ आपल्या घराचा, वैभवाचा, आईबापांचा त्याग करून गांवो-गांव रानावनांतून भटकूं लागला. त्यावेळीं महाश्वेता इच्छामती नदीच्या तीरावर महंत चंद्रशेखर याच्या आश्रयानें महेश्वर मंदिरांत राहत होती. फिरतफिरत सुरेंद्रनाथ तेथें येतांच महाश्वेतेची व त्याची भेट झाली. आपल्या घरीं येण्याविषयीं त्यानें महाश्वेतेला पुष्कळ आग्रह केला; परंतु त्या मानी स्त्रीनें तें कबूल केलें नाहीं. दुर्धर दरिद्रावस्थेंतहि ती मानी स्त्री आपला अभिमान विसरली नव्हती. सुरेंद्रनाथ तिला अतिशयच आग्रह करूं लागला, तेव्हां निश्चयानें आपली असंमति

प्रगट करून शेवटीं महाश्वेता ह्मणाली "राजा समरसिंहाचा वंश अशा दरिद्रावस्थेंतहि आपला मानीपणा विसरणार नाहीं व दुसऱ्याच्या घरीं तुकडे मोडित बसणार नाहीं !"

तिच्या ह्या विलक्षण करारी स्वभावापुढें सुरेंद्रनाथाचे सर्व उपाय खुंटले. शेवटीं त्यानें महाश्वेतेला ह्मटलें "तुमच्या यजमानाचे आमच्यावर अनंत उपकार झाले आहेत, त्यांचे आह्मी अत्यंत ऋणी आहों. अशा संकटसमयीं मला जर आपल्या उपयोगी पडतां आलें नाहीं, तर माझा जन्म अगदीं फुकट गेला, असेंच मी समजेन. आपणास माझ्या घरीं रहायचें नसल्यास दुसरी कांहींतरी सेवा मला सांगा."

महाश्वेतेनें उत्तर दिलें "इतका जर तुमचा आग्रहच आहे, तर मला रहाण्याकरितां तुमच्या जमीदारींत कुठंहि एखादी जागा द्या. तिचा योग्य कर दरसाल मी चुकता करीन. तसंच कुठं नदीवर मला एक लहानसं शिवमंदिर तयार करून द्या, तिथं मी रोज रात्रीं पूजा करीन. याखेरीज मला आणखी कशाचीहि गरज नाहीं."

त्याप्रमाणें सुरेंद्रनाथानें इच्छामतीच्या तीरावर रुद्रपुरगांवीं एक शिवमंदिर बांधून दिलें व तेव्हांपासून महाश्वेता आपल्या कन्येसह रुद्रपुरांत राहूं लागली.

महंत चंद्रशेखर याच्याकडे सुरेंद्रनाथ आला होता तो वेष पालटून आणि इंद्रनाथ हें नांव धारण करून आला होता. गुप्त वेषांतच देशोदेशीं फिरून त्यानें महाश्वेतेचा तपास काढला. गुप्त वेषांतच त्याची सरलेबरोबर त्या निर्जन स्थानांत प्रथम भेट झाली. इच्छामतीच्या तीरावर किती वेळांतरी तो सरलेबरोबर खेळला होता. किती वेळांतरी त्यानें तिला मौजेच्या गोष्टी सांगितल्या होत्या व किती वेळांतरी तिला प्रेमानें कडेवर घेऊन तिचें चुंबन घेतलें होतें. अशा स्थितींत सहा वर्षेपर्यंत त्यांच्यामध्यें बहिणभावांचें प्रेम वृद्धिंगत झालें होतें. त्या भ्रातृभगिनीप्रेमाव्यतिरिक्त दुसऱ्या एखाद्या विशिष्ट

प्रेमाचा आपल्या हृदयांत उदय झाला आहे, हें आजच्या त्या पौर्णिमेच्या रात्रीं झालेल्या भेटीच्यापूर्वी त्यांच्यापैकीं एकासहि ठाऊक नव्हतें.

दोन प्रहर रात्रीं महाश्वेता आपली पूजाअर्चा आटपून घरीं आली. इंद्रनाथ तिचा निरोप घ्यावयाकरितां हा वेळपर्यंत तिची मार्गप्रतीक्षा करित बसला होता. महाश्वेता येतांच तो तिला ह्मणाला "आपण धारण केलेल्या व्रताच्या प्रभावानें सतीशचंद्राचें निधन झालें नाहीं तर मला सरलेचें पाणिग्रहण करतां येणार नाहीं, असेंच ना ?"

"होय, असंच."

"ठीक आहे तर. मला आशीर्वाद द्या. मी आजच त्या कार्याकरितां इथून प्रयाण करणार आहें. आपला आशीर्वाद मिळाल्यास माझे मनोरथ अवश्य सफळ होतील."

महाश्वेता गंभीर स्वरानें ह्मणाली "जा, मी तुह्मांला अंतःकरण-पूर्वक आशीर्वाद देत्यें. देवाधिदेव महेश्वर तुह्मांला तुमच्या प्रयत्नांत यश देईल. परंतु अजून तुह्मी बालक आहां; या दुष्ट जगाचा तुह्मांला अद्यापि लेशभरहि अनुभव नाहीं. त्या धूर्त, कपटी दिवाणाचं पारिपत्य तुमच्यानं कसं होईल हें मला कळत नाहीं."

"तें सध्या मलाहि पण कळत नाहीं. परमेश्वर काय करील तें खरें."

"तुह्मांला यश मिळेल, यांततर संशय नाहीं. धर्माचा जर जय होणार नाहीं, तर या जगाचा अंत होण्यास कितीसा उशीर लागेल ? मग परमेश्वरासतरी कोण मानील व त्याची आराधनातरी कोण करील ?"

इंद्रनाथ क्षणैक स्तब्ध राहून नंतर म्हणाला "धर्माचा जर सदा-सर्वदा जयच झाला असता, तर आपले यजमान राजा समरसिंह यांचा असा भयंकर वध कधींहि होताना! दुष्ट सतीशचंद्र या बंग-देशाचा दिवाण कधींहि झाला नसता! धर्माच्या जयाची शाश्वती असती, तर मनुष्यजातीनें कधींहि धर्मपथाचा त्याग केला नसता. चोहींकडे पापाचा बडेजाव होत आहे; दुष्ट, कपटी, अत्याचारी व

विश्वासघातकी यांनां जिकडेतिकडे मान, सन्मान, धन, आणि ऐश्वर्य मिळत आहे; व परम धार्मिक, सच्छील आणि परोपकारी अशा मनुष्यांची पूर्ण विडंबना होत आहे, त्यापक्षीं या जगांत भल्याबुऱ्याची दुनिया कुठें राहिली? जर नेहमीं धर्माचाच जय होता तर पातक, विश्वासघातकता, कपटाचरण यांचा या जगांतून केव्हांच नायनाट झाला असता. या जगांत नेहमीं अधर्माचाच जय झालेला दिसतो. असें कां व्हावें, हें कोणासहि सांगतां येत नाहीं! खरोखर, परमेश्वराची लीला अगाध आहे."

नंतर महाश्वेतेनें इंद्रनाथास विश्वेश्वरी वेडीची सर्व हकीगत कथन केली. इंद्रनाथ विस्मित होऊन ह्मणाला "ही वेडी मनुष्य आहे, कीं योगिनी आहे, कीं पिशाची आहे, आहेतरी कोण? तिचें भाकीत कदापिहि खोटें होत नाहीं."

"ती सांगत्ये तें अगदीं खरं ठरतं, याचा अनुभव मलाहि कित्येक वेळां येऊन चुकला आहे. माझ्या पतीचा वध होण्यापूर्वींच तिनं त्यासंबंधीं भविष्य वर्तविलं होतं. मीं त्यांनां तें सांगितलं होतं व किल्ल्यांतून सहपरिवार पळून जाण्याविषयीं वारंवार उपदेशहि करित होत्यें. पण त्यांनीं कांहीं तें ऐकिलं नाहीं. त्या वीर पुरुषानं वीराला साजेल असंच उत्तर दिलं व तें अजून माझ्या कानांत कसं घुमत आहे! ते ह्मणाले 'हिंदु काय, मुसलमान काय, मोंगल काय किंवा पठाण काय, कुणींहि हा दिवसपावेतों समरसिंहास घनघोर संग्रामक्षेत्रांतून पळून जातांना पाहिलं नाहीं; तो आज पामर सतीशचंद्राच्या भीतीनं का आपल्या किल्ल्यांतून पळून जाईल? मरावंच लागलं तर खुशाल मरेन! वीर मृत्यूला डरत नाहीं!"

इंद्रनाथ म्हणाला "आणखीहि तिनें असेंच एकदोन वेळां सांगितलेलें भविष्य खरें झालें आहे. माझीतर तुह्मांला अशी सल्ला आहे कीं, तुह्मीं आजच्याआज हें गांव सोडून कुठेंतरी दुसरीकडे जाऊन रहावें."

महाश्वेता विचारांत मग्न झाली. वेडी आजच्यासारखीच दोनतीनदा आकस्मिक येऊन तिनें जें जें भविष्य वर्तविलें होतें, तें तें पुढें अगदीं खरेंच झालें. आपल्यावर कांहींना कांहींतरी संकट कोसळणार, हें खास. त्या दुष्ट सतीशचंद्राचेंच हें कांहींतरी कारस्थान असावें. ती वेडी मनुष्य असो, कीं पिशाची असो, तिला त्या कारस्थानाची खबर लागली व ती आज आपणांस सावध करावयास येथें आली. असा विचार करून महाश्वेता ह्मणाली "इथून आजच पळून गेलं पाहिजे; त्यावांचून गत्यंतर नाहीं."

इंद्रनाथानें विचारलें "कुठें जाणार? माझ्या घरीं यायला कांहीं हरकत आहे काय?"

महाश्वेतेनें उत्तर दिलें "महेश्वराच्या मंदिरांत महंत चंद्रशेखर यांजकडेच मी पुनः जाईन."

इंद्रनाथ किंचित् खिन्न झाला. नंतर तो कांहींएक बोलला नाहीं. आपल्या प्रवासाची तयारी करण्याकरितां तेथून निघून गेला.

नंतर महाश्वेतेनें सरलेस निजलेली उठवून आपला सर्व बेत कळविला. तें ऐकतांच सरलेचें प्रफुल्ल मुखकमल किंचित् म्लान झालें. रुद्रपुर गांवीं एकसारखीं सहा वर्षें राहिल्यामुळें तिच्या मनांत प्रत्येक वस्तूविषयीं प्रेम उत्पन्न झालें होतें. ती सुखकर झोंपडी, तें सुंदर परसूं, आपल्या हातांनीं लावलेलीं तीं गुलाब, मोगराप्रभृति फुलझाडें, तीं डाळिंब, अननस, पेरूप्रभृति फळझाडें, या सर्वांला आतां आपणास मुकावें लागणार! सकाळीं उठतांच रुद्रपुरांतील पक्ष्यांचें तें सुललित गान आतां आपल्यास ऐकूं येणार नाहीं! दोनप्रहरीं त्या आम्रवृक्षाच्या दाट व शीतल अशा एकांत छायेमध्यें बसून काम करावयास आतां आपणांस मिळणार नाहीं! संध्याकाळचे वेळीं अमलेचें तें सुमधुरहास्यविकसित मुखकमल आतां आपल्या दृष्टीस कसचें पडायला!—अमलेची आठवण होतांच तर सरलेच्या नेत्रांतून

अविरल अश्रुधारा वाहूं लागल्या. सद्गदित कंठानें तिनें म्हटलें "आई, मी अमलेचा निरोप घेऊन येत्यें."

महाश्वेता म्हणाली "जा बेटा, लौकर ये."

लगेच अमलेच्या घराच्या दाराजवळ जाऊन सरलेनें मंजुळ स्वरानें "ताई" अशी हांक मारली. अमला तत्काळ प्रफुल्ल वदनानें बाहेर आली. तिच्या मनांत या वेळीं आपल्या प्रिय मैत्रिणीची कांहींतरी थट्टा करावयाची होती, हें तिच्या त्या हास्यविकसित मुखकमलावरून स्पष्ट दिसत होतें. परंतु सरलेचें खिन्न मुख पाहतांच अमलेच्या मुखावरील मधुर हास्य एकदम अंतर्धान पावलें. तिची मुद्रा गंभीर झाली. नयनयुगलांतून टपटप गळत असलेल्या अश्रुजलानें सरलेचें वक्षस्थल भिजून चिंब झालें आहे हें पहातांच अमला सरलेच्याजवळ जाऊन स्नेहभरानें तिचे दोन्ही हात आपल्या हातांत धरून तिच्या मुखाकडे पहात म्हणाली "गडे, कायग झालं ?"

सरला सद्गदित स्वरानें म्हणाली "आई म्हणत्ये कीं आह्मांला आत्तांच्या आत्तांच हें गांव सोडून गेलं पाहिजे. गडे, तुझी माझी ही आतां शेवटची भेट!" इतकें ह्मणून तिनें आपलें मस्तक अमलेच्या वक्षस्थलावर ठेविलें व स्फुंदस्फुंदून ती रडूं लागली.

दोन प्रहर रात्रीच्या समयीं अकस्मात् ही निष्ठुरवार्ता श्रवण करितांच अमलेच्या मस्तकावर जणूं वज्रपात झाला. पहिल्यानेंतर तिचा त्या गोष्टीवर विश्वासच बसेना; परंतु सरलेची ती करुणास्पद स्थिति पाहून तिचा संशय लवकरच दूर झाला. आतां मात्र अमला आपला अश्रुवेग आवरूं शकली नाहीं. सरलेच्या मस्तकावरील केशांनां तिनें आपल्या उष्ण नयनजलानें स्नान घातलें.

बऱ्याच वेळानंतर महत्प्रयासानें आपल्या दुःखाचा कड आंतल्या आंत दाबून अमला ह्मणाली "गडे, तुझीमाझी हीच शेवटची भेट कां होईल ? तूं जिथं रहाशील तिथं मी येऊन तुला भेटत जाईन. तुह्मी हें गांव सोडून अशा एकदम कां बरं जातां ?"

सरला किंचित् शांत होऊन ह्मणाली "तें कांहीं मला ठाऊक नाहीं. आईनं त्याविषयीं मला कांहींहि सांगितलं नाहीं. आह्मी महेश्वराच्या मंदिरांत रहायला जाणार आहों."

"हात्तिच्या! महेश्वराचं मंदिर इथून दूर का आहे? मी तुला दररोज येऊन भेटत जाईन. विनाकारण एवढं दुःख कां करित्येस." इतकें म्हणून अमला किंचित् थांबली. मनांतल्यामनांत कांहीं विचार करून थोड्या वेळानें ती ह्मणाली "गडे, अंमळ थांब हं. मी आत्तां येत्यें." असें ह्मणून ती तडक घरांत गेली, आणि लवकरच बाहेर येऊन तिनें सरलेच्या पदरांत कांहीं बांधून दिलें.

सरलेनें विचारिलें "हें काय बांधलंस?"

अमला तत्काळ ह्मणाली "कांहीं नाहीं; वाटेंत तुला भूक लागेल, याकरितां थोडं फराळाचं बांधून दिलं आहे. तुला माझ्या गळ्याची शपथ आहे, नाहीं घेतलसं तर," असें ह्मणत तिनें तिच्या पदरांत दहा रुपये ठेवून गांठ मारली.

निरोप घेतेवेळीं अमला आपल्या सखीचा हात धरून ह्मणाली "गडे, तूं कष्टी होऊं नकोस. मी तुला महेश्वराच्या मंदिरांत रोज येऊन भेटत जाईन. तुला माझी विसर पडूं नये ह्मणून तुला मी ही माझी एक खूण देत्यें," असें ह्मणत तिनें आपल्या गळ्यांतील सोन्याची सरी काढून सरलेच्या गळ्यांत घातली. सरला पुष्कळ आढेवेढे घेऊं लागली. हें पाहून अमला ह्मणाली "तूं जर ही घेतली नाहींस तर मी समजेन कीं, तुझं माझ्यावर मुळींच प्रेम नाहीं. अन् तिथं जाऊन ही सरी परत करशील तर मी समजेन कीं तूं मला विसरून गेलीस."

अमलेनें इतकें निक्षून सांगितल्यावर सरला निरुत्तरच झाली. अमलेनें सरलेच्या गळ्यांत सरी घातली व अश्रुपूर्ण लोचनांनीं आपल्या प्रिय सखीस निरोप दिला.

इकडे इंद्रनाथानें घाटावर नौका तयार ठेविली होतीच. महाश्वेता, सरला व इंद्रनाथ हीं तिघें तींत बसतांच ती इच्छामतीच्या शांत पात्रावरून धीरे धीरे चालूं लागली. कोठें कोठें नदीचें पात्र फारच विस्तीर्ण झालें होतें. नदीच्या दोहों बाजूंस असलेलीं लांबचलांब मैदानें, अरण्यें, मोठमोठे गगनचुंबित वृक्ष व मधून मधून दृष्टीस पडणाऱ्या शेतकऱ्यांच्या झोंपड्या इत्यादि देखावा त्या स्वच्छ चंद्रप्रभेंत फारच शोभायमान दिसत होता. कोठें कोठें नदीचें पात्र इतकें अरुंद झालें होतें कीं, दोन्ही किनाऱ्यांवरील वृक्षांच्या फांद्या एकमेकांत अगदीं गुरफटून गेल्या असल्यामुळें जणों प्रेमभरांत आलेले हे वृक्ष परस्परांस बंधुभावानें प्रेमालिंगनच देत आहेत कीं काय, असें वाटे. त्यांच्या घनदाट पालवींतून मोठ्या सायासानें वाट काढून नदीच्या स्वच्छोदकांत डुंबत असलेल्या चंद्रिकांची जलक्रीडा फारच मनोहर दिसत होती. त्या आनंदानें बेहोष होऊन इच्छामती नदीहि कल कल शब्द करित वहात होती. तिच्या पृष्ठभागावर लहान लहान लाटा उठत होत्या. सृष्टिसुंदरीची ही अशा प्रकारची आल्हादजनक व चित्ताकर्षक शोभा पहातांपहातां, व नदीचा श्रुतिमनोहर, मंजुळ कलरव ऐकतां ऐकतां सरला गाढनिद्रेंत मग्न झाली. निर्मल चंद्र-प्रकाशांत अत्यंत मोहक दिसणाऱ्या तिच्या त्या वदनमंडलाकडे इंद्रनाथ समस्त रात्र डोळ्यांस डोळा न लावतां एकसारखा टक लावून पहात होता. प्रातःकाळीं नौका इच्छामतीच्या कांठावरील एका लहानशा गांवाजवळ येऊन उभी राहिली. या गांवापासून सुप्रसिद्ध महेश्वराचें मंदिर अर्ध कोश होतें. तें गांव निबिड अरण्यानें घेरलेलें असल्यामुळें त्यास वनग्राम ह्मणत असत. मंदिरांतून महंत चंद्रशेखर आणि इतर पुजारी लोक वरचेवर या गांवांत येऊन रहात असत. नौकेंतील मंडळी खालीं घांटावर उतरली व हळूहळू चालत चालत महेश्वराच्या मंदिरांत येऊन दाखल झाली.

## प्रकरण ७ वें.

## विमला.

Now naught was heard beneath the skies,
The sounds of busy life were still,
Save an unhappy lady's sighs,
That issued from the lonely pile.

*Mickle.*

संध्याकाळ झाला होता. विस्तीर्ण मैदानामध्यें आपले प्रचंड तटरूपी बाहु पसरून उभा असलेला 'चतुर्वेष्टित' दुर्ग—गड आणि त्या गडाला शोभविणारी सुंदर उंच हवेली दूरवर दिसत होती. यमुना नदी गडाला चारी बाजूंनीं वेढा घालून कलकल शब्द करित वहात होती. चारी बाजूंस दूरवर पसरलेलें आणि मनोहर हिरव्या गवतानें आच्छादिलेलें सुंदर मैदान, यावेळीं आनंदानें फिदीफिदी हंसत होतें. अखिल विश्वास सौभाग्य देणारा भगवान् सूर्यनारायण नुक्ताच अस्तास गेला होता; तथापि अद्यापिहि पश्चिम मेघ आरक्त दिसत होते. गडाच्या पायथ्याशीं शांत प्रवाहानें वहाणाऱ्या यमुनानदीच्या निर्मल, अगाध जलामध्यें पडलेल्या त्या आरक्त मेघांचें प्रतिबिंब या वेळीं फारच मनोहर दिसत होतें. हळुहळू अंधकार आपला अधिकाधिक अमल बसवूं लागल्यामुळें चोहों बाजूंस पसरलेल्या त्या निस्तब्धतेचें स्वरूप अधिकच गंभीर होत चाललें. मधूनमधून वायूच्या झुळकेबरोबर आसपासच्या गांवांतील गडबडीचा अस्पष्ट आवाज, आणि त्याचप्रमाणें आपापल्या घराकडे चाललेल्या परिश्रांत शेतकऱ्यांच्या श्रमपरिहार करणाऱ्या गायनांच्या लकेऱ्यांचा कानांवर येत असलेला मंजुळ प्रतिध्वनि यांशिवाय दुसऱ्या कशाचाहि शब्द ऐकूं येत नव्हता. सर्वत्र शांत भासत होतें. गडाच्या पश्चाद्भागाची शोभा तर याहून कांहीं निराळीच होती! तेथें यावेळीं विस्तीर्ण आम्रकाननाखेरीज आणखी कांहींहि दृग्गोचर होत नव्हतें. जों जों अधिकाधिक दाट अंधकार पसरूं लागला तों तों त्या आम्रवृक्षांवर काजव्यांचे पुंजच्यापुंज चमकूं लागले. आसपास, दूरवर, वरती खालीं,

जिकडे तिकडे त्या काजव्यांचा मनोहर प्रकाश लखलख करूं लागला. गडाच्या तटाच्या आंत एक रमणीय उद्यान असून त्याच्या मध्यभागीं एक सुंदर सरोवर होतें; सरोवराच्या स्वच्छ उदकांत आसपासच्या वृक्षांची छाया प्रतिबिंबित झाली होती. सरोवराच्या चारी बाजूंस नाना प्रकारच्या कीटकपतंगांनीं प्रेमभरांत येऊन आपापल्या स्वरानें सायं-कालचें कीर्तन आरंभिलें होतें. गडाच्या बाहेरून पहाणारांस दाट अंधकारामुळें यावेळीं गडांतील हवेली किंवा दुसरें कांहीं जरी बरोबरसें दिसत नव्हतें तरी तशा काळोखामध्येंहि त्या हवेलीच्या एका खिड-कींतून दिव्याचा स्वच्छ प्रकाश व त्या प्रकाशांत हातावर गाल टेंकून खिडकींत सचिंत उभी असलेली एक सुंदर तरुणी, स्पष्टपणें दिसत होती. सुंदरी आकाशमंडळांतील एका तेज:पुंज ताऱ्याकडे स्थिर दृष्टीनें पहात होती. तिच्या काळ्याभोर वेणींतहि त्या ताऱ्याइतकाच एक तेज:पुंज हिरा लखलख करित होता.

या तरुणीचें वय सुमारें सतरा वर्षांचें असेल. सांप्रत ती यौवनाच्या आरंभकाळामध्येंच असल्यामुळें तिचा सर्व देह असाधारण सौंदर्यानें विकसित झाला होता. परंतु हें साधारण स्त्रीजातीचें सौंदर्य नव्हतें. त्या रूपखनीच्या दर्शनलाभानें मनामध्यें सहसा प्रेमविकाराचा संचार न होतां श्रद्धा, सन्मान व पूज्यबुद्धि यांचाच प्रादुर्भाव होत असे. तिच्या शरीराचा बांधा सडपातळ, नाजुक आणि उन्नत असून सुकुमारता तर तिच्या नखशिखांत भरलेली दिसत होती. तिचें ललाट अति सुंदर, उच्च आणि प्रशस्त होतें. अशा प्रकारचें ललाट स्त्रीजातींत कधींहि दिसून येत नाहीं; आणि पुरुषजातींतहि पण क्वचितच आढळतें. नेत्र अतिशय उज्ज्वल, दृष्टि स्थिर, ओष्ठ अत्यंत चिक्कण आणि आरक्त होते. तिची एकंदर मुद्रा गंभीर, औदार्यसूचक आणि मनाचा मोठेपणा प्रदर्शित करणारी अशी होती. ही तीक्ष्ण ज्योतिर्मयी तन्वंगी मानुषी नसून कोणीतरी योगपरायण स्वर्गवासी तपस्विनी मानव-

जातीच्या उन्नतिसाधनार्थ या मर्त्यलोकीं अवतरली आहे, असें प्रथम दर्शनींच पहाणारास वाटत असे.

तशा त्या निस्तब्ध सायंकाळच्या वेळीं स्वच्छ, नील आकाशांतील त्या तेज:पुंज ताऱ्याकडे स्थिरदृष्टीनें पहात सुंदरी गवाक्षांत सचिंत उभी होती. तिचें वदनमंडलहि त्यावेळीं अत्यंत स्वच्छ आणि सुंदर दिसत होतें. रात्र जसजशी गभीर होऊं लागली, आकाशाचा विस्तीर्ण नीलवर्ण जसजसा घोरतर अंधकारानें आच्छन्न होऊं लागला, तसतशी त्या सुंदरीच्या हृदयांतील चिंतारजनी अधिकाधिक गंभीर होऊं लागली. तिचें प्रशस्त ललाट हळू हळू घोरतर चिंतेनें मलिन होत चाललें. कपाळाला आंठ्या पडूं लागल्या; भ्रुकुटी अधिकाधिक संकुचित होऊं लागली; आणि नेत्रांतून अधिकच तीक्ष्ण व उज्ज्वल ज्योति बाहेर पडूं लागली. इतक्यांत त्या ठिकाणीं एक पुरुष येऊन तिला ह्मणाला "विमले?"

त्यासरशीं विमलेनें दचकून मागें पाहिलें व ती किंचित् ओशाळली. या पुरुषाचें वय पन्नासीच्या सुमारें होतें. परंतु पहाणारास तो साठ वर्षांहूनहि ह्मातारा वाटत असे. त्याच्या मस्तकाचे केश बहुतेक शुभ्र झाले होते. ललाटावर चिंतारेषा स्पष्टपणें उमटलेल्या दिसत होत्या. शरीराची त्वचा शिथिल, आणि सर्व अंग क्षीण झालें होतें. मुखमंडलावर चिंतादेवीनें आपलें सततचें वास्तव्य केलें होतें. तथापि त्याचे डोळे अद्यापिहि पूर्वीसारखेच तेजस्वी होते. तो मोठा धूर्त, महत्वाकांक्षी आणि बुद्धीचा तीक्ष्ण असून जें कांहीं करावयाचें असेल तें दूरवर विचार करून करणारा असे. त्याचें अंत:करण सर्वदा मोठमोठ्या महत्वाकांक्षेच्या कल्पनांनीं व्यापिलेलें होतें. विमलेच्या खोलींत येतांच तिला चिंतामग्न पाहून तो कांहीं वेळ गुप्तपणें स्तब्ध उभा राहिला. नंतर किंचित् स्मित करून त्यानें हांक मारली "विमले?"

पित्यास पहातांच विमलेला आपल्या चिंतेचें किंचित् विस्मरण होऊन तिच्या चर्येवरील चिंतापटल हळूहळू नष्ट झालें, व त्या

जागीं पवित्र पितृस्नेहाचें प्रतिबिंब उमटलें. बाबा खोलींत केंव्हांचे येऊन उभे आहेत व तें आपणांस मुळींच कळलें नाहीं, हा विचार मनांत येतांच ती लज्जित झाली. सतीशचंद्रानें विचारलें "विमले! तूं एवढा वेळ आपल्याशींच विचार करित एकटी बसली होतीस, असें तुजवर कोणतें दुःख येऊन पडलें आहे?"

विमलेनें उत्तर दिलें "आपण उद्यां इथून जाणार; मला एकटीला या भयाण किल्ल्यामधें किती दिवस रहावं लागणार, कुणास ठाऊक? आपण मला पुनः भेटाल कीं नाहीं देव जाणे! यामुळं माझं मन अगदीं अस्थिर झालं आहे; कांहीं केल्या मनाची तळमळ शांत होत नाहीं."

"हा वेडे! एवढंच ना? मग त्याची इतकी चिंता कशाला? मी लवकरच परत येईन बरें! तुझ्यावांचून जास्त दिवस माझ्यानें रहावेल तरी?"

"बाबा, आपलं मजवर अतिशय प्रेम आहे, तें मला ठाऊक आहे. खरोखर कोणताहि बाप मुलीवर एवढं प्रेम करित नसेल."

"मग काळजी कां करितेस? मी आजच का जात आहें? मला दरसाल एकदा राजधानीस जावेंच लागतें. याच वेळीं तूं एवढी कष्टी कां होतेस?"

"होय, आपण दरसाल जात असतां खरे; पण त्यावेळीं मला असं कधींहि झालं नव्हतं. काय असेल तें असो, आज माझ्या मनांत फारच भीति वाटते. बाबा, तुम्हांला माझ्या गळ्याची शपथ आहे, तुह्मी घरींच रहा; कुठंहि जाऊं नका."

शेवटचे शेवटचे शब्दतर विमलेच्या मुखांतून फारच हळू निघाले. परंतु ते ऐकतांच सतीशचंद्राच्या हृदयांत धस्स झालें. भीतीनें त्याची छाती धडधडूं लागली. बराच वेळपर्यंत तो स्तब्ध उभा होता. नंतर ह्मणाला "बाळे! व्यर्थ चिंता कां करितेस. मला राजधानीस गेलेंच पाहिजे; गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं, हें तूं जाणतच आहेस. माझ्या जाण्याच्या वेळीं तूं अशा अशुभप्रकारें रडूं नकोस बेटा."

विमला गहिंवरून ह्मणाली "बाबा, बाबा, मी तुमच्या पायां पडत्यें, तुह्मी इथून कुठंहि जाऊं नका. काल रात्रीं मला एक स्वप्न पडलं, त्यांत आईनं येऊन करुणवाणीनं मला सांगितलं 'बाळ, सावध रहा. घोर संकट येणार आहे.' तिचं त्या वेळचं तें म्लान मुख, आंसवांनीं थबथबलेले डोळे, भीतीनं लटलटणारं शरीर हीं अद्यापिहि मला कशीं माझ्या डोळ्यांसमोर दिसत आहेत. मीं काय पाप केलं आहे, कांहीं कळत नाहीं; कोणत्या घोर पातकामुळं मी मातृसुखास अंतरल्यें कांहीं समजत नाहीं. आणि पुढं कोणतं घोर संकट येणार आहे परमेश्वर जाणे! बाबा, माझी एवढी विनंति ऐका. मी आपल्यापुढं पदर पसरल्यें, हात जोडल्यें, तुह्मी कुठंहि जाऊं नका. इथून गेलां ह्मणजे तुह्मी मला पुन्हा कांहीं भेटणार नाहीं." असें ह्मणत स्फुंदतस्फुंदत ती पित्याजवळ गेली व त्याच्या हृदयावर मस्तक ठेवून एकसारखी अश्रू ढाळूं लागली.

यावेळीं विमलेची मनःस्थिति शांत असती, तर तिच्या पित्याचें काळवंडलेलें तोंड तिला तत्काळ दिसून आलें असतें. विमलेच्या स्वप्नांतील गोष्ट ऐकून सतीशचंद्र काळाठिक्कर पडला होता. जणूं काय एखाद्या भयंकर गत गोष्टीचें त्याला स्मरण झालें; जणों एखाद्या भयंकर पातकाचें प्रायश्चित्त भोगण्याचा आत्तांपासूनच प्रारंभ झाला! विमला आपल्या पित्याच्या वक्षस्थळावर मस्तक ठेवून एकसारखी स्फुंदत होती, परंतु तिचें सांत्वन करण्याचें धैर्य सतीशचंद्राला होईना. तो अगदीं बावरल्यासारखा होऊन गेला होता. कांहीं वेळानें मोठा मनोनिग्रह करून आपल्या मनाची चलबिचल आंवरून तो ह्मणाला "विमले, तूं उगीच घाबरत आहेस. तूं दिवसभर भलभलती चिंता करित बसतेस व त्यामुळेंच तुला रात्रीं हीं अशीं भयंकर स्वप्नें पडत असतात. गेल्या कित्येक दिवसांपासून मी पहातों आहें, तूं अशीच सर्वदा चिंतामग्न असतेस; बेटा खरें सांग, तूं ही एवढी चिंता कां ह्मणून करित असतेस?"

विमला स्थिरभावानें ह्मणाली "बाबा, ज्या अर्थी तुह्मी मला हें विचारतां, त्या अर्थी मी तें सांगत्येंच. अन् आपल्यापासून कांहीं लपवून ठेवण्याजोगी माझी गुप्त गोष्ट ती काय असणार? माझ्या चिंतेचं आपणच कारण आहां. आज सुमारं एक महिन्यापासून मी आपणांस कोणत्यातरी घोर दुःखांत किंवा चिंतेंत मग्न झालेले पहात आहें. दिवसेंदिवस आपली ती चिंता वाढतच आहे. जेवणाचे वेळीं आपलं खाण्यापिण्याकडे मुळींच लक्ष्य नसतं; रात्रीं आपणांस स्वस्थ झोंप येत नाहीं; यदाकदाचित् थोडीशी गुंगी आलीच तर तिच्यांत आपल्यास नाहींनाहीं तसलीं वाईट स्वप्नं पडतात. दिवसाचे वेळीं कितीदातरी मीं आपल्याला नकळत आपल्या खोलींत जाऊन आपणांस चिंतामग्न बसलेले पाहिलं आहे. त्याचप्रमाणं पुष्कळ प्रसंगीं रात्रीच्या वेळींहि आपल्या निजण्याचे खोलींत जाऊन बिछान्याजवळ आपलं मुख न्याहाळित उभी राहिल्यें आहें. मी जेव्हांजेव्हां अशा रीतीनं आपल्याला नकळत आपल्या तोंडाकडे पाहिलं आहे, तेव्हांतेव्हां वाईट स्वप्नांमुळं आपलं कपाळ संकुचित झालेलं आणि मुख म्लान झालेलं या माझ्या डोळ्यांस दिसलं आहे. कोणत्या घोर चिंतेमुळं या सर्व यातना आपणास भोगाव्या लागतात? यःकश्चित् जमीदार, एवढंच नव्हे तर एखादा दरिद्री शेतकरीहि दिवसाच्या परिश्रमानंतर रात्रीं सुखानं झोंपीं जातो; आणि बंगदेशाचे राजाधिराज दिवाण बहादुर सतीशचंद्र यांनां झोंपेचं सुख काडीभरहि मिळूं नये!"

विमला क्षणभर स्तब्ध राहिली. सतीशचंद्र आपलें भाषण शांतपणें ऐकून घेत आहे असें पाहून ती पुढें आणखी ह्मणाली "गेल्या महिन्यापासून आपणांजवळ एवढे गुप्त हेर कां येत असतात? ते इतक्या गुप्तपणं येऊन तितक्याच गुप्तपणं परत कां जातात? आपणहि अहर्निश अशा कोणत्या भयंकर कारस्थानांत निमग्न झालां आहां? बंगदेशाच्या दिवाणास कामाची दगदग फार असायची, हें खरं;

परंतु रयतेच्या सुखाविषयीं झटणं, अपराध्यांस शासन करणं, आणि राज्याची आबादानी करणं हेच ज्या कार्याचे उघड उघड उद्देश आहेत, तें कार्य दोन प्रहर रात्रीं खोलीचं दार बंद करून गुप्त हेरांबरोबर खलबतं करून सफल होणार काय? माझ्यासारख्या क्षुद्र पोरीनं या नसत्या उठाठेवी करणं उचित नाहीं;आणि या अपराधाबद्दल बाबा, मला क्षमा करा. आपण बुद्धिवान् आणि चतुर आहां; मीं आपल्यास सांगितलं पाहिजे असं नाहीं, नि तो माझा अधिकारहि नव्हे. पण आपण थोडा विचार करून पहा. दुष्टस्वभावी सर्पाची गति वक्र असते; आणि उदारचित्त मनुष्याची गति अगदीं सरळ असते. ज्याचं चरित्र सरळ, ज्याचा उद्देश सरळ, त्याचा मार्गहि सरळच असायचा; वांकडा कधींहि असणार नाहीं! बाबा, या पोरीची गोष्ट ऐका. कपटी लोकांची संगत सोडून द्या. धर्ममार्गाचं—सरळ मार्गाचं अवलंबन करा; म्हणजे आपणांस कुणाचंहि भय वाटणार नाहीं,कसलीहि चिंता रहाणार नाहीं. पापपथ सर्वदाच भयावह आहे; परंतु धर्मपथ सरळ, निष्कंटक आणि निर्धोक आहे."

बोलतां बोलतां विमलेचें उदार ललाट आणि वदनमंडळ अधिकच देदीप्यमान झालें. तिच्या उज्वल नयनयुगलाची दृष्टि विशेषच उज्वल दिसूं लागली. विमलेचें आपल्या पित्यावर अतोनात प्रेम होतें. तथापि तिच्या हृदयांत नैसर्गिक सौजन्य आणि धर्मबल विराजमान असल्यामुळें, असंख्य लोकांनीं भरलेल्या राजसभेंतहि ज्यानें आपल्या वाक्पाटवाबद्दल सहस्रवेळां प्रशंसा मिळविली होती तोच सतीशचंद्र आज सत्रा वर्षांच्या बालिकेपुढें निरुत्तर झाला!

'पापपथ सर्वदाच भयावह आहे; धर्मपथ सरळ, निष्कंटक आणि निर्धोक आहे.' असें तोंडानें पुटपुटत सतीशचंद्र तेथून दुसरीकडे निघून गेला.

## प्रकरण ८ वें.

## पातकी अंतःकरण.

Try what repentance can: What can it not?
Yet what can it when one cannot repent?
O wretched state! O bosom black as death!
O limed soul that struggling to be free,
Art more engaged. Help angels, make assay!
Bow stubborn knees! and hearts with strings of steel,
Be soft as sinews of the new-born babe,
All may be well.

*Shakespeare.*

विमलेच्या खोलींतून बाहेर पडून सतीशचंद्र एकदम आपल्या दिवाणखान्यांत शिरला. यजमानाची पादसेवा करावयाकरितां ह्मणून एक चाकर आंत आला. सतीशचंद्र त्याच्या अंगावर वस्कन ओरडून ह्मणाला "जा, शकुनीला लवकर बोलावून आण." आज्ञेप्रमाणें चाकर तत्काळ निघून गेला.

सतीशचंद्राचा दिवाणखाना प्रशस्त असून उत्तमप्रकारें शृंगारलेला होता. जमिनीवर नानातऱ्हेच्या कारागिरीनें सुशोभित असलेला मूल्यवान् गालिचा पसरला होता. प्रत्येक दरवाजावर, प्रत्येक खिडकीवर सुगंधमय पुष्पमाला लोंबत होत्या. जागजागीं फुलांचे गुच्छ आणि माळा शोभत होत्या. मध्यभागीं एक सुगंधी तेलाचा दिवा जळत होता. दिव्याच्या चारी बाजूंसहि उत्तमोत्तम पुष्पगुच्छ मांडले होते. सतीशचंद्राच्या बसण्याच्या जागीं एक अतिशय मूल्यवान् लाल किनखाबाची गादी बिछविली होती. अशा त्या सुंदर दिवाणखान्यांत बहुमूल्य आसनावर बसलेल्या बंगालच्या महापराक्रमी, अतुलैश्वर्यसंपन्न राजाधिराज दिवाण सतीशचंद्राचें मन आज विषण्ण कां बरें?

आमच्या वाचकांपैकीं सुदैवानें म्हणा वा दुर्दैवानें ह्मणा, आमच्यासारखेच निर्धन असणारांनां विलासी लोकांचा त्यांचे श्रीमंतीचे सुखविलास पाहून मनांतून अत्यंत हेवा वाटत असेल; पैसाच केवळ

सुखाचें मूळ आहे असें ज्यांचें ठाम मत बनलें असेल, त्यांनीं क्षणभर आमच्या मागून येऊन लक्षाधीश सतीशचंद्राच्या अंत:स्थितीकडे पहावें; म्हणजे त्यांच्या मनाची तळमळ तत्काळ शांत होईल, पैशाचा लोभ आपोआप दूर होईल.

सतीशचंद्राचें हृदय पातकानें कलंकित झालें होतें. घोर पापांधकारानें भरून गेलें होतें. नाहीं म्हणावयाला विमलेवर असणाऱ्या निर्मल अपत्यस्नेहाचें एक बारीकसें पुण्यकिरण त्या घोर पापांधकारामध्यें चमकत होतें. आपल्या सद्गुणी कन्येवर सतीशचंद्राचें प्राणांपेक्षांहि अधिक प्रेम होतें. त्यानें तिचें अत्यंत प्रेमानें लालनपालन केलें होतें. पत्नीचा चिरवियोग झाल्या दिवसापासूनतर सतीशचंद्र विमलेशीं फारच ममतेनें आणि मोकळेपणें वागत असे. संसारांतील प्रत्येक गोष्ट तो तिच्या कानांवर घाली, तिची सल्लामसलत घेई, आणि यामुळेंच विमलाहि कधींकधीं आपल्या पित्याला एखाद्या मित्राप्रमाणें, बंधुप्रमाणें उपदेश करी. तिचेंहि आपल्या पित्यावर अतोनात प्रेम होतें. पित्याच्या सुखवर्धनाशिवाय तिची दुसरी कसलीहि लालसा नव्हती. पित्यावर एवढें प्रेम असतांहि ती अत्यंत सुशील, धर्मपरायण आणि मानिनी होती. पित्याचें कपटाचरण दिसतांच ती अतिशय क्षुब्ध होत असे. ज्याप्रमाणें प्रकाशापुढें अंधकार टिकत नाहीं, सत्य आणि सरलता यांच्यासमोर पाप आणि कपट हीं भयभीत होतात, त्याप्रमाणें विमलेसमोर सतीशचंद्र अगदीं निरुत्तर होत असे. सतीशचंद्राचें चरित्र पापानें किती कलंकित झालें आहे, हें विमलेस पुरतेपणें ठाऊक नव्हतें. एवढेंच नव्हे, तर आपल्या पित्याचें अंत:करण पापपूरित आहे याचा विमलेच्या निर्मल अंत:करणाला हल्लींपर्यंत संशयदेखील आला नव्हता. तथापि सांप्रत तिला आपल्या पित्याच्या वर्तनाविषयीं शंका येऊं लागली होती; आणि यामुळेंच आतांशा तिचें अंत:करण दग्ध होत होतें.

केव्हांकेव्हां एखाद्या विवक्षित गोष्टीमुळें, अथवा एखाद्या उक्तीमुळें, अगर एखाद्या गीतामुळें एकाएकीं आपल्या हृदयाचीं कपाटें उघडतात. सागरतरंगांप्रमाणें अनंत चिंतालहरी उत्पन्न होऊन हृदय भरून येतें, आणि फार मागील काळच्या गोष्टी डोळ्यांसमोर उभ्या रहातात. आपल्या स्नेहवती कन्येच्या सस्नेह तिरस्कारवचनांचा सतीशचंद्राच्या हृदयावर असाच परिणाम झाला. चित्ताच्या दुःसह तापानें त्याचें हृदयकेंद्र व्यथित झालें. सहस्त्रावधि मागील गोष्टी त्याला आठवूं लागल्या. शैशवकालांतील क्रीडा, बाल्यकालांतील अध्ययन इत्यादिकांचें हळु हळु स्मरण होऊं लागलें. ज्या विद्येच्या प्रभावानें आज विषमय फळें निर्माण केलीं होतीं, त्या विद्येच्या प्रारंभकाळच्या गोष्टी आतां त्याला आठवूं लागल्या. आपल्याबरोबरीच्या विद्यार्थ्यांसह शाळेंत जाणारा, सुट्टीनंतर निष्पाप, निश्चिंत चित्तानें त्यांच्याशीं क्रीडाविनोद करणारा तो विद्यार्थिदशेंतील सतीशचंद्र आज समस्त बंगाल देशाचा दिवाण झाला आहे! लाखों–कोट्यवधि रुपये त्याच्या भांडारांत पडले आहेत. परंतु ते लाखों रुपये खर्च केल्यानेंहि फक्त एक क्षणभरच तें बाल्यकालीन निष्पाप, निश्चिंत चित्त फिरून मिळवितां का येईल? बाळपण, विद्यार्थिदशा संपली. तारुण्याला प्रारंभ झाला. या तारुण्यकालाची आठवण सतीशचंद्राला किती कष्ट देऊं लागली! विद्येचा गर्व, तदनंतर संपत्तीचा मद, तदनंतर भयंकर महत्वाकांक्षा— त्या यौवनकालीन महत्वाकांक्षेनेंच आज हीं विषमय फळें निर्माण केलीं!

नंतर प्रजारंजक, महानुभव वीर पुरुष राजा समरसिंह याच्या वधाची गोष्ट सतीशचंद्राच्या पातकी हृदयांत उभी राहिली. जो महात्मा बंगदेशाचा केवळ गौरवस्तंभरूप होता, जो जमीदारांना ज्येष्ठ भ्रात्याच्या जागीं होता, समस्त प्रजेला पित्याच्या ठिकाणीं होता, त्या उदार समरसिंहाचा आपण कपटानें वध केला. राजा समरसिंहाचें तें रक्तानें माखलेलें शिरकमल डोळ्यांसमोर उभें रहातांच सतीश-

चंद्राच्या अंगावर शहारे आले. त्याचें हृदय धडधड उडूं लागलें. 'पापाच्या प्रायश्चित्तास आतां विलंब नाहीं,' हे शब्द जणों तें मस्तक रागानें डोळे लाल करून अत्यंत तीव्र दृष्टीनें आपल्याकडे पहात उच्चारित आहे, असा सतीशचंद्रास भास होऊन त्याच्या सर्वांगांस दरदरून घाम सुटला. त्याच्यानें आणखी आतां समोर पहावेना. एकदम दिवा मालवून त्यानें अंधारच अंधार केला. मूर्ख नाहींतर! स्मृतिदीप इतक्या लवकर का विझत असतो?

घोर अंधकारांत बसून सतीशचंद्र एवढा कसला बरें विचार करित होता? कोणाला त्या विचारांचा मागमूस लागणार आहे? सहस्त्र विंचवांच्या दंशनांपेक्षांहि त्याचा मनस्ताप अधिक क्लेशदायक होता. तीव्र वेदनेनें अस्थिर होऊन तो आपल्याशींच ह्मणूं लागला "काय, माझ्या या पातकाला प्रायश्चित नाहींच? जर असेल तर या हृदयांतील रुधिर वाहवूनहि मी आपल्या पापाचें क्षालन करीन. नारायणा! दया कर. आतांपासून मुलीच्या उपदेशाप्रमाणेंच मी आपलें वर्तन ठेवीन; यापुढें मी धर्मपथाचेंच अवलंबन करीन. खरेंखरें सांगून मी आपला अपराध कबूल करीन आणि क्षमा मागेन. जर क्षमा मिळाली नाहीं. तर मी मरणासहि तयार आहें; त्यानेंतरी माझ्या पातकाचें क्षालन होओ!"

सतीशचंद्र याप्रमाणें मनस्तापानें पीडित होऊन पश्चात्ताप करित आहे, इतक्यांत शकुनि खोलींत प्रवेश करून ह्मणाला "हें काय! अंधारांत एकटेच कां बरें बसलां आहां?"

सतीशचंद्रानें गंभीर स्वरानें उत्तर दिलें "प्रकाश मला सहन होत नाहीं. दुर्भेद्य अंधकारानें हें सर्व हृदय कसें व्यापून टाकिलें आहे. माझा जीवनरूपी दीपहि आतां लवकरच घोर अंधकारांत लीन होईल. जगाच्या रंगभूमीवरील माझें काम आतां बहुतेक संपलें आहे."

यावर शकुनि कांहींएक बोलला नाहीं. चाकरास दिवा आणण्याकरितां त्यानें इषारा केला. त्याप्रमाणें चाकरानें दिवा आणला.

सतीशचंद्र पुनः ह्मणाला "शकुनि! तुझ्या सांगण्यावरूनच मीं हें काम केलें; परंतु त्याचें फळ काय झालें आहे? परलोकास तर मी आधींच अंतरलों आहें, आणि आतां इहलोकासहि मुकण्याची पाळी आली आहे! या घोर पापसागरांत मला तूंच बुडविलें आहेस! तुझ्यामुळेंच मीं आपल्या स्वतावर हीं भयंकर संकटें ओढून घेतलीं आहेत! आतां तूं आणखी काय करणार आहेस? माझातर सर्व नाश केलासच! जा, आतां आणखी कोणा दुसऱ्या वैभवशाली मनुष्याचा सत्यनाश करण्याच्या कार्यास लाग! मीहि आतां घोर पापाला जर कांहीं प्रायश्चित्त असलें तर तें घेण्याच्या मार्गास लागतों."

यजमानाचे हे गंभीर शब्द ऐकून शकुनि चकितच झाला. आज कांहीं निराळाच प्रकार आहे, हें त्या धूर्त जंबूकानें तत्काळ ताडून आपल्या डोळ्यांत दोनचार कपटाश्रु आणून गद्गदस्वरानें ह्मटलें "यजमानांची आपल्यावर पूर्ण कृपादृष्टि असावी, हीच कायती यजमानांच्या उत्कर्षकाळीं माझी अभिलाषा होती. आज जर यजमानांवर खरोखरच एखादा महत्प्रसंग गुदरला असेल तर त्यांतहि आपल्या धन्याबरोबर वांटा घेण्यास हा बंदा अगदीं एका पायावर तयार आहे."

सतीशचंद्र आवेशानें म्हणाला "शकुनि! तूं फार मिठ्या तोंडाचा आहेस. या अशा विषमय अंतःकरणास ब्रह्मा इतकी मधुर जिव्हा कां देतो, कांहीं कळत नाहीं!"

"महाराज, मी महान् पातकी आहें, हेंच खरें. कारण, तसें नसतें तर स्वामिभक्तीचा हा असा मोबदला कां मिळता?" इतकें बोलून शकुनीनें आणखी दोनचार अश्रु डोळ्यांबाहेर काढिले. हें पाहून सतीशचंद्र कांहीं शांत होऊन म्हणाला "माझ्याच उन्नत्यर्थ तूं अहर्निश झटत असतोस, हें मला ठाऊक आहे; पण पापमार्गांत सर्वदा भयच असतें. त्या मार्गाखेरीज उन्नति करून घेण्याचा दुसरा मार्गच नव्हता का?"

आपले अश्रुबिंदु अगदींच निष्फळ झाले नाहींत असें पाहून शकुनि आपला कंठ अधिकच सद्गदित करून म्हणाला "स्वामिभक्ति हें जर पाप असेल, तर खरोखरच मी पापिष्ठ आहें. त्याहून दुसरें पाप मला ठाऊक नाहीं."

"नाहीं ठाऊक? बंगचूडामणि राजा समरसिंह याचा घात करण्याविषयीं माझ्या कानांत विष कोणीं ओतलें?"

"राजाज्ञेनेंच त्याचा वध झाला आहे."

"बरें, त्याच्या जमीदारीचा सध्या कोण उपभोग घेत आहे?"

"बंगालच्या सुभेदारानें स्वेच्छेनें जें कांहीं एखाद्यास दान दिलें, तें स्वीकारणें हें त्याचें कर्तव्यच आहे."

"शकुनि! आतां आणखी गोडगोड बोलून माझ्या बुद्धीला भुरळ पाडूं नकोस. आज माझे ज्ञानचक्षु उघडले आहेत व त्यांच्या द्वारें मला माझ्या हृदयांत इतका अंधार, इतकें पाप दिसत आहे कीं, तिकडे माझ्यानें पहावतहि नाहीं! आज माझ्या कन्येनें मला उपदेशामृत पाजून शुद्धीवर आणलें." इतकें बोलून सतीशचंद्रानें विमलेच्या भेटीची हकीगत शकुनीला सांगितली.

त्यावर शकुनि किंचित् धिक्काराच्या आवाजानें ह्मणाला "बंगदेशचे राजाधिराज दिवाण सतीशचंद्र यांनां एखाद्या क्षुद्र पोरीच्या भाषणानें इतकी भीति वाटावी?"

"पण बालिका जर खरें सांगते, तर तें बालिकेच्या मुखांतून निघालें आहे ह्मणून त्याचा उपहास करणें अगदीं मूर्खपणाचें होईल. पापमार्ग सर्वदाच अनिष्टकारक आहे, हें मला आज इतक्या दिवसांनीं कळून चुकलें आहे."

"बरें, पण मी विचारतों कीं, आपणावर असें संकटतरी कोणचें आलें आहे?"

"राजा तोडरमल्ल पहिल्यानेंच बंगाल आणि बहार हे देश पादाक्रांत करून दिल्लीस परत गेले, त्या गोष्टीला आज सहा वर्षें झालीं. तोडरमल्ल दिल्लीस जातात न जातात तोंच पुण्यात्मा समरसिंह याचा मीं कपटानें वध केला. या दुष्ट कृत्यास तूंच मला प्रवर्त केलें होतेंस!"

"दिल्लीच्या बादशहाचा बंग आणि बहार देशांचा सेनापति मनाइखान यानें समरसिंहास प्राणदंडाची शिक्षा दिली."

"तें खरें, परंतु आमच्याच कृष्णकारस्थानांमुळें तें घडून आलें. त्यानंतर दोन वर्षांनीं जेव्हां राजा तोडरमल्ल यांनीं दुसऱ्यांदा बंगदेश जिंकिला, तेव्हां समरसिंहाच्या वधाविषयीं आपल्यास कसकशा खोट्यानाट्या गोष्टी जुळवाव्या लागल्या व जीव बचावण्यास केवढे भगीरथ प्रयत्न करावे लागले, तें तुला आठवतच असेल."

"बरें पुढें?"

"पुढें काय? आतां राजा तोडरमल्ल बंगदेशाचे सेनापति व सुभेदार होऊन पुनः मुंगेरीस येत आहेत. आतां मात्र आपला कांहीं निभाव लागण्याची आशा नाहीं."

"ज्या कौशल्यानें आजवर ही गोष्ट अगदीं गुप्त ठेवितां आली, तें कौशल्य आतां कां ह्मणून व्यर्थ होईल?"

"दूरदर्शी तोडरमल्लापुढें माझें कौशल्य टिकणार नाहीं. तूं त्यांनां पुरतेपणीं ओळखलें नाहींस!"

"पण हाच दूरदर्शी राजा एकवार आपल्या कौशल्यानें चकला आहे!"

"होय, खरें. पण तेव्हां ते एकदोन महिन्याकरितांच आले होते. या वेळीं सुभेदार होऊन आले आहेत. यामुळें त्यांचा बरेच दिवस मुक्काम होईल. शकुनि! आतां तुझ्यानें माझें मन वळविण्याचा प्रयत्न होणार नाहीं. मी त्यांच्याकडे जाऊन सर्व खरी खरी हकीगत सांगेन व त्यांची क्षमा मागेन. त्यांनीं मला एकवार क्षमा केली आहे. तशीच या वेळींहि करतील, असा संभव आहे. नंतर मी या पापपूर्ण

संसारांत रहाणार नाहीं. योगी होऊन या घोर पापाचें प्रायश्चित्त भोगण्यास आरंभ करीन."

"खरी हकीगत निवेदन केल्यास आपणास इच्छापूर्वक या संसाराचा त्याग करतां येणार नाहीं. आपला प्रिय मित्र समरसिंह याची हत्या करणारास राजा तोडरमल्ल कोणती शिक्षा देईल याची आपणास कल्पना होत नाहीं काय?"

शकुनीचें हें मर्मभेदक भाषण ऐकतांच सतीशचंद्राचें काळीज चर्रर झालें. तो कांहींएक बोलला नाहीं. शकुनि ह्मणतो तें खरें आहे, असें त्याला वाटलें. आपलें कारस्थान यदाकदाचित् गुप्त रहाण्याचा संभवतरी आहे; परंतु एकवार तें उघडकीस आलें ह्मणजे मग प्राणरक्षणाची यत्किंचित्‌हि आशा नाहीं. बराच वेळ विचार करून तो ह्मणाला "शकुनि! तूंतर माझ्यापेक्षांहि पापिष्ट आहेस! परंतु तूं मूर्तिमंत पाप असलास, तरी मला आतां तुझ्या मसलतीप्रमाणें चालल्यावांचून गत्यंतर नाहीं."

"महाराज, माझी मसलत ती काय? आपणासारख्या बुद्धिवान्, चतुर मुत्सद्याला मी सल्ला काय देणार? परंतु आपण विचार करा, आज आपल्या जिवावर असा कोण उदार झाला असेल कीं जो बंगदेशचे दिवाण बहादूर सतीशचंद्र यांच्या विरुद्ध सुभेदाराजवळ कागाळ्या सांगेल? आपण आणखी असें पहा, कीं जी गोष्ट या सहा वर्षांत अगदीं गुप्त राहिली, ती आतांच कशी उघडकीस येईल? मी प्रतिज्ञा करतों कीं, जर ही गोष्ट उघडकीस आली तर मी तत्क्षणीं आपणासमोर प्राणत्याग करीन."

आशेचा प्रभाव कांहीं चमत्कारिकच आहे. जी आशा मनुष्यास सुख, शांति आणि संतोष देते, तीच आशा कधींकधीं त्याच्या अति दुःखासहि कारण होते. त्याप्रमाणेंच मानवहृदयहि अत्यंत चमत्कारजन्य

आहे. निराधार आशेच्या फांसांत तें किती वेळांतरी पुनःपुनः अडकतें. संकटकाळीं, रुग्णावस्थेंत अथवा दुःखसमयीं मात्र हृदयांत प्रबळ धर्मभय उत्पन्न होतें; परंतु संकटांचा नाश होतांच, आरोग्य प्राप्त होतांच किंवा दुःखसमय निघून जातांच धर्मभय क्रमाक्रमानें हृदयांतून दूर होतें. सतीशचंद्राकडेच पहाना! थोड्या वेळापूर्वी त्याच्या हृदयाची काय अवस्था होती व आतां काय झाली! आपल्यावर खचीत भयंकर संकट ओढवणार, असें पहातांच त्याला पापाविषयीं तिरस्कार वाटूं लागला, मनामध्यें धर्मभय जागृत झालें. परंतु 'भय कसलें? संकट आहे कुठें? सर्व मनाचा संशय आहे?' असें आशेनें त्याच्या कानांत पुटपुटतांच त्याची पूर्वस्थिति पालटली. संकटाचें भय अंतर्धान पावतांच धर्मभयहि मनांतून नाहींसें झालें. मानवहृदयाला संकटांचें जितकें भय वाटतें, तितकेंच जर त्याला धर्माविषयीं भय वाटलें असतें, तर पृथ्वीवर आज आपण पहातों इतकें दुःख निःसंशय रहातेंना.

बराच वेळपर्यंत विचार करून सतीशचंद्र ह्मणाला "शकुनि! तुझ्यावरच आतां माझा सर्वोपरि भार आहे. बरें सांग पाहूं तुला काय वाटतें तें? सध्या संकट येण्याचा कांहीं संभव आहे?"

प्रसंग पाहून शकुनि ह्मणाला "सध्या आपलें कारस्थान उघडकीस येण्याचा मलातर कांहींच संभव दिसत नाहीं. आणि यदाकदाचित् संभव असला ह्मणून काय झालें? आपल्यासारख्या महाभागानें संकटसमयीं भ्यायचें कीं काय? बंगदेशांत आपल्या यशाची प्रशंसा कोण गात नाहीं? ब्राह्मणकुलामध्यें आपल्या कुलाप्रमाणें कोणतें कुल पवित्र आहे? आपल्यासारखें कोणाच्या अंगीं सामर्थ्य आहे? आपल्यासारखा गौरव कोणास प्राप्त झाला आहे? आपल्यासारखा अधिकार कोणीं संपादन केला आहे? केवळ यःकश्चित् पोरीच्या सांगण्यावर जाऊन या सर्वांचा एकदम त्याग करणें

बंगदेशचे राजाधिराज दिवाणबहादुर सतीशचंद्र यांनां उचित आहे काय? आपणांस उपदेश करण्याची पात्रता माझ्या ठिकाणीं मुळींच नाहीं. समस्त बंगदेशांत आपणास उपदेश करण्याइतक्या योग्यतेचा ज्ञानी पुरुष अद्याप जन्मला नाहीं व पुढेंहि होणार नाहीं."

यावर सतीशचंद्र कांहीं बोलला नाहीं. मनांतल्या मनांत ह्मणाला "खरोखरच मला वेड लागलें असावें; नाहींतर पोरीच्या भाषणानें मी इतका कधींहि भ्यालों नसतों."

सतीशचंद्राच्या या वेळच्या मुद्रेवरून त्याचे मनोगत विचार ओळखून शकुनि ह्मणाला "रुद्रपुरास गुप्त हेर पाठविले होते, त्यांचें कांहीं वर्तमान कळलें का?"

"नाहीं. त्याविषयींहि चिंता लागून राहिली आहे. मीं ऐकिलें आहे कीं, समरसिंहाची विधवा स्त्री मोठी भयंकर आहे. तोडरमल्ल इथें येतांच ती आह्मांला सळो कीं पळो करून सोडील."

"ॐः त्याची कांहीं फिकिर नको! राजा तोडरमल्ल इथें येऊन पोंचण्यापूर्वींच समरसिंहाच्या वंशांतील एकूणएक माणसाचें तोंड बंद करून टाकतों."

"तर मग रुद्रपुरास आह्मीं जे हेर पाठविले होते त्यांनीं समर-सिंहाच्या विधवेस कन्येसह धरून आणली कीं काय?"

"नाहीं. अजून आणली नाहीं. तरीपण लवकरच काम फत्ते होईल."

"पण सध्या कोणती अडचण आली?"

"आपल्या कारस्थानाचा तिला एक दिवस पूर्वींच वास लागला होता. त्या वेडीनेंच तिला जाऊन सांगितलें, असें ऐकतों."

"पिशाची आमच्या सर्वच कार्यांत व्यत्यय आणिते. तिला कैद करून कां नाहीं आणीत?"

"तिला पकडण्याची पुष्कळ खटपट केली; परंतु ती कुठें असते, कुठें रहाते, कांहींच पत्ता लागत नाहीं. तिच्यांत खरोखरच कांहीं पैशाचिक शक्ति असली पाहिजे. तसें नसतें, तर आमच्या गुप्त कारस्थानांची बातमी तिला कशी कळती? सहस्रावधि गुप्त हेर तिच्या शोधार्थ पाठविले, परंतु कांहींहि पत्ता लागत नाहीं."

"मग आतां पुढें युक्ति?"

"आपण त्याची कांहींहि चिंता करूं नका. लौकरच पहा मी सर्वांचींच तोंडें बंद करून टाकतों. शकुनीच्या तावडींतून कोणीहि सुटणार नाहीं! रात्र फार झाली, आपण आतां अमळ विश्रांति घ्या." असें ह्मणून शकुनि आपल्या खोलीकडे निघून गेला.

जातांना एकदोन वेळां सतीशचंद्राकडे पाहून विकट हास्य करित तो स्वताशीं पुटपुटला "नि तूंहि कांहीं माझ्या तावडींतून सुटून जाणार नाहींस!"

## प्रकरण ९ वें.

## कपट जाल.

Curse on his perjured arts! dissembling smooth?
Are honor, pity, conscience, all exiled?
Is there no pity, no relenting truth?

*Burns.*

दुसऱ्या दिवशीं मोठ्या सकाळीं दिवाण सतीशचंद्र मोठ्या लव्याजम्यानिशीं मुंगेरीस निघून गेला. विमलेचा निरोप घेतेवेळीं ती आपल्या पित्यास ह्मणाली "बाबा, तुह्मी जातां तर मलाहि महेश्वराच्या मंदिरांत जाऊन रहाण्यास परवानगी द्या. तुह्मांला सुखी ठेवावं ह्मणून मी देवाची प्रार्थना करीन. तिथं मी काहीं दिवस रहाणार आहें."

सतीशचंद्रानें विमलेच्या विनंतीस अनुमोदन दिलें व मोठ्या दुखा:नें तिचा निरोप घेतला. कन्येच्या अश्रुजलांनीं पित्याच्या अंगावरील वस्त्रें भिजून चिंब झालीं. सतीशचंद्र निघून जातांच विमला किती वेळपर्यंततरी त्याच्याकडे एकसारखी टक लावून पहात होती. तो दृष्टिआड झाला, तेव्हां ती एक दीर्घ निश्वास टाकून आपल्याशींच ह्मणाली "बाबा! या विस्तीर्ण संसारांत तुमच्याशिवाय या हतभागिनीस आणखी कोण आहे? आपल्या अभावीं मला हा संसार केवळ निर्जन, अंधकारमय आहे. परमेश्वर आपणांस सुखी ठेवो! धर्ममार्गाकडे आपली प्रवृत्ति होओ! आपलं नैसर्गिक चरित्र उदार, अकपट आहे. कोणत्या वाईट मुहूर्तावर शकुनीशीं आपली भेट झाली?"

शकुनीचा निरोप घेतेवेळीं शकुनि सतीशचंद्रास ह्मणाला "आपण पुढें चला. समरसिंहाच्या विधवा स्त्रीला योग्य ठिकाणीं ठेवून, व महत्वाचीं दुसरीं कामें उरकून मीहि आपल्या पाठोपाठ आलोंच ह्मणून समजा."

यावर सतीशचंद्र ह्मणाला "तुला जें योग्य दिसेल तें कर. तुझ्या तीक्ष्ण बुद्धीवरच मी आतां सर्वस्वी अवलंबून आहें." इतकें म्हणून सतीशचंद्र चालता झाला.

सतीशचंद्राची पाठ फिरतांच शकुनि विकटहास्य करित ह्मणाला "अगदीं स्वस्थ रहा, कांहीं चिंता करूं नकोस! अशा बेमालूम रीतीनें तुझी वाट लावून टाकतों कीं, शेवटपर्यंत तूं माझ्या तीक्ष्ण बुद्धीची वाहवाच करित रहाशील! माझ्या तीक्ष्ण बुद्धीचें प्रत्यंतर पहावयास आतां कांहीं फार विलंब नाहीं!"

शकुनीचा व सतीशचंद्राचा आज आठ वर्षांचा परिचय होता. आठ वर्षांपूर्वी जेव्हां शकुनि प्रथमच सतीशचंद्राकडे आश्रयार्थ आला, त्या वेळीं तो वीस वर्षांचा तरुण बांड होता. सतीशचंद्र त्या वेळीं चाळिशीच्या सुमारें होता. 'मी एक गरीब, अनाथ ब्राह्मणपुत्र आहें, आपल्याकडे आश्रय मिळेल या आशेनें आलों आहें,' अशी त्यानें विनंति केली. सतीशचंद्रास त्या अनाथ ब्राम्हणपुत्राची दया येऊन आणि त्याची ती तेजस्वी, पाणीदार मुद्रा पाहून त्यानें त्यास आपल्या घरीं आश्रय दिला. आणि त्या दिवसापासून सतीशचंद्रानें आपल्या हृदयावर हा कालसर्प धारण केला होता.

धूर्त शकुनीनें सतीशचंद्राचें हृद्गत तत्काळ ओळखलें. सतीशचंद्राची दुर्दम नीच महत्वाकांक्षा त्याच्या लागलीच लक्ष्यांत आली. त्या भीषण अग्नींत शकुनि क्षणोक्षणीं आहुत्या टाकूं लागला, त्यामुळें अग्निज्वाला दिवसानुदिवस गगनास जाऊन भिडूं लागल्या. आणि या घोरमदानें मत्त होऊन सतीशचंद्र हिताहितज्ञानशून्य झाला. धर्माधर्माचें भय त्याच्या मनांतून पार नष्ट झालें व तो अगदींच अंध बनला.

शकुनीला योग्य संधि सांपडली. अंध मनुष्यास कुमार्गावर नेण्यास कांहीं प्रयास पडत नाहीं. चांगली सल्ला द्यावयाची सोडून शकुनि सतीशचंद्राला वाईट सल्ला देऊं लागला. सत्पथांतून काढून तो

आपल्या धन्यास कुमार्गानें नेऊं लागला. शेवटीं त्यानें आपल्या यजमानास अशा घोर पापपंकांत निमग्न करून टाकिलें कीं, त्याचा त्यांतून उद्धार होणें आतां अगदीं अशक्य, असंभाव्य होतें. आतां कुठें सतीशचंद्राचे डोळे उघडले होते. त्याच्या नेत्रांवरचें भ्रमपटल हळु हळू दूर होऊं लागलें होतें. परंतु आतां पश्चात्तापाखेरीज अन्य उपायच राहिला नव्हता. शकुनीचे मनोरथ पूर्ण झाले. आपल्या धन्यास त्यानें आपल्या पूर्णपणें अंकित केलें.

शकुनीला आपल्या घरीं आश्रय दिल्यावर लवकरच सतीशचंद्राला त्याची तीक्ष्ण बुद्धी दिसून आली. शकुनीचा अति नम्र स्वभाव पाहून तो फार संतुष्ट झाला. त्याची सल्लामसलत ऐकून सतीशचंद्र आश्चर्यानें तोंडांत बोट घाली. शकुनीवर त्याचें फारच मन बसलें. दिवसेंदिवस शकुनीवरील त्याचें प्रेम वृद्धिंगत होऊं लागलें. त्याला पुत्रसंतान नव्हतें, तेव्हां शकुनीलाच पुत्राच्या जागीं मानून तो त्याच्यावर पुत्राप्रमाणें प्रेम करी. शकुनीला दत्तकपुत्र करावा, असें तो कधींकधीं मनांत आणी व कधींकधींतर आपली कन्या देऊन त्याला आपला घरजांवई करावा, असाहि त्याचे मनांत विचार येई. परंतु निर्धन, निराश्रित अशा ब्राह्मणाच्या मुलास आपली मुलगी दिल्यानें लोकांत मानहानी होईल, या भीतिस्तव त्यानें शकुनीस अद्याप घरजांवई केला नव्हता. क्रमाक्रमानें कन्येचें वय अधिकाधिक होऊं लागलें. परंतु श्रीमंत, अधिकारसंपन्न लोकांनां कोण नांवें ठेवणार आहे? तशांत पत्नीचा अंतकाळ झाल्या दिवसापासून सतीशचंद्राचें आपल्या कन्येवरील प्रेम द्विगुणित झालें होतें. कन्येचें लग्न करून दिल्यास आपलें घर एकाएकीं स्मशानाप्रमाणें शून्य, भयाण वाटूं लागेल, या दुःखद विचारामुळें विमलेचें लग्न लांबणीवर पडूं लागलें आणि यामुळेंच शकुनीला जांवई करून दोघांनां आपल्याजवळ ठेवावें, हा विचार त्याला अधिकाधिक पसंत पडूं लागला.

पुढें जेव्हां पापपंकांत पूर्णपणें फसल्यावर सतीशचंद्राचे डोळे उघडले, तेव्हां मात्र हा विचार त्याच्या मनांतून समूळ दूर झाला. पाप ही इतकी कांहीं तिरस्कार उत्पन्न करणारी वस्तु आहे कीं, स्वतः पापी मनुष्य दुसऱ्या पापी मनुष्यावर मुळींच प्रेम करूं शकत नाहीं. सुशील, धर्मपरायण, सच्चरित्र अशा आपल्या प्रिय कन्येचा हात दुष्ट, पापिष्ठ, कुटिलस्वभावी शकुनीच्या हातांत देणें, हा नुसता विचारदेखील सतीशचंद्रास सहन होईनासा झाला. त्यानें विचार केला, मी पापिष्ठ खरा, पण पापालाहि कांहीं सीमा आहे! धर्मपरायण समरसिंहाची जरी मीं हत्या केली, तरी प्राणांपेक्षांहि प्रिय अशा माझ्या विमलेला मी नरकांत कधींहि लोटणार नाहीं. माझें जें काय व्हावयाचें होतें तेंतर होऊन चुकलेंच. परंतु बिचारी विमलातरी धर्ममार्गांत राहो. अशा प्रकारचे विचार सतीशचंद्राच्या मनांत नेहमीं येत असत; परंतु त्याला शकुनीपुढें ब्र उच्चारण्याची ताकद नव्हती. कारण, त्यानें आपलें गुप्तकृत्य सुभेदाराच्या कानांवर घातल्यास तत्काळ आपलें डोकें मारलें जाईल, ही सतीशचंद्रास मोठी भीति होती. बापडा शकुनीच्या पंजांत पूर्णपणें सांपडला होता.

शकुनि भयंकर पातकी होता, हें सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. सतीशचंद्रहि पातकी होता; परंतु त्याच्या पातकास कांहीं मर्यादा होती. त्याच्या चरित्रांत एकदोन सद्गुणहि होते. एकांतांत बसून आत्मनिरीक्षण करित असतांना त्याला कधींकधीं आपल्या कृष्ण कृत्याबद्दल तिरस्कार वाटे. पश्चात्तापानलानें त्याचें अंतःकरण दग्ध होई. परंतु दुष्ट शकुनीजवळ असेंहि अंतःकरण नव्हतें. केवळ विलक्षण स्वार्थपरता आणि दुर्भेद्य कुटिलता, यांशिवाय त्याच्या अंतःकरणास कांहींच ठाऊक नव्हतें!

शकुनीची सतीशचंद्रासारखी दुर्दमनीय—अति प्रबळ अशी एकहि मनोवृत्ति नव्हती. त्याच्या हृदयांतील सर्व प्रवृत्त्या शांत असून स्वार्थ-

परतेपुढें त्याला दुसरें कांहींएक दिसत नव्हतें आणि कळत नव्हतें. तो जंबुक मोठा धूर्त होता. कावळ्याप्रमाणें त्याची दृष्टि तीक्ष्ण होती. दुसऱ्याच्या मनांत काय चाललें आहे हें त्याला तत्काळ कळून येई. दुसऱ्याच्या मनाची पूर्णपणें ओळख करून घेतल्यावरच तो आपलें कपटजाल हळुहळू विस्तृत करित असे. आणि त्याचें तें कपटजाल इतकें सूक्ष्म, इतकें अदृश्य तथापि इतकें दुर्भेद्य असे कीं, कोणाची प्राज्ञा होती कीं तो त्यांतून निसटून जाईल! प्रेम, बंधुत्व, दया, माया, कृतज्ञताप्रभृति ज्या सर्व उच्च, कोमल, सुकुमार मनोवृत्तींनीं हें जग बद्ध झालें आहे, आणि ज्यांच्यामुळें समस्त मनुष्यजातीचें ऐक्य झालें आहे, त्या मनोवृत्तींपासून शकुनि अगदीं मोकळा होता. यशतृष्णा, धनतृष्णा, महत्वाकांक्षा इत्यादि ज्या प्रबळ मनोवृत्ति कित्येकांनां अगदीं अस्थिर करून सोडतात, त्यांच्यापासूनहि शकुनि अगदीं अलिप्त होता. आणि यामुळेंच आपली तीक्ष्णबुद्धि आणि अभेद्य कपटजाल यांच्या योगें आपला स्वार्थ साधून घेण्यास त्याला कधींहि अपयश येत नसे.

महाश्वेतेस धरावयाकरितां रुद्रपुर गांवीं पाठविलेले हेर रडवें तोंड करून माघारे आले, असें शकुनीनें सतीशचंद्रास सांगितलें होतें; परंतु तें खरें नव्हतें. त्यानें ती केवळ थाप मारली होती. शकुनीसारख्या धूर्त, कुटिलबुद्धि, महाकारस्थानी पुरुषाला महाश्वेतेसारख्या अबलेस पकडून आणणें मुळींच कठिण काम नव्हतें. परंतु सतीशचंद्राबरोबर मुंगेरीस जाण्याचें टाळण्याकरितांच हेरांसंबंधी खोटें वर्तमान त्यानें सांगितलें होतें. आह्मी प्रांजलपणें कबूल करितों कीं, शकुनीच्या विस्तीर्ण कपटजालाचा भेद करण्याचें सामर्थ्य आमच्याहि अंगीं नाहीं! परंतु प्रिय वाचकहो, चला, शकुनि बसला आहे तेथेंच आपण जाऊंया, ह्मणजे कांहीं थोडेंबहुत समजलें तर समजेल.

चतुर्वेष्टित गडाच्या एका प्रशस्त आणि सुशोभित दिवाणखान्यांत शकुनि यावेळीं एकटाच इकडूनतिकडे येरझारा करित होता. चाऱ्ही

बाजूंस असलेल्या धान्यांच्या विस्तीर्ण व हिरव्याचार शेतांची अपूर्व शोभा मधूनमधून तो अवलोकन करित होता. किल्ल्याच्या पायथ्याशीं शांत प्रवाहानें वहाणाऱ्या यमुना नदीचा कर्णमधुर कलरव तो कौतुकानें ऐकत होता. केव्हां केव्हां तो दुर्गांतील अंत:पुराकडे वेड्यासारखा टक लावून पाही. त्याच्या मुखमंडलावर आनंदाचें प्रतिबिंब स्पष्ट दृग्गोचर होत होतें. स्वार्थ साधला असतां स्वार्थपर मनुष्याच्या चर्येवर आनंद आणि उल्हास उमटलेला दृष्टीस पडतो, तसल्याच उल्हासाचें स्पष्ट चिन्ह शकुनीच्या मुद्रेवर यावेळीं दिसत होतें. तो आपल्या मनाशींच बोलूं लागला "या अफाट जमीदारीला, या प्रचंड गडाला, आणि या अंत:पुरवासिनी तरुण सुंदरीला आतां लवकरच नवा धनी प्राप्त होणार! समरसिंहाची प्रजा, सतीशचंद्राची प्रजा, लवकरच शकुनीच्या नांवाचा जयघोष करणार! शांत प्रवाहानें कलरव करित वहाणारी ही यमुना नदी लवकरच शकुनीचें यशोगान गाण्यास प्रारंभ करणार!—आणि तूं काय करणार विमले! सध्या तूं माझा तिरस्कार करतेस नव्हे? परंतु आतां तुझे तिरस्कार करण्याचे दिवस संपले. तुझी इच्छा असो वा नसो, आतां शकुनीला आपला पति समजून तुला आलिंगन द्यावेंच लागेल! त्यावरहि जर तूं माझा तिरस्कार केलास तर या क्षुद्र पतंगाप्रमाणें मी तुला आपल्या पायाखालीं अश्शी चिरडून टाकीन!—आणि या चिरडून टाकलेल्या मृत पतंगाप्रमाणें तुला अश्शी फेंकून देईन! प्रेमपिपासेकरितां कांहीं मी तुझ्याशीं विवाह करित नाहीं. प्रेम हा लहानलहान बालकबालिकांचा खेळ होय, असेंच मी समजतों. तुझ्या रूपलावण्याला मुग्ध होऊनहि तुझ्याशीं मी लग्न लावित नाहीं. रूपलावण्याची मला मुळींच पर्वा नाहीं! आणि यदाकदाचित् असलीच, तर माझ्यासारख्या लक्ष्मीपुत्रांनां त्या गोष्टीचें काय कमी आहे? मग तुला मी कां बरें चिरडून टाकणार

नाहीं? सतीशचंद्र! आज मी तुला मुंगेरीस नव्हे तर यमपुरीसच पाठविलें आहे. अशा धूर्त दूतांची मीं योजना केली आहे कीं, आतां गोष्ट गुप्त रहाणें अशक्य आहे! इतकेंच नाहीं, तर शकुनीचेहि सर्व अपराध तुझ्याच शिरावर लादले जाणार.—पुढें? पुढें निःसंतान सतीशचंद्राच्या मृत्यूनंतर त्याच्या जामाताशिवाय या विस्तीर्ण जाहागिरीचा धनी कोण होणार? तीक्ष्णबुद्धीचा चिरकाल जय असो!!"

ह्या हर्षातिशयानें त्यानें टाळ्या वाजविल्या. त्यांचा प्रतिध्वनि त्या दिवाणखान्यांत झाला व तो ऐकून शकुनि दचकला. तो आपल्या सुखद विचारांत अगदीं मग्न झाला होता. टाळ्यांचा आवाज ऐकतांच तो शुद्धीवर आला. इतक्यांत त्याची दृष्टि अंतःपुराकडे गेली अंतःपुराच्या गवाक्षांत विमला उभी होती. पिता निघून गेला तरी ती त्याच्या रस्त्याकडेच एकसारखी टक लावून पहात होती. रडूनरडून तिचें प्रफुल्ल मुखकमल म्लान झालें होतें. दोन्ही डोळ्यांतून अजूनहि आस्वें टपटप पडत होतीं. अधरोष्ठ थरथर कांपत होता. राहूनराहून हुंदके बाहेर पडत होते. डोळे पुसूनपुसून पदर अगदीं ओलाचिंब झाला होता. विमला उच्चस्वरानें रुदन करित नव्हती. क्षणांत ती शांत राही व क्षणांत पुनः रडूं लागे. अत्यंत वेगानें बाहेर पडूं पहाणारे हुंदके आंतल्याआंत दाबून टाकण्याचा ती खूप प्रयत्न करित होती, परंतु कांहीं वेळानें तेच हुंदके अनावर होऊन भराभर भराभर बाहेर पडूं लागत.

विमलेची ही करुणास्पद स्थिति पाहून शकुनीनेंहि आपल्या नेत्रांत पाणी आणलें, आणि खिडकीबाहेर डोकें काढून तो तिच्याकडे पहात उभा राहिला. विमलेनें सहजगत्या पाहिलें, तों शकुनि उभा आहे! क्रोध, तिरस्कार यांच्या तिच्या कपाळावर आंठ्या चढल्या व ती तेथून लागलीच आंत निघून गेली. विमलेचें मन हरण करण्याचा शकुनीचा हा प्रथमच प्रयत्न निष्फल झाला!!

## प्रकरण १० वें.
## दोन उपासक.

Enamoured, yet not daring for deep awe
To speak her love :—and watched his nightly sleep,
Sleepless herself, to gaze upon his lips
Parted in slumber, whence the regular breath
Of innocent dreams arose : then when red morn
Made paler the pale moon, to her cold home
Wildered and wan and panting, she returned.

*Shelly.*

चतुर्वेष्टित गडापासून सुमारें पांचसहा कोसांवर इच्छामती नदीच्या किनाऱ्यावर सुप्रसिद्ध महेश्वराचें मंदिर होतें. संध्याकाळीं शिबिकेंत बसून विमलेनें मंदिराकडे प्रयाण केलें. तिच्याबरोबर दोघीचौघी वृद्ध स्त्रिया आणि अनेक दासदासी होत्या. बंगालदेशाच्या दिवाणाच्या एकुलत्याएक मुलीला साजेल अशा लवाजम्यानिशीं आणि थाटमाटानें विमला निघाली होती.

दूर दूर देशांहून असंख्य लोक देवदर्शनासाठीं ह्या मंदिरांत येत असत. वृद्धस्त्रिया आपल्या पुत्रपौत्रादिकांच्या मंगलासाठीं देवाची आराधना करावयास येत. तरुणस्त्रिया पुत्रप्राप्तीच्या कामनेनें नवस करावयास येत. रोगांनीं पीडिलेले आरोग्यलाभाच्या इच्छेनें, योद्धे जयलाभाच्या हेतूनें, कृपण धनलालसेनें, तरुण मुलें विद्येच्या अभिलाषेनें, सारांश, सहस्रावधि मनुष्यें नानातऱ्हेचे हेतूंनीं येऊन या मंदिरांत एकच गर्दी करित असत. दर्शनार्थ येणाऱ्या या भाविक लोकांपासून देवास पुष्कळ प्राप्ति होत असे. आणि बऱ्याच वर्षांपासून हा क्रम सुरू असल्यामुळें या मंदिरांत आजमितीला अलोट संपत्ति जमा झाली होती. मंदिर मध्यभागीं असून त्याच्या चाऱ्ही बाजूंस समांतरावर सुंदर शुभ्र संगमरवरी पाषाणाच्या प्रशस्त धर्मशाळा सुरेख ओळींत बांधिलेल्या होत्या. या धर्मशाळांमध्यें यात्रेकरू उतरत असत. यात्रेकरूंपासून जें कांहीं मिळे तें सर्व देवाच्याच खर्चास लावलें जाई.

मंदिराच्या चाऱ्ही बाजूंस प्रशस्त धर्मशाळा असत, हें वर सांगितलेंच आहे. या धर्मशाळा आणि मुख्य मंदिर यांच्यामध्यें मोठमोठीं विस्तीर्ण पटांगणें होतीं. यामुळें मंदिराच्या कोणत्याहि बाजूस उभें राहिलें ह्मणजे समोर प्रशस्त धर्मशाळांशिवाय कांहींहि दिसत नसे. या धर्मशाळांमधून मंदिराकडे जावयास चाऱ्ही बाजूंस चार सिंहद्वारें होतीं. शिबिका किंवा रथ या सिंहद्वारांपर्यंतच जाऊं शके, पुढें जाण्यास परवानगी नसे. सिंहद्वारांतून एकवार आंत प्रवेश केला ह्मणजे धन, जाति, गौरव यांचा भेदाभेद उरत नसे. सार्वभौमराजाच्या एकुलत्याएक राजकन्येलाहि एखाद्या भणंग भिकारणीशीं भिडून मंदिरामध्यें पायानेंच चालत जावें लागे. गर्दीमध्यें एखादा भस्मविभूषित संन्यासी, मूल्यवान् रत्नजडित सुवर्णालंकार धारण केलेल्या राजपुत्रास रेंटून मंदिरामध्यें जाई. उघडच आहे, धर्मासमोर उच्चनीच, श्रीमंतगरीब हा भेदाभेद कोठून रहाणार?

मंदिराच्या सभोंवतालचें पटांगण जरी अत्यंत विस्तृत होतें, तरी तेथें कधींकधीं लोकांची इतकी गर्दी होत असे कीं, त्या वेळीं मुंगीसहि रिघाव मिळणें महा मुष्किलीचें होई. तेथें जमणारांपैकीं सर्वच दर्शनाकरितां येत, असें नाहीं. नानाप्रकारचे व्यापारी तऱ्हेतऱ्हेच्या वस्तु विक्रीसाठीं घेऊन येत असत. लहानलहान मुलांचीं खेळणीं, तरुण स्त्रीपुरुषांचे नानातऱ्हेचे सुंदर अलंकार, कापडचोपड, मेवामिठाई यांचा रोज कितीतरी विक्रय होई! आणि गिऱ्हाइकांच्याहि मधमाशांप्रमाणें झुंडींच्याझुंडी लोटत.

विमलेला आपल्या सर्व मंडळीसह महेश्वराच्या मंदिरांत येऊन पोहोंचेपर्यंत घटका अर्धी घटका रात्र झाली. सामानसुमानाची व्यवस्था लावून मंडळी भोजन उरकते, तों मध्यरात्र उलटून गेली. "रात्र फार झाल्यामुळें आतां पूजेस जाऊं नका," असें विमलेस तिच्या सोबतिणींनीं जीव तोडतोडून सांगितलें; परंतु विमलेचें हृदय

चिंतापरिपूर्ण झालें असल्यामुळें मैत्रिणींचें सांगणें तिला रुचलें नाहीं. ती म्हणाली "क्षमा करा. देवाची उपासना केल्यावांचून मी आज निजणार नाहीं; मला झोंप येणारच नाहीं." असें ह्मणून विमला एकटीच देवाच्या गाभाऱ्यांत जावयास निघाली.

या वेळीं चंद्रोदय झाला होता. समोर महेश्वराचें उंच मंदिर चंद्रप्रभेंत अधिकच उज्वल दिसत होतें. सुनील आकाशपटावर जणों तें एखाद्या सुंदर चित्राप्रमाणें शोभत होतें. चाऱ्ही बाजूंस प्रशस्त शुभ्र संगमरवरी पाषाणाच्या धर्मशाळा चंद्रकिरणांमध्यें फारच शोभिवंत दिसत होत्या. धर्मशाळांमधून असंख्य दिव्यांचा प्रकाश दृग्गोचर होत होता. मधलें विस्तीर्ण पटांगण आतां प्रायः जनशून्य झालें होतें. दिवसा ज्या जागीं मनुष्यांची मुंग्यांसारखी गर्दी झालेली असे, तेथें आतां शांततादेवीनें आपलें अखंड साम्राज्य पसरलें होतें. जागजागीं वृक्षपल्लवांमधून काजव्यांचे पुंज चमकत होते, व ती खद्योत-प्रभा नयनांस फारच आनंद देत होती. राहूनराहून शीतल सुगंधित वायूच्या झुळकांवर झुळका येत होत्या व त्यायोगें वृक्षपर्णांतून गंभीर रव उत्पन्न होत होता. पानांच्या सळसळाटाखेरीज आणखी कसलाहि शब्द ऐकूं येत नव्हता; मात्र मधूनमधून घुबडांचा गंभीर स्वर वातावरणांत उठून दूरवर घुमत जात होता. त्याचप्रमाणें केव्हांकेव्हां दूरच्या शेतांतून गाईचें हंबरणें ऐकूं येत होतें व केव्हांकेव्हां आस-पासच्या गांवांतील शेतकरी लोकांचें अस्पष्ट गान वायूच्या झुळके-बरोबर येऊन कर्णरंध्रांत प्रवेश करित होतें.

अशा निस्तब्ध शांतमार्गानें चालतांचालतां विमलेचें हृदयहि किंचित् शांत झालें. तिची चिंता किंचित्शी दूर झाली. प्रकृतिदेवीची ती विलक्षण निस्तब्धता अवलोकन करून विमलेच्याहि हृदयांत शांत रसाचा प्रादुर्भाव झाला. प्रातःकाळीं मंदिराच्या पटांगणांत एखाद दुसराच मनुष्य दिसत असे. माध्याह्नीं लोकांची एकच गडबड होई,

व संध्याकाळीं पुनः लोकांची वर्दळ हळुहळू कमी होत जाऊन अखेरीस रात्रीं सर्वत्र निस्तब्ध, निर्जन, शांत होई. विमलेच्या डोक्यांत विचार आला, मनुष्याच्या जीवनाचीहि हीच स्थिति आहे. बाल्यकाळीं मनाच्या प्रवृत्तीला हळूहळू चलन मिळतें. तरुणपणांत त्याच मनोवृत्ती इतक्या उद्दाम आणि बेफाम होतात कीं, सांगतां सोय नाहीं. वार्धक्यांत हळुहळू त्या प्रवृत्ती क्षीण होत होत शेवटीं मनुष्य लवकरच शांत, निस्तब्ध, होऊन एखाद्या क्षुद्र जलबिंदूप्रमाणें अनंत अशा सागरांत मिळून जातो. अशी जर मनुष्यमात्राची वास्तविक स्थिति आहे, तरमग एवढी धामधूम कशाकरितां? एवढा दर्प, एवढा अहंकार, गर्व, कपट, कारस्थान कशासाठीं? एवढा क्रोध, लोभ, अर्थतृष्णा, महत्वाकांक्षा कां? कोणी याचें कारण सांगू शकेल? विधिलीलेचा कोणास अंत लागणार आहे! क्षणार्धांत जळून भस्म होणारा पतंग आपले पंख विस्तारून आकाशांत कोणत्या हेतूस्तव भरारी मारतो? क्षणांत मनुष्याच्या पायांखालीं तुडविला जाऊन नाहींसा होणारा, किंवा प्रखर रविकिरणानें सुकून जाणारा जो शिशिरबिंदु त्याच्या ठायीं हिऱ्याप्रमाणें तेजस्वी आणि मोहक तेज कां येतें?

या प्रकारच्या विचारांत विमला अगदीं निमग्न झाली असतां तिच्या कर्णपटावर एकाएकीं दोन प्रहर रात्रीचा गंभीर घंटारव येऊन आदळू लागला. चारही बाजूंच्या शुभ्र पाषाणनिर्मित धर्मशाळांमध्यें प्रत्याघात होऊन तो घंटारव दसपट अधिक झाला, व निशाकालीन वातावरणांत घुमत घुमत दिग्दिगंतर कंपायमान करूं लागला. घंटारव बंद पडतो न पडतो तोंच आरतीस आरंभ झाला. महेश्वराच्या अनंत महिमेचें स्तुतिगीत सप्तस्वरांत सुरू झालें. तें स्तुतिस्तोत्र गाणारांचें हृदय भक्तिरसानें अगदीं उचंबळून येत होतें. कधीं मंद, तर कधीं उच्च स्वरांत भक्तिभावानें, प्रेमळपणें तल्लीन होऊन गात असलेल्या

त्या भक्तगणाच्या स्वरामध्यें विमलेनेंहि आपला स्वर मिळविला, व त्याबरोबर पवित्र प्रेम, निःसीम भक्ति आणि उल्हास यांनीं तिचें हृदय उचंबळूं लागलें.

थोड्या वेळानें बहुतेक भक्तगण आपापल्या स्थानीं निघून गेले. प्रेमळांतःकरणानें विमला देवाची पूजा करूं लागली. जवळजवळ एक प्रहरभर ती डोळे मिटून व एकाग्र ध्यान करून देवाची आराधना करित होती. यावेळीं अंतःकरणांतील पवित्र कामनेचें प्रतिबिंब तिच्या वदनमंडलावर स्पष्टपणें उमटलेलें दिसत होतें. विमलेला आई, भाऊ, बहीण, स्नेही, कोणीहि नव्हतें. तिच्या साऱ्या प्रेमाचा आधार, प्रीतीचें स्थान, तिची आई, भाऊ, बहीण, स्नेही सर्व कायतो तिचा पिता होता. त्यावांचून तिला दुसरें प्रेमस्थान नव्हतें. विमलेचा अपार स्नेहस्रोत, अपरिसीम भक्तिस्रोत-प्रवाह-त्या एकमात्र आधार-स्थानाकडे वाहूं लागला. पित्याच्या दुःखांत तिला दुःख होई, पित्याच्या आनंदांत तिला आनंद, संकटांत चिंता, ऐश्वर्यात समाधान वाटे. सारांश, एका पित्यासाठींच विमलेनें जन्म धारण केला होता. त्या पित्याच्या मंगलाची प्रार्थना करितांकरितां विमलेचें हृदयकपाट खुलें झालें. हृदयाच्या रोमरोमांत भक्तिरस खेळूं लागला. बराच वेळपर्यंत एकाग्रचित्तानें तिची उपासना चालली होती. उपासना संपतांच जेव्हां तिनें देवास साष्टांग दंडवत घातला आणि गात्रोत्थान केलें तेव्हां तिचें हृदय संपूर्ण प्रकारें चिंताशून्य आणि शांत झालें.

पूजा आटोपतांच मंदिरांतून एकदम निघून न जातां ती तेथेंच इकडेतिकडे फिरत औत्सुक्यपूर्ण दृष्टीनें मंदिराची शोभा अवलोकन करूं लागली. पुष्कळ वर्षांनीं आज ती येथें आली होती, त्यामुळें प्रत्येक वस्तु तिला नवीनवी भासूं लागली. महेश्वराच्या मंदिरासारखें उत्कृष्ट, प्रशस्त, उंच आणि बळकट मंदिर तिनें आणखी कोणतेंहि पाहिलें नव्हतें. ते सुवर्णमंडित व पुष्पालंकृत स्तंभ, कुशल चितार्‍यांनीं भिंतीवर काढलेल्या अपूर्व वेलपत्ती, चित्रें, देखावे, यांचें निरीक्षण करितकरित

ती मंदिररक्षकांजवळ त्या मंदिराविषयीं प्रश्न विचारित इकडेतिकडे फिरूं लागली. मंदिरांत यावेळीं कोणीहि उपासक नव्हता, त्यामुळें आपली उत्सुकता पुरविण्यास विमलेस कसलीहि अडचण आली नाहीं.

फिरतांफिरतां मंदिराच्या एके बाजूस निजलेल्या एका उपासकाकडे विमलेची सहजगत्या नजर गेली. त्याचें अलौकिक तेज, लोकोत्तर सौंदर्य पाहून विमला विस्मितच झाली. त्याच्यावरून दृष्टि काढून अन्य दिशेकडे पहावयास तिचे डोळे कबूल होईनात. त्या तरुणाचें ललाट प्रशस्त आणि उदार होतें, परंतु हृदयांतील कोणत्यातरी गाढ चिंतेमुळें तें झोंपेंतहि संकुचित झालेलें दिसत होतें. डोळे झांकलेले होते. वदनमंडळ तेजपरिपूर्ण आणि वीरत्वव्यंजक होतें. या युवकाचें आपाद मस्तक निरीक्षण करून विमलेनें तर्क केला कीं, हा कोणीतरी वीर-पुरुष आपल्या शौर्याचें चीज करण्यासाठीं दूरदेशीं जात असतां मार्गांत हें मंदिर लागलें ह्मणून देवाचें दर्शनहि अनायासें घ्यावें, या उद्देशानें येथें आला असावा. दिवसभर चालून चालून थकल्यामुळें अगर आणखी कोणीकडे चांगली जागा न मिळाल्यामुळें पूजा आटोपल्यावर हा येथेंच निजला आहे. विमलेच्या अबलाहृदयांतहि वीरत्वाचा अभाव नव्हता. यामुळें त्या तरुणाची ती वीर—आकृति पहातांच विमला स्तंभित झाली. त्या तरुणाकडे ती डोळ्याचें पातें न हलवितां एकसारखी टक लावून पाहूं लागली. इतक्यांत तरुणाची निद्रा भंग पावली व तो आपल्या जागेवर उठून बसला. तरुण डोळे उघडतो तोंच त्याला आपल्या समोर कोणीएक उज्वलनयना तन्वंगी उभी आहे, असें दिसून आलें. उभयतांची दृष्टादृष्ट होतांच विमला शुद्धीवर आली. अपरिचित पुरुषाकडे आपण निर्लज्जपणें पहात होतों असें मनांत येतांच ती लज्जित झाली व अधोमुख करून हळुहळू मंदिराबाहेर निघून गेली.

प्रात:काळ झाला होता. चाऱ्ही बाजूंस एखाददुसरें माणूस बाहेर जातांना दृष्टीस पडत होतें. साधारण लोकांच्या समोर पायीं चालणें विमलेला कधींच ठाऊक नव्हतें. यामुळें ती झपझप पावलें उचलित बिऱ्हाडाकडे चालली. वृद्धस्त्रिया जेव्हां विचारतील कीं, हा वेळपर्यंत तूं काय करित होतीस, तेव्हां विमला काय उत्तर देईल?—हा वेळपर्यंत ती काय देवाची पूजाच करित होती?

विमलेच्या मनांत अनेक प्रश्न उद्भवूं लागले. हा वीरपुरुष कोण असावा? हा सर्व रात्र देवाची कशासाठीं प्रार्थना करित होता? हा भाग्यवान् पुरुष देवाकडे इतकें काय मागत होता? अशा प्रकारचे प्रश्न आपल्या मनास विचारितविचारित विमला आपल्या शयनागारांत आली.

## प्रकरण ११ वें.

## परिचय.

Amid the jagged shadows
Of mossy leafless boughs,
Kneeling in the moonlight
To make her gentle vows;
Her slender palms together prest,
And heaving sometimes on her breast;
Her face resigned to bliss or bale,—
Her face, o! call it fair not pale,—
And both her eyes more bright than clear,
And each about to have a tear.

*Coleridge.*

समस्त रात्रीच्या जागरणानंतर किंचित् विश्रांति घ्यावयाकरितां ह्मणून विमला आपल्या शयनगृहांत गेली होती. परंतु तिला कांहीं चांगलीशी झोंप लागली नाहीं. जी कांहीं थोडीशी झोंप लागली, तीहि स्वप्नपरिपूर्ण. तें विस्तीर्ण पटांगण, तें स्वच्छ पिठासारखें चांदणें, तें उंच महेश्वरमंदिर, त्यांतील ती देवाची सुंदर मूर्ति, तो तरुण वीर उपासक, हीं सर्व तिला क्षणोक्षणीं स्वप्नांत दिसूं लागलीं.

विमला जागी होऊन पहाते तों खिडकींतून सूर्यकिरणांनीं प्रवेश केला असून सर्व खोली प्रकाशमय झालेली आहे. बाहेर मनुष्यांची वर्दळ सुरू झाली आहे, जिकडेतिकडे एकच गलबला झालेला आहे. जागरणामुळें विमलेचे डोळे किंचित् ओढल्यासारखे होऊन तिचें स्वाभाविक गौरवदन रक्तशून्य झाल्यामुळें तें अधिकच गौर दिसत होतें. कपाळावर, गालांवर व वक्षस्थळावर किंचित् घाम आला होता. मस्तकावरील इकडेतिकडे विखुरलेले केश किंचित् बांधलेसे करून तिनें आपल्या शय्येचा त्याग केला.

सर्व दिवसभर विमला अगदीं खिन्न, उदास होती. घडीघडी तिला गेल्या रात्रीच्या प्रसंगाचें स्मरण होऊं लागलें. आज असें कां होतें, याचें कारण तिनें पुष्कळ विचार करकरून शोधून पाहिलें, पण कांहींहि लक्ष्यांत येईना.

त्या दिवशीं रात्रीं एक प्रहराच्या सुमारास विमला पुनः देवाची उपासना करावयास गेली. सर्व दिवसभर ती अगदीं उदास होती; परंतु उपासनेच्या समयीं तिचें चित्त स्थिर झालें. देवाला साष्टांग दंडवत घालून तिनें आपली उपासना आटोपली.

विमला उठून उभी रहाते तोंच तिला पुनः तो कालचा तरुण समोर उभा असलेला दृष्टीस पडला. तरुणहि नुक्ताच देवाची उपासना आटोपून उठला होता. विमलेचे ठायीं मनोनिग्रह करण्याचें सामर्थ्य होतें. क्षणमात्र तिनें त्या तरुणाकडे आपल्या सतेज नेत्रांनीं पाहिल्यावर आत्मसंयमन करून ती मंदिरांतून स्वस्थानीं जाऊं लागली.

तरुण किंचित् विस्मित झाला. दोनहि दिवशीं तीच परम सुंदर रमणी त्याच्या दृष्टीस पडली, व दोनहि दिवशीं तिनें क्षणमात्र त्याच्याकडे कांहीं चमत्कारिक दृष्टीनें पाहिलें. ह्या तरुणीचा आपल्यास कांहींतरी कळविण्याचा हेतु आहे; परंतु लज्जेमुळें अपरिचित पुरुषाशीं बोलावयास तिचें मन धजत नाहीं, अशी त्या तरुणाच्या मनाची पक्की खात्री झाली. एकवार त्याला असेंहि वाटलें कीं, तिच्याजवळ जाऊन आपण तिला विचारावेंच. परंतु अपरिचित तरुण कुलीन स्त्रीजवळ एकदम जाऊन भाषण कसें करावें? या विचारानें त्याची मति कुंठित होऊन तो निराश झाला. पुनः तो आपल्या मनाशींच ह्मणाला "बरें, मीं तिच्याजवळ जाऊन तिला विचारलें नाहीं, तर तिचा कांहीं उद्देश असल्यास तो कसा सिद्धीस जावा? ज्या हेतूनें ती या मंदिरांत आली, तो तिचा हेतू विफल होईल." असा विचार करून तो हळुहळू विमलेजवळ जाऊन ह्मणाला "मी अपरिचित असतां आपल्याशीं भाषण करण्याचें धाष्टर्य करित आहें, याबद्दल क्षमा असावी. पण मला खात्रीपूर्वक वाटत आहे कीं, आपल्या मनांतून मला कांहींतरी सांगायचें आहे. माझा हा तर्क चुकीचा नसल्यास आपली आज्ञा काय आहे ती बेलाशक सांगा; कसलीहि अंदेशा मनांत ठेवूं नका."

विमलेच्या कानांमध्यें जणों अमृताची वृष्टीच झाली. तिचें हृदय किंचित् कंपायमान झालें. पाषाणाच्या मूर्तीप्रमाणें खालीं मान घालून ती अगदीं निश्चळ उभी राहिली.

आपल्या प्रश्नास कांहींच उत्तर नाहीं, रमणी खालीं मान घालून तटस्थ उभी आहे, असें पाहून तो युवक पुनः ह्मणाला "आपणास जर कांहीं सांगायचें असेल तर सांगा—बिनदिक्कत सांगा, इथें आणखी कोणीहि नाहीं."

विमलेनें भीत भीत विचारलें "आपलं नांव काय?"

युवकानें उत्तर दिलें "सध्या इंद्रनाथ या नांवानें मला ओळखावें."

विमलेला आतां थोडेंसें धैर्य वाटून तिनें दुसरा प्रश्न केला "कोणता हेतु मनांत धरून महेश्वराच्या दर्शनास आपलं येणं झालं आहे, हें आपल्याला मला विचारतां येईल काय?"

इंद्रनाथ ह्मणाला "मी आपणास थोडक्यांत सांगतों. एका अनाथ, निराश्रित स्त्रीस साह्य करण्याचा माझा कृतसंकल्प आहे."

"पैशाचं साह्य पाहिजे असल्यास मी—"

"नाहीं. तिला पैशाचें साह्य मुळींच नको आहे! तरीपण अपरिचित मनुष्यावर परोपकार करायास आपली इतकी तयारी आहे, याबद्दल मी आपले फारफार आभार मानतों. परमेश्वर आपणास सुखी ठेवो."

"तरमग त्या स्त्रीला कसचं साह्य पाहिजे?"

"न्याय! तिला फक्त न्याय पाहिजे. मी मुंगेरीस जाऊन न्याय मागणार आहें. पण आपण हें सर्व कशाकरितां विचारितां?"

मुंगेरीचें नांव ऐकतांच विमलेला आपल्या पित्याचें स्मरण झालें. सतीशचंद्राच्या विपत्तीची आठवण होण्याबरोबर तिची सर्व लाजलज्जा, भीडमर्यादा अंतर्धान पावली. इंद्रनाथास ती सजल नयनांनीं ह्मणाली "आपण वीरपुरुष असल्याचं आपली मुद्रा सांगत आहे. आपलं

सामर्थ्यहि अपार दिसतं. ही गरीब दासी आपणाकडे एका गोष्टीची भिक्षा मागते आहे. परंतु आधीं मला वचन द्या."

इंद्रनाथ गहिंवरून म्हणाला "सुंदरी! माझें सामर्थ्य तें काय! तरीपण आपली आज्ञा प्राणांचीहि पर्वा न करितां मी पालन करीन."

विमला ह्मणाली "बंगदेशचे दिवाण सतीशचंद्र हे मुंगेरीस गेले आहेत. ते सध्या भयंकर विपत्तींत आहेत. 'त्यांचं रक्षण करीन,' असं मला वचन द्या."

हें चमत्कारिक भाषण ऐकतांच इंद्रनाथाचें मुख गंभीर झालें. त्याच्या कपाळाला आंठ्या पडल्या. हें पाहून विमला पुनः ह्मणाली "आपण एवढ्या कसल्या विचारांत पडलां आहां? विपद्ग्रस्त लोकांच्या संकटाचा नाश करणं हें वीर पुरुषाचं कर्तव्य नाहीं काय? सतीशचंद्राविषयीं आपण कांहीं भलतंसलतं ऐकिलं असेल, तर तें सर्व खोटं आहे! तें सर्व शकुनीचंच कपट होय."

"आपण काय ह्मणतां हें मला कांहीं समजत नाहीं. काय तें स्पष्ट सांगा. शकुनि आणखी कोण?"

"शकुनि सतीशचंद्राचा राहू! तोच मेला दुष्ट सर्वस्वी अपराधी आहे. सतीशचंद्राच्या उदार चरित्रास कलंकाचा स्पर्शहि झाला नाहीं. महाराज! सतीशचंद्रास आपण मदत कराल याविषयीं या महेश्वराच्या समोर शपथ वहा."

हें सर्व भाषण ऐकून इंद्रनाथ हतबुद्धच झाला. कांहीं वेळानंतर तो ह्मणाला "सतीशचंद्र खरोखरच जर निर्दोषी असेल तर मी आपले प्राणहि देऊन त्याला वांचविण्याचा प्रयत्न करीन. बरें, पण आपलें नांव काय? आपण कोण आहां? व माझ्या प्रतिज्ञेचें आणि उपासनेचें कारण आपणांस कसें समजलें?"

विमलेनें मंदस्वरानें उत्तर दिलें "आपला उद्देश काय तें मला ठाऊक नाहीं; परंतु आपण कुणीतरी मोठे वीर पुरुष आहां, व मुंगेरीस

कांहीं महत्कार्याकरितां जात आहां, असं मला माझी मनोदेवता सांगत आहे. आपला कांहीं अधिक परिचय मिळाल्यास ठीक होईल."

इंद्रनाथ ह्मणाला "माझा परिचय सध्या एवढाच पुष्कळ आहे; मी एका कायस्थ जमीदाराचा मुलगा आहें, व युद्धविद्येंत पारंगत व्हावयाकरितां मुंगेरीस जात आहें."

ब्राह्मणकुमारी निस्तब्धपणें मंदिराबाहेर पडून आपल्या निवासस्थानाकडे चालती झाली.

## प्रकरण १२ वें.

## अपरिचित नौकापति.

How he heard the ancient helmsman
chant a song so wild and clear,
That the sailing sea-bird slowly
Poised upon the mast to hear.
Till his soul was full of longing,
And he cried with impulse strong,—
"Helmsman! for the love of heaven,
Teach me, too, that wondrous song!

*Longfellow.*

मुंगेरचा प्रचंड आणि भव्य किल्ला गंगानदीच्या रम्य तीराला फारच शोभा देत होता. नदीच्या पृष्ठभागावर लहानलहान तरंग उठून खळखळ शब्द करित किल्ल्याच्या पायथ्यावर जाऊन आदळून मस्तकावर फेन धारण करून पुनः त्वरेनें मागें जात होते. कोठें कोठें कांठावरील माती जलप्रवाहांत डुबकन् पडून पाणी किंचित् गढूळ होई, परंतु क्षणमात्रांत तें पूर्ववत् स्वच्छ होऊन गंभीर प्रवाहानें वाहूं लागे. जागजागीं शुभ्र वाळूच्या बेटांवर नानाविध पक्षी विहार करितांना दृष्टीस पडत होते. कोठें कोठें नावाडी आणि मुशाफर लोक किनाऱ्यावर उतरून स्वयंपाक करण्यांत गढून गेलेले दिसत होते. या नौकांमधील असंख्य दीपांचा सुंदर प्रकाश दुरून नक्षत्रज्योतीसारखा भासत असून त्यांचें प्रतिबिंब नदीच्या निर्मळ पाण्यांत पडून मोठी अपूर्व शोभा दिसत होती. क्रमाक्रमानें गगनमंडलांतहि एकएक तारा उदय पावूं लागला. किनाऱ्यावर एखाददुसरें माणूस उच्च स्वरांत स्वच्छंदानें गायनाचे आलाप घेतांना ऐकूं येत होतें. नगरांतील जनतेचा शब्द हळुहळू मंदमंद होत चालला होता.

अशा त्या गंगातीरावर एक तरुण एकटाच इकडेतिकडे हिंडत होता. हा आमच्या वाचकांच्या परिचयांतील इंद्रनाथच होय. इंद्रनाथ आजच मुंगेरीस येऊन पोहोंचला होता. कसल्याशा गूढ विचारांत मग्न होऊन तो किनाऱ्यावर इतस्ततः भ्रमण करित होता.

ऐकून हृदय तृप्त करावें, अशी माझ्या मनाला मोठी अभिलाषा उत्पन्न झाली आहे. कृपा करून ती तृप्त कराल, तर मी आपला अत्यंत आभारी होईन."

तो मनुष्य ह्मणाला "आपल्यासारख्यांशीं आज माझा परिचय झाला, हें खरोखर मी आपलें महद्भाग्य समजतों. या, आनंदानें नौकेंत या, व तुह्मांला माझें गाणें इतकें आवडत असेल तर तें खुशाल ऐका."

इंद्रनाथ त्याप्रमाणें नौकेंत बसला. नौका पुनः चालू झाली; त्या सुंदर सकरुण गायनानें पुनः निशाकालीन गगन व्यापून टाकिलें.

बऱ्याच वेळानंतर त्या मनुष्यानें इंद्रनाथाला विचारिलें "महाराज, आपण मुंगेरीस कधीं आलां?"

इंद्रनाथानें उत्तर दिलें "आजच आलों आहें."

"आपलें नांव काय? आपण रहातां कुठें?"

"मला इंद्रनाथ ह्मणतात. माझें घर नदिया जिल्ह्यांत आहे."

"नदिया जिल्ह्यांत? नदिया जिल्ह्यांत आपण कोणत्या बरें गांवीं रहातां?"

"इच्छापुर गांवीं."

"काय! इच्छापुर? बरें, आपल्या वडिलांचें नांव काय?"

"कां बरें, आपण इच्छापुरास कधीं गेलां होतां कीं काय?"

बराच वेळपर्यंत तो अपरिचित मनुष्य स्तब्ध राहिला. नंतर ह्मणाला "कामानिमित्त मला सर्व ठिकाणीं जावें लागतें. आपल्या वडिलांचें नांव काय? कदाचित् मी त्यांनां ओळखितहि असेन."

इंद्रनाथ कोणालाहि आपली ओळख देत नसे. छद्मवेष धारण करून तो देशान्तर करित होता. परंतु आपल्या या नूतन मित्रापासून आपल्या पित्याचें नांव गुप्त ठेवण्याचें त्याला कांहींहि प्रयोजन दिसलें नाहीं. आपल्याला घरून आल्याला बरेच दिवस झाले आहेत; कदाचित् हा गृहस्थ इच्छापुराहून नुकताच आला असल्यास आपल्या

घरचा समाचारतरी कळेल, असा विचार करून इंद्रनाथ म्हणाला "इच्छापुरचे सुप्रसिद्ध नगेंद्रनाथ चौधुरी, हे माझे वडील होत."

नगेंद्रनाथाचें नांव ऐकतांच तो गृहस्थ आश्चर्यचकित झाला. दोन्ही हातांनीं डोळे गच्च झांकून घेऊन तो ह्मणाला "नगेंद्रनाथ !", आतां इंद्रनाथाच्या मुखाकडे टक लावून त्यानें अधिकच चकित होऊन विचारलें "काय, आपलें नांव इंद्रनाथ ?"

इंद्रनाथ ह्मणाला "नाहीं. इंद्रनाथ हें माझें खरें नांव नव्हे. माझें खरें नांव सुरेंद्रनाथ आहे. परंतु छद्मवेषानें देशांतर करण्याचा माझा मानस असल्यामुळें मीं हें नांव धारण केलें आहे."

"सुरेंद्रनाथ !" इतकेच शब्द उच्चारून तो गृहस्थ स्तब्ध राहिला. त्याच्यानें पुढें बोलवेनाच. डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा वाहूं लागल्या.

कांहीं वेळानें आपला हृदयावेग आवरून तो गृहस्थ ह्मणाला "सुरेंद्रनाथ, मी बाळपणीं तुमच्या घरीं कित्येक दिवस राहिलों होतों. त्यावेळीं तुह्मी अगदींच लहान होतां. नगेंद्रनाथ खुशाल आहेत ना ?"

इंद्रनाथ ह्मणाला "होय, खुशाल आहेत."

"तुमचा वडील बंधू सध्या कुठें आहे ?"

"माझ्या वडील बंधूस निवर्तल्याला बरेच दिवस झाले."

"त्याचें नांव उपेंद्रनाथ होतें, नव्हे ?"

"होय."

"बरें, त्याचा अंत कसा झाला ?"

"इच्छापुरांत वाघाची फार भीति आहे. माझ्या वडील भावास वाघ घेऊन गेला ह्मणतात. मी त्यावेळीं लहान होतों. या गोष्टीला आज कितीतरी वर्षें झालीं !"

"बरें, तुमची आई सुखरूप आहे ना ?"

"वडील मुलाचा असा आकस्मिक अंत ऐकतांच आईच्या काळजास मोठा धक्का बसला व त्या दुःखानें आजारी पडून त्या आजारांतच शेवटीं बिचारीचा अंत झाला !"

बराच वेळपर्यंत दोघेहि स्तब्ध बसले होते. एवढा वेळ नौका नदींत संथपणें वहात चालली होती. एका घटकेनें इंद्रनाथानें पाहिलें तों त्या अपरिचित गृहस्थाचें मुखमंडल, वक्षस्थल व अंगावरील वस्त्र हीं अश्रूंनीं अगदीं भिजून गेलीं आहेत. हें पाहून इंद्रनाथ विस्मितच झाला.

नौका सुमारें कोसभर गेली होती. गंगानदीचें उदक चंद्रकिरणांमुळें चकचक करित होतें. आकाशांत एकदोन लहानसे शुभ्र मेघ दिसत होते. कधींकधीं ते मेघ चंद्रावर किंचित् आवरण घालित होते; परंतु वायूनें त्यांनां लोटून देतांच पुनः चंद्राची पुण्यज्योति नदीच्या प्रशांत वक्षावर नृत्य करित होती. आकाश नीलवर्ण आणि गंभीर दिसत होतें. एकदोन तारका लज्जावती नववधूप्रमाणें मधूनमधून हळूच आपलें मुख दाखवून पुनः आकाशपटाआड लपत होत्या. समस्त जगतानें पूर्ण निस्तब्धता धारण केली होती. मात्र केव्हां केव्हां एखादें गाणें दुरून वायुमार्गानें येऊन नदीच्या जलपृष्ठावर आणि जवळच्या शुभ्र वाळवंटावर प्रतिध्वनित होत होतें. यावेळीं नदीच्या पात्रांत एकहि नौका चालतांना दिसत नव्हती. इंद्रनाथाची लहान नौका तरंगमालांनां एकीकडे सारित सरसर शब्द करित चालली होती.

हळुहळू तीरावरील एका दिव्याचा प्रकाश दिसूं लागला. नौकेचा मालक दिव्याकडे बोट दाखवून आपल्या नूतन मित्रास ह्मणाला "तो दिवा दिसतो, तें माझें घर. घराच्या जवळच एक कुंज आहे. तें कुंज नव्हे तर माझें हृदय होय!"

नौकेच्या मालकाचें हें भाषण ऐकून इंद्रनाथ चकित झाला. त्यानें पाहिलें, त्या गृहस्थाच्या नेत्रांतून घळघळ अश्रू वहात आहेत. इंद्रनाथाचेंहि हृदय भरून आलें. स्नेहभरानें आपल्या नवबंधूचें अश्रुमोचन करून तो ह्मणाला "भाई, तुझें नांव काय, तुझा धंदा काय, मला कांहींएक ठाऊक नाहीं. परंतु तुला भाऊ ह्मणूनच हांक मारावी,

असें माझें मन मला सांगतें. तुझ्या या धाकट्या बंधूस तूं आपलें दुःख मन मोकळें करून सांग. शक्य असल्यास मी तुझें दुःख निवारण करीन."

तो अनोळखी गृहस्थ ह्मणाला "माझ्या ठिकाणीं तुझा इतका स्नेह आहे, तर कृपा करून माझे घरीं चल. तेथें मी तुला आपली सर्व हकीगत सांगेन."

इंद्रनाथ कबूल झाला. नौका किनाऱ्यास लागली. नंतर दोघेहि किनाऱ्यावरील झोंपडीकडे स्तब्धपणें चालते झाले.

## प्रकरण १३ वें.

## नौकापतीचा पूर्ववृत्तांत.

How sweet the days that I have spent,
In yon sequestered bower;
Those citron trees, still sweet of scent;
Had then some magic power.
Or some fair spirit did reside,
In that sweet purling brook,
Which runs by yon green mountain side.
Now haunted by the rook.
No charam was in the spicy grove,
No spirit in the stream,
O'twas the smile of her I love,
Now vanished like a dream!

*I. C. Dutt.*

इंद्रनाथ आपल्या नूतन बंधूच्या घरीं आला. घर लहानसेंच खरें, तथापि अत्यंत स्वच्छ आणि सुंदर होतें. बाहेर एक लहानसें उद्यान असून त्यांत कित्येक फळझाडें होतीं. घरापासून थोड्याच अंतरावर एक खेडेगांव होतें. घराच्या समोरचे बाजूस विशाल गंगानदी कलकल शब्द करित वहात होती, व मागचे बाजूस एक सुंदर कुंजवन असून त्याचेपुढें धान्यांचीं शेतें लागून राहिलीं होतीं. या घराचा धनी मुंगेरींत कांहीं सामान्य रोजगारधंदा करित असे; परंतु त्याचें मन स्वभावतः चिंता व खेद यांनीं सदैव व्याप्त असल्यामुळें त्यानें आपलें रहाण्याचें ठिकाण नगरापासून फार दूर—एका लहानशा खेडेगांवासन्निध एकांत स्थलीं केलें होतें. या घरांत तो एकटाच रहात असे, एकटाच गाणें गाई व सायंकाळीं नौकेंत एकटाच बसून नदीमध्यें फिरे. उभयतां खालीं बसल्यावर तो गृहस्थ इंद्रनाथास ह्मणाला "भाई सुरेन्द्र! तुझ्या हृदयामध्यें क्रोध अथवा अभिमान या दुष्ट मनोविकारांचा वास असेल तर त्यांचा एकदम त्याग कर! या अभिमानानेंच माझा सर्वस्वी नाश केला आहे. अगदीं लहानपणापासून मी अतिशय गर्विष्ठ होतों. मीं असें ऐकिलें आहे कीं, लहानपणीं जर मीं एखाद्या गोष्टीचा हट्ट

घेतला, आणि जर का माझा तो हट्ट लागलाच पुरविण्यांत आला नाहीं, तर मी रागानें एकएक दोनदोन दिवस उपाशीं रहात असें. या विलक्षण क्रोधामुळेंच माझा सर्वनाश झाला आहे.

"साधारण मोठा झालों, तरी माझी हीच स्थिति होती. माझें मन स्वभावतः विद्याभ्यासामध्यें रत होई; परंतु एखादे वेळीं जर पंतोजी मला रागें भरले तर मी क्रोधांध होऊन हातांतील पुस्तक दूर फेंकून देई; शंभर वेतें जरी पाठीवर फुटलीं तरी मी तोंडावाटे एक शब्दहि उच्चारित नसें, कीं माझ्या डोळ्यांत एक अश्रुबिंदुहि उभा रहात नसे! गुरुजींचें मजवर अतिशयच प्रेम असे. परंतु माझा हा विलक्षण संतापीपणा पाहून ते माझ्यावर वारंवार संतापत. एकदा असेंच संतापाच्या भरांत त्यांनीं मला इतकें बेदम मारलें कीं, बेशुद्ध होऊन मी जमिनीवर अगदीं निश्चेष्ट पडलों. परंतु माझ्या डोळ्यांत अश्रु नाहीं कीं, मुखांतून शब्द नाहीं! मला मूर्च्छित पडलेला पहातांच गुरुजी शुद्धीवर आले व मला शुद्धीवर आणण्याच्या मार्गास लागले. त्यांनीं मला पुत्राप्रमाणें प्रेमानें उराशीं धरून माझ्या मुखावर कांहीं वेळ जलसिंचन केल्यावर मी सावध झालों. त्या दिवसापासूनच माझा विद्याभ्यास संपला. गुरुजींकडे मी पुनः शिकावयास गेलों नाहीं, व जन्माचा मूर्ख होऊन राहिलों!

"माझ्या आईनें मला कधींहि निष्ठुर वचनानें दुखविलें नाहीं. तिला माझा स्वभाव पुर्तेपणीं ठाऊक असे. माझ्यावर ती इतकें प्रेम करी कीं, तिनें माझें मन कधींहि दुखवल्याचें मला स्मरत नाहीं. मी वडिलांची अवज्ञा करीं, गुरुजींनां जुमानित नसें, परंतु आईची कधींहि अवज्ञा केली नाहीं. घरांतील मंडळीनें माझी कित्तीहि विनवणी केली, धाकदपटशा दाखविला, किंवा कठोर ताडन केलें असतांहि मीं जी गोष्ट मुळींच करित नसें—तीच गोष्ट, आईनें नुसती आपली इच्छा प्रदर्शित करतांच मी तत्काळ करून टाकीं. हाय! आतां ती प्रेममयी माता मला पुनरपि कुठून दृष्टीस पडायला!" बोलतांबोलतां त्याचा कंठ

दाटून आला. मुखावाटे स्पष्ट शब्द निघेना. अधोमुख करून तो अविरल अश्रुधारा विसर्जन करूं लागला.

हें पाहून इंद्रनाथ अतिशय दुःखित होऊन ह्मणाला "आपल्या मातेचा अंत झाला काय?"

तो गृहस्थ करुणवाणीनें ह्मणाला "होय, असें मीं नुक्तेंच ऐकिलें आहे."

मनसोक्त अश्रु वाहूं दिल्यावर त्या गृहस्थाचें हृदय किंचित् शांत होऊन तो पुढें ह्मणाला "माझे वडील प्रसिद्ध कायस्थ जमीदारांपैकीं एक होत. त्यांचें सामर्थ्य विलक्षण असे. मजप्रमाणेंच माझे वडीलहि अभिमानी आणि संतापी होते. वास्तविक पाहिलें असतां त्यांचें माझ्यावर फार प्रेम असे. माझी प्रशंसा ऐकून त्यांचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून येत. माझी निंदा ऐकतांच त्यांचें मुखकमल निस्तेज होई. तथापि ते आपला क्रोध आवरूं शकत नसत. एके दिवशीं विनापराध मला पुष्कळ ताडन करून ते म्हणाले 'कारट्या! याउपर मी तुझें तोंड पाहूं इच्छित नाहीं. याक्षणीं माझ्या घरांतून चालता हो.' 'हा पहा चाललों' असें रागारागानें ह्मणत मीहि तत्क्षणीं तडक चालता झालों.

"मारानें, धाकदपटशानें पुष्कळ मुलें शांत होतात. परंतु मी क्रोधानें अंध बनलों. माझ्या हृदयांत भयंकर क्रोधाग्नीनें भडका घेतला. त्या अग्नींत पितृस्नेह, मातृप्रेम हीं जळून भस्म झालीं. त्याच अग्नीनें माझ्या भावी संसारसुखाची, मातापित्यांच्या एकंदर आशांची राखरांगोळी केली. वडिलांनीं मला घरांतून निघून जावयास सांगितलें, मीहि मागचा पुढचा विचार न करतां तत्काळ चालता झालों. त्या दिवसापासूनच मी पितृगृहास अंतरलों. त्यावेळीं मी फारतर बारा वर्षांचा असेन.

"त्यानंतर मीं आपल्या आयुष्याचीं कित्येक वर्षें कशा प्रकारें घालविलीं, तें सांगवत नाहीं! मरु भूमीवरील प्रचंड वायूप्रमाणें माझ्या आयुष्यांतील दहा वर्षें केवळ व्यर्थ गेलीं. अंगांत प्रचंड सामर्थ्य असलें परंतु त्या सामर्थ्यापासून कांहीं फल नाहीं, अर्थ नाहीं, कोणासहि

फायदा नाहीं, तर त्याचा काय उपयोग? निर्जन, प्राणिशून्य पर्वताच्या पायथ्याशीं होणाऱ्या प्रचंड समुद्रगर्जनांप्रमाणें माझ्या हृदयांतील दुर्दमनीय मनोवृत्ति भयंकर गर्जना करित असत. परंतु त्या ऐकावयास कोणी श्रोता नव्हता! माझ्या त्या प्रचंड गर्जना ऐकून कोणीं आनंदित झालें नाहीं; किंवा त्या गर्जनांनीं विस्मित होऊन त्यांचें कौतुक करणारेंहि कोणी भेटलें नाहीं! पाताळांत वहाणाऱ्या भोगवती नदीच्या तरंगमालांप्रमाणें माझ्या प्रबल मनोवृत्तींच्या उच्चउच्च लाटाहि घोर अंधाकरांतच दडून राहिल्या!

"हीं दहा वर्षें निघून गेलीं. त्या घोर अंधकारराशीचा एकदम नाश झाला व त्या जागीं एका दिव्य, सुंदर प्रकाशाची छटा नयनगोचर होऊं लागली!'

इतकें बोलून तो गृहस्थ एकदम थांबला व गंभीरपणें कांहीं विचार करूं लागला. इंद्रनाथ त्या उन्मत्तप्राय गृहस्थाकडे एकसारखी टक लावून पहात त्याची गोष्ट ऐकत होता. कांहीं वेळानंतर तो गृहस्थ पुढें ह्मणाला "या दहा वर्षांमध्यें ज्या मनोवृत्ति माझ्या हृदयास सारख्या व्यथित करित होत्या, त्यांमध्यें प्रेम अग्रगण्य होतें."

आतां इंद्रनाथ विशेषच लक्ष्य देऊन ऐकूं लागला. तो गृहस्थ बोलतच होता. तो ह्मणाला "मी सामान्य स्त्रीच्या प्रेमाची आकांक्षा करित नव्हतों. जें प्रेम मानवहृदयाला एकदम परिपूर्ण करतें, जें प्रेम जीविताचा मुख्य आधार बनून रहातें, जें प्रेम देहाचा प्रति आत्माच बनतें, ज्या प्रेमाचा अंत होतांच जीवनाचाहि अंत होतो, त्याच प्रेमाची मी आकांक्षा करित होतों. कितीतरी वेळ मी त्या प्रेमाची कल्पना करित अंधकारांत बसत असें. कल्पनासृष्टीमध्यें एक अलौकिक स्नेहसंपन्न प्रेमप्रतिमा निर्माण करून तिच्या समागमांत मी कितीतरी काळ लोटित असें. एकाएकीं ती प्रेममूर्ति पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें नष्ट होई; कल्पनाशक्ति श्रांत होई; आणि मी अकस्मात् मूर्च्छित होऊन जमिनीवर निश्चेष्ट पडें.

"दिवसेंदिवस माझी ती कल्पना वृद्धिंगत होऊं लागली. दिवसाच्या निम्याहूनहि अधिक काल मी ह्या दृश्य जगतामध्यें वास करित नसें, तर त्या काल्पनिक सृष्टींत भ्रमण करूं लागें. माझें तें कल्पनानिर्मित जग अत्यंत सुंदर होतें. अहाहा ! त्यांतील आकाश किती उज्ज्वल ! दिव्य फलपुष्पवृक्षांनीं गजबजलेल्या अशा त्या रमणीय नंदनवनाचे मध्यभागीं स्थित असलेल्या उज्ज्वलतर गृहमंदिराच्या गवाक्षांत उभी राहिलेली माझी प्रेमप्रतिमा मी पहात असें. तिच्या त्या ज्योतिर्मय सुवर्णकांतियुक्त मुखमंडलाभोंवती निबिड कृष्णकेश मंदवाऱ्याच्या झुळकेनें उडत आहेत; रक्तवर्ण अधरोष्ठावर अर्धस्फुट प्रेमहास्य विराजमान झालेलें आहे; कृष्णवर्ण भ्रमरांसारख्या नेत्रयुगुलांत प्रेमाश्रु चकाकत आहेत; समस्त मुखमंडलावर प्रेमरस उचंबळत आहे! अशी ती सुंदर हृदयंगम प्रेममूर्ति माझ्या नेत्रांसमोर उभी रहाते आहे, तोंच माझी कल्पनाशक्ति एकदम तारभग्न विणेप्रमाणें बंद पडे, व मीहि मूर्च्छित होई.

"एके दिवशीं रात्रीं मी असाच मूर्च्छित होऊन गंगातीरावरील या कुंजवनांत पडलों होतों. त्या बेशुद्ध स्थितींत मी किती वेळ होतों, हें कांहीं मला ठाऊक नाहीं. परंतु मला भास झाला कीं, कोणींतरी माझें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें आहे व मुखावर जलसिंचन करून मला वारा घालित आहे. हळुहळू मीं आपले डोळे उघडले, तों मीं काय पाहिलें ? सुरेंद्रनाथ! तुला खोटें वाटेल, कल्पनासृष्टींतील माझी तीच प्रेमप्रतिमा दृश्यसृष्टींत मूर्तिमंत उपस्थित होऊन मला वारा घालित आहे!"

उभयतां अनेक क्षणपर्यंत स्तब्ध बसले. ही असंभाव्य गोष्ट ऐकून इंद्रनाथतर विस्मितच झाला. कांहीं वेळानें तो गृहस्थ पुनः बोलूं लागला "सुरेंद्रनाथ! मला आतां कांहीं जास्त सांगवत नाहीं. चौकशीअंतीं मला कळून आलें कीं, ती कायस्थकन्या अविवाहित असून अनाथ आहे.

मीं तिचें पाणिग्रहण केलें. तिच्या सहवासांत माझीं कित्येक वर्षे एवढ्या सुखांत गेलीं कीं, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे.

"ह्या समोर दिसत असलेल्या कुंजवनांत आम्ही उभयतांहि रहात असूं. शरत्कालांतील प्रभातसमयीं आकाश जो पवित्रवर्ण धारण करतें त्यापेक्षांहि पवित्रवर्णानें प्रेम आमच्या हृदयाकाशाला उज्ज्वल करित असे. सायंकालचा अंधुक प्रकाश ज्याप्रमाणें शांत आणि निस्तब्ध असतो, त्याच्याहिपेक्षां आमच्या हृदयांतील प्रेम अधिक शांत आणि निस्तब्ध असे. माझ्या प्रियतमेला मी कुंजवासिनी ह्मणत असें. समोर हें कुंजवन दिसतें आहेना–इथेंच–इथेंच—"

तो गृहस्थ एकदम स्तब्ध होऊन त्या कुंजवनाकडे अगदीं वेड्या-प्रमाणें डोळे फाडून पाहूं लागला. त्याच्या तोंडावर कोणत्याहि विकाराची छाया दिसत नव्हती. यावेळीं तो शुद्धीवरच नव्हता. इंद्रनाथानें मोठ्या शिकस्तीनें त्याला शुद्धीवर आणलें. नंतर इकडच्या तिकडच्या गोष्टी होतांहोतां रात्र बरीच झाली. दोघेहि सख्या भावांप्रमाणें एकाच शय्येवर जाऊन निजले, व लवकरच गाढ निद्रिस्त झाले.

## प्रकरण १४ वें.

## राजा तोडरमल्ल.

A combination and a form indeed
Where every god did seem to set his seal
To give the world assurance of a man.

*Shakespeare.*

मुंगेरच्या प्रचंड किल्ह्यामधील एका भव्य हवेलींतील सुशोभित दिवाणखान्यांत एक वीरपुरुष उच्च आसनावर बसला होता. राजा तोडरमल्ल ते हेच.

यावेळीं त्यांच्याभोंवतीं फारशी मंडळी नव्हती. दोघांचौघां अति विश्वासांतील सरदारांस घेऊन राजे हळुहळू युद्धविषयक चर्चा करित बसले होते. इतक्यांत एक लष्करी शिपाई येऊन नम्रतापूर्वक प्रणाम करून म्हणाला "महाराज! एक स्वार आपल्या भेटीची इच्छा करित असून परवानगीची वाट पहात खालीं दाराजवळ उभा आहे."

"तो कशाकरितां आला आहे, विचारून ये."

"विचारलें सरकार. 'आपल्याला जें कांहीं सांगायचें आहे तें महाराजांची भेट झाल्याशिवाय सांगतां येत नाहीं.' एवढेंच तो बोलला. कांहीं विशेष कामाकरितां तो आला असावा."

तोडरमल्ल यांनीं विचारिलें "तो हिंदु आहे कीं मुसलमान?"

"एका कायस्थ जमीदाराचा मुलगा आहे."

राजा तोडरमल्ल किंचित् स्तब्ध राहून विचार करूं लागले. ते स्वताशींच ह्मणाले "बंगदेशांत अनेक शूर व पराक्रमी कायस्थ जमीदार असून त्या सर्वांजवळ मिळून एकंदर आठ लक्ष सैन्य असल्याचें ऐकिलें आहे."या जमीदारांच्या साह्याची आपल्यास फार आवश्यकता आहे. नंतर त्या शिपायाकडे वळून राजे म्हणाले "बरें जा, त्याला यावयास सांग."

आज्ञेप्रमाणें सैनिक त्या आगंतुकास आणावयास गेला.

या अवकाशांत आमच्या प्रिय वाचकांनां राजा तोडरमल्ल यांचा थोडासा परिचय करून देण्याची संधी आह्मी साधतों.

क्षत्रियकुलावतंस राजा तोडरमल्ल यांच्यासारखा सर्वगुणमंडित असा वीरपुरुष या भारतवर्षांत अवतरला आहे कीं काय याबद्दल संशयच आहे. रत्नप्रसविनी अशा या भरतभूमीमध्यें अनेक पुण्यात्म्या, धर्मपरायण महापुरुषांनीं जन्म ग्रहण केला आहे. वीरप्रसू क्षत्रियकुलांत अनेक वीरपुरुष अवतीर्ण झाले आहेत. प्राचीनकालीं या आर्यावर्तांत अनेक तीक्ष्ण बुद्धीचे, राजनीतिविशारद महात्मे होऊन गेले आहेत. परंतु राजा तोडरमल्ल या तीन्ही गुणांनीं विभूषित होते.

हिंदुधर्मावर त्यांची अचल भक्ति होती, याबद्दल इतिहास जागजागीं साक्ष देत आहे. एकदा दिल्लीपति अकबरशाह यांच्याबरोबर पंजाबामध्यें भ्रमण करित असतां एकाएकीं स्वारीचा मुक्काम हलवावा लागल्यामुळें राजा तोडरमल्ल यांच्या देवपूजेंत विघ्न आलें. प्रातःकाळीं देवपूजा केल्याशिवाय कोणतेंहि काम करावयाचें नाहीं, इतकेंच नव्हे, तर पाण्यालासुद्धां स्पर्श करावयाचा नाहीं, असा राजेसाहेबांचा नियम होता. अर्थात्, त्या दिवशीं देवपूजा न झाल्यामुळें राजा तोडरमल्ल यांनां कडकडीत उपोषण पडलें. अकबरशाहांनीं त्यांनां पुष्कळ समजूनसवरून सांगितलें, परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. आबुलफजलप्रभृति अकबराचे मुसलमान अमात्यगण तोडरमल्ल यांनां 'धर्मवेडा' ह्मणून त्यांची पुष्कळ टवाळी करित असत. परंतु स्वधर्मावर इतकी विलक्षण प्रीति ठेवणाऱ्या या वीर पुरुषाचा उदार अकबरशाह सर्वदा आदरच करीत. राजा तोडरमल्ल यांच्या कीर्तिरवानें अखिल भरतखंड व्यापून राहिलें होतें, त्यांच्या पदाचा व गौरवाचा अगदीं कळस झाला होता, अशा समयींदेखील फक्त वार्धक्य आल्यामुळें त्यांनीं आपलें ऐश्वर्य, उच्चपद, संपत्ति वगैरे सर्वांवर लाथ मारून आपलें शेष आयुष्य ईश्वरचिंतनांत घालविण्याच्या हेतूनें अकबरशाहाची अनुमति घेऊन ते हरिद्वारास निघून गेले.

राजा तोडरमल्ल यांनीं बंगालदेशावर एकंदर तीन वेळां स्वाऱ्या केल्या. तीन्ही स्वाऱ्यांमध्यें त्यांनीं आपल्या अंगचें विलक्षण साहस आणि अप्रतिम युद्धकौशल्य प्रगट केलें होतें. पहिल्या वेळीं मनाइमखानाच्या आणि दुसऱ्या वेळीं हुसेनकुलीखानाच्या हुकमतीखालीं ते आले होते; परंतु तोडरमल्लांच्याच पराक्रमामुळें दोन्ही वेळां जय मिळाला. तिसऱ्यानें तर ते स्वताच सेनापति होऊन आले होते. केवळ बंगदेशांतच नव्हे, तर ज्या ज्या ठिकाणीं तोडरमल्ल युद्ध करावयास गेले, त्या त्या ठिकाणीं त्यांनीं आपल्या अंगचें अपूर्व वीरत्व प्रगट केलें होतें. गुर्जरदेशांत बंडखोरांबरोबर जें घनघोर युद्ध झालें, त्यांत त्यांनीं सिंहासारखें बळ आणि शौर्य दाखविलें. धोलका येथील भयंकर रणसंग्रामांत सेनापति भिजारखान युद्धक्षेत्रांतून पलायन करण्याच्या विचारांत होता; परंतु राजे तोडरमल्ल यांनीं त्याचा निषेध करून आपला स्वताचा घोडा पुढें टाकला आणि शत्रूशीं निकरानें झुंजून त्यांनीं असें अलौकिक वीरत्व प्रगट केलें कीं, शेवटीं विजयलक्ष्मी त्यांच्याच मांडीवर येऊन बसली. अकबरशाहाचे असंख्य सेनापति होते, परंतु राजा तोडरमल्लांपेक्षां अधिक वीरत्व आणि साहस दाखविण्यास एकहि समर्थ झाला नाहीं.

समग्र भारतवर्षांतील बंडाळी, राजद्रोह नाहींसा करून जिकडे-तिकडे स्थिरस्थावर करण्याचें काम अकबरशाहानें राजा तोडरमल्ल यांच्यावरच सोंपविलें होतें. तें दुर्घट काम तडीस नेण्यांत त्यांच्या अंगच्या तीक्ष्ण बुद्धीची आणि राजनीतिज्ञानाची चांगलीच साक्ष पटते.

राजा तोडरमल्ल यांचा जन्म लाहोर येथें झाला होता. त्यांच्या बाळपणींच त्यांच्या पित्याचा अंत झाला. दारिद्र्यावस्थेंत नानाप्रकारच्या हालअपेष्टा भोगून त्यांच्या मातुश्रीनें मोठ्या काळजीनें त्यांचें लालनपालन केलें. मुलानेंहि अल्पवयांतच आपल्या तीक्ष्णबुद्धीनें सर्व लोकांस चकित करून टाकिलें. पहिल्यानें राजा तोडरमल्ल एका साधारण कारकुनीच्या जागेवर नियुक्त झाले. परंतु पुढें त्यांनीं आपल्या

केवळ असाधारण बुद्धीच्या बळावर अकबरबादशाहाच्या रत्नपरिपूर्ण राजसभेमध्यें प्रवेश करून तेथें अग्रस्थान पटकाविलें. असो.

सैनिकानें आगंतुकाला राजासमोर आणून उभें करतांच राजांनीं विचारलें "तुझें नांव काय?"

आगंतुकानें उत्तर केलें "माझें नांव इंद्रनाथ चौधुरी."

"तूं कुठें रहातोस?"

"नदिया जिल्ह्यांत इच्छापुर गांवीं रहात असतों."

"तुझें किती सैन्य आहे?"

"बादशहाच्या मदतीकरितां आणि आपल्या प्रांताच्या बंदोबस्ताकरितां माझ्या वडिलांनीं आपल्यापाशीं बंगदेशांत दोनतीन हजार पायदळ बाळगिलें आहे. परंतु बादशहाच्या सेवेसाठीं इकडे बिहार देशांत मी एकटाच निघून आलों आहें."

राजा तोडरमल्ल किंचित् रुष्ट होऊन त्या तरुण पुरुषाकडे क्षणभर कठोर दृष्टीनें पाहूं लागले. परंतु युवकाच्या आकृतींत उदारतेखेरीज त्यांस कांहींहि दिसलें नाहीं. किंचित्काळानें राजे पुनः ह्मणाले "तुझा पिता बादशहाच्या साह्याकरितां इकडे कांहीं सैन्य पाठवूं शकत नाहीं?"

"महाराजांची आज्ञा होतांच ते ताबडतोब आपलें सर्व सैन्य पाठवितील. परंतु सध्या या बंद्याला हुजूरचे सेवेंत रहाण्याची परवानगी मिळावी." इतकें म्हणून इंद्रनाथानें झर्कन् म्यानांतून आपली तरवार उपसली व राजा तोडरमल्लांनां लष्करी बाण्याचा सलाम करून पुनः म्यानांत घातली.

सादीकखान नांवाचा सरदार ह्मणाला "तरुणा! तुझ्या तरवार धरण्याच्या पद्धतीवरून तर मला असें वाटतें कीं, युद्धांत तुझ्या तरवारीचा कधींहि अपमान होणार नाहीं!"

तारसनखान नांवाचा दुसरा सरदार हलकेच राजा तोडरमल्लांच्या कानांशीं पुटपुटला "महाराज! हा शत्रुकडचा कोणीतरी गुप्त हेर दिसतो. याची एकदम गर्दन उडवा."

राजा तोडरमल्ल कांहींएक बोलले नाहींत. त्या युवकाकडे एकसारखे तीव्र दृष्टीनें पहात होते. युवकाच्या आकृतीवरून व एकंदर चालचर्येवरून त्यांनां कांहीं विपरीत लक्षण दिसून आलें नाहीं. आपल्या मनाची पूर्ण खात्री करून घेण्यासाठीं ते पुनः ह्मणाले "तूं एकटा आह्मांला मदत करायला आलास, याचा अर्थ मला कळत नाहीं."

इंद्रनाथ ह्मणाला "महाराज ! आपलेजवळ मला एका गोष्टीची भिक्षा मागायची आहे. परंतु माझी स्वामिभक्ति पाहून आपण संतुष्ट व्हाल, तेव्हांच ती भिक्षा मी आपणाकडे मागेन."

"आमच्या सैन्यांत फितुरी माजविण्याकरितां शत्रूकडून वारंवार गुप्त हेर पाठविले जातात; त्यांपैकीं तूं नाहींस, हें कसें समजावें ?"

इंद्रनाथ आवेशानें ह्मणाला "कायस्थ जमीदारपुत्राच्या सांगण्यावर विश्वास ठेवण्यास कसलीच हरकत नाहीं !"

"अनेकवार दुष्ट लोकहि संभावितपणाचें सोंग घेऊन फसवायास येतात; कुलीन लोकहि केव्हांकेव्हां विश्वासघात करतात."

"महाराज, मीं कधींहि कपटाचरण केलें नाहीं." क्रोधानें इंद्रनाथाचा कंठ रुद्ध झाला.

तोडरमल्ल यावर शांतपणें ह्मणाले "खचीत, तुझें भाषण उदारमनाच्या वीर पुरुषास शोभण्यासारखें आहे. परंतु, पुष्कळ वेळां अधम मनुष्यहि वरून औदार्याचा डौल मिरवितांना दृष्टोत्पत्तीस आलें आहे."

क्रोधातिरेकानें इंद्रनाथाचें मुख लाल झालें. ओंठ थरथरूं लागले. तो कांपतकांपत म्हणाला "मी आपणाजवळ कपटाचरण करावयास आलों अशी आपल्या मनाची खात्री होत असेल तर मला निरोप द्या. मी जातों."

इंद्रनाथाचें हें वीरोचित निस्पृह भाषण श्रवण करून तोडरमल्ल प्रसन्न झाले व त्याचा मोठा गौरव करून त्यांनीं त्याला सहस्र स्वारांचा सेनानायक केलें.

## प्रकरण १५ वें.

## कमला.

As in the bosom o' the stream
The moon-beam dwells at dewy e'en
So trembling, pure was tender love,
Within the breast o' bonnie Jean.
And now she works her mammie's work,
And aye she sighs with care and pain,
Ye wist na what her ail might be,
or what wad make her weel again.

*Burns.*

सध्या आपण इंद्रनाथास येथेंच सोडून थोडा वेळ पुनः महेश्वराच्या मंदिरांत जाऊं.

आह्मीं मागें सांगितलेंच आहे कीं, महेश्वराच्या मंदिराजवळच वनग्राम नांवाचें एक लहानसें गांव होतें. महंत चंद्रशेखर बहुधा महेश्वरमंदिरांतच रहात असे; परंतु केव्हांकेव्हां या रमणीय खेडेगांवांतहि तो वस्ती करी.

बहुतेक मंदिरांचे मुख्य पुजारी लोभी, अप्पलपोटे आणि विषयलंपट असेच पहाण्यांत येतात. परंतु महंत चंद्रशेखर याची गोष्ट अगदीं निराळी होती. त्याचें वर्तन अतिशय निर्मल होतें. अनेक अनाथ ब्राह्मणस्त्रीपुरुषांनां या गांवांत आश्रय देऊन सख्या भावंडांप्रमाणें तो त्यांच्याशीं प्रेमानें वर्तत असे. मंदिरांतील सर्व काम आपल्या विश्वासांतील मनुष्यांच्या अंगावर टाकून चंद्रशेखर वनग्रामांतील आपल्या आश्रित मंडळीस जमवून तेथेंच देवाची उपासना करित असे. कारणपरत्वें तो स्वतांहि महेश्वराच्या सेवेस हजर राही. कमला नांवाची एक अनाथ कायस्थकन्या त्याच्या आश्रयास राहिली होती. तिच्यावर चंद्रशेखर पित्याप्रमाणें लोभ करी. तो ज्याप्रमाणें निर्मलचरित्र होता त्याचप्रमाणें धर्मपरायणहि होता. त्याला पहातांच प्राचीन

काळच्या ऋषिमुनींची आठवण होई. चंद्रशेखरानें वनग्रामासहि प्राचीन काळच्या आश्रमाची शोभा आणिली होती. यामुळें त्याचे शिष्य त्याला कण्वमुनि आणि कमलेस शकुंतला, असें विनोदानें ह्मणत असत.

संध्याकाळ झाली होती. दोघी तरुणी आश्रमाजवळच नदीतीरावर येऊन बसल्या होत्या. पैकीं सरलेला आमचे वाचक ओळखितच आहेत. दुसरी कमला.

कित्येक दिवसांपासून कमला या आश्रमांत रहात होती. तिचें वय एकुणिसांच्या सुमारें होतें. ती कोणाची मुलगी, कोणाची बायको, तिला विधवा होऊन किती दिवस झाले, याविषयीं कोणासच कांहींहि ठाऊक नव्हतें. कमलेस विचारल्यास ती आपली एकसारखी रडूं लागे; अर्थात् तिला यासंबंधीं कोणीहि विचारितच नसे.

कमलेचा स्वभाव आणि आचरण पाहून आश्रमांतील सर्व मंडळीस मोठें आश्चर्य वाटे. ती नेहमीं शांत, उदास आणि चिंताक्रांत दिसे. घरांतील सर्व कामकाज आटोपल्यावर दुपारचे वेळीं आश्रमाजवळील दाट झाडांच्या गर्द छायेंत कमला एकटीच विचारांत मग्न बसलेली असे. जेथें पक्षिगणाच्या मधुर कूजनाशिवाय मनुष्यमात्राचा शब्द ऐकूं येणार नाहीं अशा एकांतस्थानीं ती नेहमीं तासचेतास स्वताशींच तल्लीन होऊन बसलेली आढळत असे. आम्रवृक्षांचें पदप्रक्षालन करित वहाणाऱ्या इच्छामतीच्या तीरावर सायंकाळचे वेळीं आपल्या मनाशींच विचार करित ती बसलेली असे. नदीचा अनंत कलकल शब्द ऐकण्यांत तिला अत्यंत समाधान होई. तो अनंत कलकल शब्द ऐकतांऐकतां कमला अनंत चिंतासागरांत मग्न होऊन जाई. अशी ती कोणत्या बरें चिंतेंत गढली होती? चंद्रशेखरानें कमलेस आपल्या घरीं आश्रय दिला होता. कन्येप्रमाणें तो तिचें लालनपालन करी. पित्याप्रमाणें तिच्यावर लोभ करी. गांवांतील सर्व मनुष्यें कमलेवर प्रीति करीत. तिचें भाषण ऐकून तुष्ट होत. कमलेचें भाषण इतकें मिष्ट,

इतकें मधुर असे कीं, जणूं काय आपल्या कानांत अमृताची वृष्टीच होत आहे असेंच ऐकणारास वाटत असे.

कमला अप्रतिम सुंदर होती. तिच्या डोळ्यांची ज्योत्ति अत्यंत शांत आणि हृदयांतील गाढ चिंता प्रगट करणारी असून मुखहि शांत आणि गाढचिंतेनें म्लान झालेलें दिसे. त्याप्रमाणेंच तिचा देह अति सुकुमार, बांधा सडपातळ असून वैधव्यसूचक मलिन वस्त्र परिधान केल्यामुळें तिचा तो सुकुमार देह शैवालवेष्टित पद्मप्रमाणें शोभत असे. परंतु तें प्रातःकाळचें प्रफुल्ल कमल नसून सायंकाळचें पाकळ्या मिटून घेतलेलें कमल ज़्याप्रमाणें जलतरंगांनीं किंचित् कंपित होत असतें, त्याप्रमाणें ती कोमलांगी तपस्विनी सतत चिंतेंत मग्न झालेली दिसे. परक्याच्या घरीं त्या म्लान कमलाच्या अवस्थेप्रमाणें होऊन ती रहात होती. कमला चंद्रशेखराला पित्याच्या जागीं मानित असे. चंद्रशेखराच्या घरांतील सर्व कामकाज ती करित असे. काम आटोपून अवकाश सांपडतांच ती वर सांगितलेल्या त्या एकांत स्थानांत वृक्षांच्या गर्द छायेंत स्वताशींच विचार करित तासचेतास बसे. केशवाचार्य तिला थट्टेनें वनदेवी ह्मणे. पुढेंपुढेंतर सर्वजणच कमलेला वनदेवी ह्मणून हांका मारूं लागलीं. जी सुंदरी तासच्यातास एकटीच वनांत विहार करित हिंडत असे, तिला त्या शांत, पवित्र व मोठमोठ्या वृक्षांनीं घेरलेल्या आश्रमाची अधिष्ठात्री देवी ह्मटलें तर त्यांत कांहीं विचित्र आहे, असें नाहीं.

आज संध्याकाळीं कमला सरलेस आपल्याबरोबर घेऊन आपल्या त्या नेहमींच्या जागीं हिंडत होती. यावेळीं त्या दोघी नदीच्या कांठावर बसल्या होत्या. कमलेचें सरलेवर अत्यंत प्रेम असे. सरलेसारख्या सरलचित्त बालिकेवर कोणाच्यानें प्रेम केल्यावांचून राहील? कमलेचें दुःख पाहून सरला कळवळून जाई; तिचें दुःख पाहून ती आपलेंहि दुःख विसरे. यामुळें त्या दोघींमध्यें आतां गाढ स्नेह उत्पन्न झाला होता.

सरलेला इतकें कसलें दुःख होत होतें ! बालिकेच्या हृदयांत चिंतेचा वास कोठून असणार ! असें कोणी ह्मणेल. परंतु सरला आतां बालिका नव्हती. तिच्या हृदयांत प्रणयकीटकानें प्रवेश केला होता.

इंद्रनाथानें सरलेचा निरोप घेतला त्या दिवसापासून तिला प्रेम कशास ह्मणतात हें पूर्णपणें कळून आलें. प्राणवल्लभाच्या चिंतेमुळें मन किती अस्थिर होतें, याचा तिला पुरता अनुभव आला. सरलेचें अजूनहि आपल्या मातेवर पराकाष्ठेचें प्रेम होतें. परंतु आतांशा आईची सेवाशुश्रूषा करतांना तिचें मन आणखी दुसरीकडेच लागून राही. इंद्रनाथाचें मुखकमल तिला अहर्निश डोळ्यांसमोर दिसूं लागे. पूर्वींप्रमाणेंच आतांहि सरला सर्व कामकाज करित असे. परंतु काम करतांकरतां मध्येंच ती एखादा दीर्घ निश्वास टाकी किंवा डोळ्यांतून अश्रु गाळी. लज्जेनें आपले अश्रु पुसून काढून ती फिरून कामास लागत असे; परंतु पुनः हळूहळू तिचे दोन्ही नेत्र अश्रूंनीं भरून येत व पुढें लवकरच सर्व मुख अश्रुजलांनीं सिक्त होई.

ती एवढी कसची काळजी करित होती ? सरलेला जर कोणीं असा प्रश्न केला, तर तिला कांहींहि उत्तर देतां आलें नसतें. परंतु वाचकहो, आपणांस सरलेच्या चिंतेच्या कारणाचा तर्क सहज करतां येईल. रुद्रपुरांत त्या दिवशीं पौर्णिमेच्या रात्रीं शुभ्र चांदण्यांत जी देवमूर्ति आपण पाहिली होती, ती पुनरपि दृष्टीस पडेल काय? ज्याच्या गळ्यांत आपण सहज खेळतांखेळतां त्या दिवशीं माळ घातली तो आपला प्राणसखा आपणास पुनः दिसेल काय? युद्ध संपल्यावर इंद्रनाथ आपल्या भेटीस येईल काय? अशा प्रकारच्या चिंतेंत मग्न होऊन ती आपलें कामकाज विसरून जाई. चाऱ्ही बाजूंस तिला शून्य दिसूं लागे. तिला आपल्या अंतःचक्षूंपुढें रुद्रपुरांतील ती झोंपडी, झोंपडीमागील तें लहानसें उद्यान, उद्यानांतील ते सुंदर पुष्पवृक्ष, तो पौर्णिमेचा चंद्र आणि त्या चंद्राच्या शुभ्र चांदण्यांत म्लान मुख करून

उभा असलेला तो इंद्रनाथ, हीं एकंदर क्षणोक्षणीं दिसूं लागत आणि तत्क्षणीं तिचें मुखकमल अश्रुजलांनीं सिक्त होई.

मंदिरांत रहाणाऱ्या लोकांपैकीं एकजणानें मात्र सरलेच्या या करुणास्पद स्थितीचें सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केलें होतें. कमला सरलेस आपल्याबरोबर केव्हांकेव्हां नदीतीरावर किंवा दाट वृक्षावलींच्या सुस्निग्ध छायेंत घेऊन जाई. तेथें बसून ती सरलेशीं मोठ्या प्रेमानें गोष्टी करी व तिला आपल्या चिंतेची वांटेकरीण करी; तिच्या डोळ्यांतील अश्रु प्रेमानें पुसून काढी व तिजवर बहिणीप्रमाणें प्रेम करी. कमलेचें भाषण ऐकतांऐकतां सरला आपलें दुःख विसरून जाई, कमलेचें तोंड पाहून ती आपलें दुःख एकीकडे सारी. ज्या जनशून्य स्थानांत जावयास एरवीं तिला भीति वाटत असे, तेथें कमलेबरोबर निःशंक–निर्भय चित्तानें ती जात असे. दोघीजणी एकत्र बसल्या ह्मणजे कमला आपलें मन अगदीं मोकळें करून सरलेशीं गोष्टी करी व मनांतील सर्व विचार ती सरलेपाशीं उघड करी. सरलाहि कमलेच्या गोष्टी अगदीं लक्ष्य देऊन ऐकत असे. तिचे विचार तिला फारच आवडत. कमलेच्या गोष्टी ऐकून तिला आपल्या दुःखाची विस्मृति होई.

## प्रकरण १६ वें.

## कोण सांग पाहूं ?

Manfred.–oblivion, self-oblivion.

*Byron.*

"सरले !" कमलेनें हांक मारिली.

सरला कांहींएक उत्तर न देतां कमलेच्या मुखाकडे टकमक पाहूं लागली. कमला पुनः ह्मणाली "सरले ! आज तूं इतकी खिन्न कां बरं दिसतेस गडे ?"

यावरहि सरला कांहींच बोलली नाहीं. उलट कमलेचा तो प्रश्न ऐकून तिनें आपलें मुख मात्र खालीं केलें.

सरलेचा दुःखावेग आज अतीच प्रबळ झाला आहे हें कमलेच्या तत्क्षणीं लक्ष्यांत येऊन चुकलें. सरलेच्या जवळ जाऊन तिच्याशीं लगटून बसून कमलेनें प्रेमानें तिचा हात आपल्या हातांत धरला आणि म्हटलें "गडे, पृथ्वीच्या पाठीवर तुजपेक्षांहि दुर्दैवी–हतभागिनी अशी स्त्री आहे! तुलातर तुझ्यावर प्राणांपलीकडेहि प्रेम करणारी अशी माता आहे. या जगांत रहावयास तुला स्थान आहे. तुझा हृदयेश्वर जिवंत आहे. तुला भावी सुखाची आशा आहे, भरंवसा आहे. परंतु या पृथ्वीवर जिचें या जगांत कुणीच नाहीं, जिला भावी सुखाची लवमात्र आशा नाहीं, मागल्या काळाची कांहींच आठवण नाहीं, केवळ अगाध चिंतासागरांत जी गटंगळ्या खात आहे, अशी ही हतभागिनी आहे !"

सरला यावेळीं किंचित् ओशाळून ह्मणाली "ताई ! तुझी आठवण आली कनी ह्मणजे मी आपलं सारं दुःख विसरून जात्यें."

कमला ह्मणाली "नानाप्रकारचीं संकटं, दुःखं, यातना सहन करण्याकरितांच परमेश्वरानं स्त्रीजातीला निर्माण केलं आहे. पुरुषांपेक्षां आमच्यांत दसपट सहनशीलता आहे."

"पण एखादी स्त्री सहन करूं शकली नाहींच तर?"

"तर मग तिनं स्त्रीजन्म घेतलातरी कशाला? तूंच पहा, पुरुषांनां या जगांत रहावयास कितीतरी गोष्टी आहेत. मान, सन्मान, धन, संपत्ति, कुल, गौरव, यश, कीर्ति, एक कीं दोन? थोडक्यांत सांगायचं म्हणजे, पुरुषांनां आपलं जीवित कष्टकर न होण्याचीं अनेक कारणं आहेत. त्यांनां सहस्त्रावधि अशा सुखाच्या गोष्टी आहेत. एक प्राप्त नाहीं झालं तर दुसरं, दुसरं नाहीं तर तिसरं, सारांश, ते कशाच्याना कशाच्या मागं लागलेले असायचेच. यामुळं त्यांच्या आयुष्याचे दिवस कसे स्वप्नाप्रमाणं तेव्हांच निघून जातात. प्रयत्नांत यश मिळो अगर न मिळो, जोंपर्यंत प्रयत्न चालला आहे, जोंपर्यंत आशा मनाला धरून आहे, तोंपर्यंत जीवन कधींच कंटाळवाणं होत नाहीं. आणि आशा नसते कोणत्या पुरुषाला? सर्वांनांच असते. तरुणास महत्वाकांक्षा असते. मान, संभ्रम, सामर्थ्य, ख्याति हीं संपादन करण्याची त्यांनां प्रबळ इच्छा असते. वृद्ध पुरुषांचं राहिलेलं आयुष्य धनकामना, पुत्रकामना, वंशवृद्धिकामना इत्यादि सहस्त्र कामनांमुळं—आशांमुळं सहज निघून जातं. परंतु यांपैकीं हतभागी स्त्रीजातीला कांहींतरी आहे का?"

इतकें ह्मणून कमला किंचित् थांबली. सरला औत्सुक्यपूर्ण नेत्रांनीं कमलेच्या मुखाकडे पहात एकाग्रचित्तानें तिचें भाषण ऐकत होती. कमला पुढें ह्मणाली "हतभागी स्त्रीजातीला काय आहे? त्यांनां हा संसार एखाद्या विस्तीर्ण अफाट सागराप्रमाणं असून त्यांतून तरून जाण्याकरितां कायती एकमात्र नौका आहे. ती नौका ह्मणजे प्रेम होय. त्या एकमात्र प्रेमाची कास धरून त्या हा अपार भवसमुद्र पार करतात. परंतु जर का ही नौका मध्येंच कुठें खडकावर आपटून तिचे तुकडेतुकडे झाले, तरमग सर्वच खुंटलं. त्या बिचारीचा सर्वच आधार तुटला. सुख, आशा, भरंवसा सर्वच नष्ट झालीं. केवळ त्या अथांग समुद्रांत जलसमाधी घेण्याखेरीज तिला अन्य मार्गच उरला नाहीं, असंच ह्मटलं पाहिजे."

सरला ह्मणाली "ताई, खरोखरच तुझ्यासारखं कष्टी, दुःखी दुसरं कुणीहि नसेल! तुझी मागील हकीगत ऐकण्याची माझी फार इच्छा आहे."

"तरीपण सरले, मी कांहीं दुःखी नाहीं. मी अहोरात्र काळजी करित असत्यें यावरून तूं मला दुःखी समजूं नकोस. उलट, तशी काळजी करित असल्यामुळंच मी आजवर जीव धरून राहिल्यें आहें. माझी ही चिंता माझ्या जीवनाचा मुख्य आधार होऊन राहिली आहे. माध्यान्हकाळीं वृक्षांच्या शीतल छायेंत बसून गळून पडलेल्या पानांचा आणि शुष्क पाचोळ्याचा मर्मर शब्द ऐकून माझं हृदय शांतिरसानं भरून येतं. आकाशांतील शुभ्र मेघखंडांमधून धडपडत आपला मार्ग काढणाऱ्या चंद्राला पाहून माझ्या हृदयांत अवर्णनीय शांतीचा प्रादुर्भाव होतो. सृष्टीचं हें अनुपम सौंदर्य पाहून माझ्या डोक्यांत अनेकविध विचारांची गर्दी होते. त्यामुळं मला अतिशय सुख वाटतं. सरले, मी दुःखी नाहीं बरं!"

सरला कांहीं क्षण स्तब्ध राहून नंतर ह्मणाली "ताई, तुझा पूर्व वृत्तांत ऐकण्याची माझी फार इच्छा आहे."

कमलेनें ह्मटलें "सरले! तूंदिखील मला तोच प्रश्न विचारल्येस? आश्रमांतील किती जणांनींतरी मला आपली हकीगत सांगण्याविषयीं विनविलं—नव्हे माझ्यामागं त्यांनीं एकसारखं टुमणं लाविलं, पण मीं कुणासहि कांहींहि सांगितलं नाहीं. पण गडे, मी तुझ्यापासून कशाला लपवून ठेवूं? मी खरंच सांगत्यें कीं, मला आपली मागील हकीगत कांहींच आठवत नाहीं."

सरला चकित होऊन ह्मणाली "कांहींच आठवत नाहीं! बरं तुझं घर कुठं आहे?"

"पश्चिमदेशांत; परंतु गांवाचं नांव स्मरत नाहीं."

"तुझ्या पित्याचं नांव काय?"

"मी लहानपणापासूनच अनाथ झाल्यें आहें."

"बरं, तुझ्या पतीचं नांव काय?"

"नांव आठवत नाहीं. पण ती देवमूर्ति या हृदयांत सदोदित जागृत असते."

"ताई, तूं अकाळींच विधवा कशी झालीस?"

"एका घोर विपत्तींत सांपडून माझे पति प्राणास मुकले. ती दुष्टवार्ता ऐकून मला भयंकर दुखणं आलं व तेव्हांपासूनच मीं या पवित्र महेश्वरमंदिराचा आश्रय केला आहे."

कमला पुढें ह्मणाली "मला इतकंच मात्र आठवतं कीं, त्या भयंकर दुखण्यांत मी कांहीं दिवसपर्यंत अगदीं बेशुद्ध होत्यें. हृदयांत अतिशय वेदना होत होत्या आणि यातनांमुळं मी अगदीं अस्थिर झाल्यें होत्यें. त्या दुखण्यांत मला माझ्या पतीची ती देवमूर्ति स्वप्नांत सर्वदा दिसत असे. स्वच्छ, नील आणि विस्तीर्ण अशा आकाशांत उज्ज्वल चंद्रप्रभेंत एका लहानशा शुभ्र मेघखंडावर ती देवमूर्ति विराजमान झालेली मला दिसत असे, अजूनहि मीं आकाशाकडे पाहिलं ह्मणजे मला ती मूर्ति दिसते."

ती पुढें आणखी ह्मणाली "मी त्या घोर दुखण्यांतून उठेंन असं कुणास वाटलं नव्हतं. त्याच वेळीं पिताजी चंद्रशेखर तीर्थपर्यटन करितकरित तिथें येऊन उपस्थित झाले. पिताजी केवळ दयेचा अवतारच. माझी ती अत्यावस्था पाहून त्यांचं हृदय कळवळलं. या निराश्रय विधवेस त्यांनीं आश्रय दिला. त्यांनीं मला आपल्याबरोबर नौकेंत घेतलं. माझ्या प्रकृतीची स्थिति त्यावेळीं इतकी वाईट झालेली होती कीं, माझं देहावसान नौकेंतच होणार, असं गांवांतील लोकांना खास वाटलं. आह्मांला जलमार्गानं इकडे यावयास बरेच दिवस लागले. नदीच्या आरोग्यजनक वायूमुळं आणि पिताजींच्या काळजीपूर्वक प्रयत्नांनीं इथं पोंचण्यापूर्वीच मी बरी झाल्यें. थोड्या दिवसांनंतर आमची नौका मंदिराच्या घाटास येऊन लागली व तेव्हांपासूनच मी पिताजींजवळ रहात आहें."

कमलेची हकीगत ऐकतांऐकतां सरलेचे डोळे अश्रूंनीं भरून आले. कमलेचा हात प्रेमानें आपल्या हातांत घेऊन ती ह्मणाली "ताई, आतां मी आणखी कधींहि दुःख करणार नाहीं. तुझ्या अति दुःखाची गोष्ट ऐकून मी आतां आपलं स्वतांचं दुःख विसरल्यें."

याप्रमाणें सुखदुःखाच्या गोष्टी बोलत त्या दोघी मैत्रिणी दोनप्रहर रात्रीच्या वेळीं नदीकिनाऱ्यावर बसल्या आहेत, इतक्यांत कोणीं मागून येऊन एकदम सरलेचे डोळे झांकले. डोळे झांकणारी व्यक्ति सरलेस ह्मणाली "मी कोण, सांग पाहूं?"

सरलेस तो आवाज ओळखीचाच वाटला; परंतु आपले डोळे मिटणारें कोण आहे, हें कांहींकेल्या तिच्या लक्ष्यांत येईना. वनग्रामांत रहाणाऱ्या आपल्या एकेक मैत्रिणीचें ती नांव घेऊं लागली. "श्यामसुंदरी?"

डोळे उघडले नाहींत.

"मनोमोहिनी?"

तथापि डोळे झांकणाऱ्या माणसानें आपले हात एकीकडे काढले नाहींत.

"निर्मलकुमारी?"

डोळे जशाच्या तसेच झांकलेले राहिले.

"जोगेंद्रमोहिनी!"

वरप्रमाणेंच स्थिति.

"तारा?"

"तुझं डोस्कं! इतक्यांतच मला विसरलीस अं? तरीपण बाई अजून लग्न झालं नाहीं; लग्न होण्यापूर्वीच जर ही स्थिति, तर हळद लागल्यावर काय करशील कोण जाणे!! असें म्हणतह्मणत सरलेची प्रियसखी, अमला समोर उभी राहिली.

सरलेच्या विस्मयास सीमा नाहीं.—अमला?—इथें?—कधीं आली? हें कोडें तिला कांहींकेल्या सुटेना. अश्रुपूर्ण लोचनांनीं तिनें अमलेस

आलिंगन देऊन तिच्या वक्षःस्थळावर आपलें मस्तक ठेविलें. अमलेनेंहि आपली प्रेमपुतळी फार दिवसांनीं भेटल्यामुळें तिला घट्ट मिठी मारिली. तिचे डोळे भरून आले.

थोड्या वेळानें अमला ह्मणाली "अशा दोनप्रहर रात्रीच्या वेळीं तूं इथं अंधारांत काय ह्मणून बसली आहेस ? तुला मी कितीतरी शोधशोध शोधलं, परंतु कुठं–कुठं ह्मणून पत्ता लागला नाहीं."

"इथं मी कमलेबरोबर गोष्टी करित बसल्यें होत्यें. गोष्टींच्या भरांत रात्र किती झाली हें कांहीं समजलं नाहीं. तूं आजच आलीस का ?"

"होय, आजच आल्यें. तुझी भेट घेण्याचं मी किती दिवसांपासून तरी ह्मणत्यें आहें, पण बुढ्ढोबा मला कुठले येऊं देणार ? शेवटीं आज मी जेव्हां अगदीं हट्ट घेऊनच बसल्यें, तेव्हां कुठं परवानगी मिळाली."

नंतर त्या तिघीजणी आश्रमांत आल्या.

## प्रकरण १७ वें.

## इच्छापुरचा जमीदार.

But I have woes of other kind,
Troubles and sorrows more severe,
Give me to ease my tortured mind,
Lend to my woes a patient ear.

*Crabbe.*

चंद्रशेखर आणि केशवाचार्य यांखेरीज दुसऱ्या कोणासहि महाश्वेतेची माहिती नव्हती. त्या दोघांनीं याविषयीं कोणासहि चकारशब्द सांगितला नव्हता. इतकेंच नव्हे, तर महाश्वेतेची खरी हकीगत कोणासहि कळूं न देण्याविषयीं ते पूर्ण खबरदारी घेत असत.

मंदिरांतील शांत, द्वेषविद्वेषशून्य निवासीगणाच्या सहवासानें महाश्वेतेचें हृदय किंचित् शांत झालें होतें. तरीपण पतिवधाचा सूड घेण्याची प्रबळ इच्छा त्या मानिनीच्या अंतःकरणांत अद्याप जशीच्या तशीच जागृत होती. वयाबरोबर कोणाचा स्वभाव कांहीं पालटत नाहीं. ती पूर्वींसारखीच असूनहि स्थिरभावानें आणि दृढनिश्चयानें प्रतिरात्रीं महादेवाची पूजा करित असे.

आज चंद्रशेखराच्या घरीं एक मोठा धनाढ्य पाहुणा आला होता. आश्रमांतील बरीचशी मंडळी आपापलें जेवणखाण उरकून पाहुण्याजवळ येऊन बसली होती. गृहाच्या मध्यभागींच चंद्रशेखर बसला होता. त्याचें वय पन्नासांपेक्षांहि अधिक होतें. परंतु मंदिरांतील शांत देवकार्यांत सर्व आयुष्य गेल्यामुळें ह्मणा, किंवा त्याच्यावर मानसिक शांततेची पूर्ण कृपा असल्यामुळें ह्मणा, त्याच्या प्रशस्त ललाटावर वार्धक्याचें किंचिन्मात्र चिन्ह दृग्गोचर होत नव्हतें. दोन्ही डोळे ज्योतिःपूर्ण होते; अंगकांति सतेज होती; आणि त्या सतेज अंगावर शुभ्र यज्ञोपवीत हें क[illegible]तिल[illegible]होतें. चंद्रशेखराच्या दुसऱ्या बाजूस तो बडा पाहुणा

बसला होता. पाहुण्याचें वयहि चंद्रशेखराइतकेंच होतें. परंतु संसाराच्या घोर चिंतेमुळें आणि ऐहिक दुःखांमुळें त्याचें शरीर जीर्ण झालेलें होतें. मस्तकावरील बहुतेक केश पिकले होते. इतकेंच नाहीं, तर भुवईतील एखाददुसरा केशहि शुभ्र दिसत होता. डोळे निस्तेज, वदनमंडल कांतिहीन आणि सर्व गात्रें शिथिल झालीं होतीं. चंद्रशेखर आणि त्याचा पाहुणा या दोघांतील हा स्पष्ट विरोधाभास पाहून संसाराविषयीं मन साहजिकच उदासीन होतें आणि पुण्यबलाचें सामर्थ्य मनावर स्पष्टपणें उमटतें. ह्या पाहुण्यास आमचे प्रियवाचक अगदींच ओळखित नाहींत, असें नाहीं. निदान याचें नांवतरी त्यांनीं ऐकिलेलें आहे. इच्छापुरचे जमीदार, आणि सुरेंद्रनाथाचे वडील नगेंद्रनाथ ते हेच.

चंद्रशेखर आणि नगेंद्रनाथ यांच्या आजूबाजूस आणि मागें मंदिरांतील बरीचशी मंडळी बसली होती. चंद्रशेखराच्या कांहीं मागें किंचित् अंधारांत महाश्वेता डोक्यावरून बुरखा घेऊन बसली होती. तिच्याजवळच केशवाचार्य बसून तिच्याशीं हलक्या आवाजांत कसल्याशा गोष्टी करित मधूनमधून नगेंद्रनाथाकडे पहात होता. चंद्रशेखराच्या डाव्या बाजूस आपल्याच विचारांत गर्क झालेली अशी कमला बसली होती. एका कोपऱ्यांत सरला आणि अमला बसल्या होत्या. आज त्यांच्या आनंदाला पारावार राहिला नव्हता. त्यांच्या गोष्टींना अंत नव्हता. त्यांच्या सुमिष्ट ओष्ठांवरील मंदमधुर सुहास्यास अंतर्धान पावण्यास अवकाशच सांपडत नव्हता. दुसऱ्या कोपऱ्यांत श्यामसुंदरी, मनोमोहिनी, निर्मल-कुमारी, जोगेंद्रमोहिनी, तारासुंदरी प्रभृति अल्पवयस्क ब्राह्मणकन्यांनीं आपआपसांत हास्यविनोद करित एकच गलबला मांडला होता, व मध्येंच सर्वजणी अगदीं चुप होऊन चंद्रशेखर आणि नगेंद्रनाथ यांच्या गोष्टी ऐकत होत्या.

नगेंद्रनाथ एक लांब सुस्कारा सोडून चंद्रशेखरास लक्षून ह्मणाला "महाराज! आपलें हें विस्तीर्ण आणि भव्य महेश्वरमंदिर पाहून माझें अंतःकरण फार प्रसन्न झालें आहे. जर या मोहमय संसाराचा त्याग करून मीं आपल्याप्रमाणेंच हा धर्ममार्ग स्वीकारला असता, तर आज या अशा वृद्धावस्थेंत मला असीम दुःखसागरांत गटंगळ्या खाव्या लागल्याना!"

चंद्रशेखर म्हणाला "सर्वसंगपरित्याग करून अरण्यवास पतकरल्यानेंच मुक्ति किंवा खरें सुख मिळतें, आणि संसारांत राहून पुण्यकर्में आचरण्यानें मोक्ष किंवा खरें सुख प्राप्त करून घेतां येत नाहीं? शास्त्रेंतर म्हणतात कीं, सत्याचरण आणि परोपकार यांपासून जितकें पुण्य लागतें तितकें यागयज्ञ केल्यानेंहि लागत नाहीं. जो जमीदार आज आपल्या परोपकारी स्वभावामुळें आणि विलक्षण प्रजावात्सल्यानें सर्व लोकांस प्रिय आणि पूज्य होऊन राहिला आहे, त्याला सर्वसंगपरित्याग करून मंदिराचा आश्रय करणें उचिततरी आहे का?"

"महाराज! आपण जो हा माझा इतका मानसन्मान आणि आदरसत्कार करितां त्या मानसन्मानास आणि आदरास मी योग्य नाहीं. जर असतों, तर आज मी आपल्या पापक्षालनार्थ महंत चंद्रशेखर यांचेसन्निध कधींहि आलों नसतों—मला येण्याची गरजच पडली नसती."

चंद्रशेखर ह्मणाला "या जगांत पापी कोण नाहीं? मीं पाप केलें नाहीं असें कोणीतरी छातीस हात लावून सांगूं शकेल? आपण निष्कलंक—निरपराधी आहों असें कोणीतरी शपथेवर उच्चारूं शकेल?"

अशाप्रकारें दोघेजण कांहीं वेळपर्यंत गोष्टी करित होते. नंतर नगेंद्रनाथ आपल्या येण्याचा उद्देश सांगूं लागला.

## प्रकरण १८ वें.

## जमीदाराचा पूर्ववृत्तांत.

And let me if I may not find
A friend to help, find one to hear.'

*Crabbe.*

नगेंद्रनाथ ह्मणाला "महाराज! माझ्यासारखा दुःखी आणि हतभागी प्राणी या संपूर्ण जगतीतलावर दुसरा कोणीहि नसेल. मी आपली दुःखकहाणी कथन करितों, ती कृपा करून ऐका.

"माझ्या पत्नीच्या जन्मसमयीं आकाशांत एक नवा धूमकेतू दिसला होता. त्यावरून ही मुलगी पुढें वेडी होईल, असें ज्योतिष्यांनीं भाकित केलें होतें. आतां ज्योतिष्यांनीं भविष्य वर्तविल्याप्रमाणें जरी माझी पत्नी अक्षरशः वेडी निघाली नाहीं, तरी तिच्या कांहीं मनोवृत्ती इतक्या वेगवती होत्या कीं, तिच्यांत आणि वेडींत कांहीं फारसें अंतर नव्हतें. माझी ती वेडी निवर्तल्याला आज सरासरी बारा वर्षें झालीं.

"त्या वेडीपासून मला दोन पुत्र झाले. ते दोघेहि आपल्या मातेसारखेच वेडे होते. वडील मुलगा चिंतेनें वेडा झाला होता, आणि धाकट्या मुलाला दुसऱ्यांवर उपकार करण्याचें वेड लागलें होतें. दोघेहि पुत्र माझ्या या नेत्रांचे तारे होते. परंतु आज ते कुठें आहेत! हे निष्ठुर विधात्या! वार्धक्यांत हेंच भोगण्याचें तूं माझ्या नशिबांत लिहिलें होतेंस? महाराज, त्या पुत्रांच्या अभावीं माझे दोन्ही नेत्र जाऊन मी अगदीं अंध बनलों आहें. मीं माझीं तीं दोन्हीं रत्नें हरविल्यामुळें आज अगदीं कंगाल झालों आहें."

नगेंद्रनाथाच्या त्या दुःखोद्गारांनीं सर्वांचीं अंतःकरणें द्रवून गेलीं. क्षणेकानें नगेंद्रनाथ पुढें ह्मणाला "माझा वडील पुत्र लहानपणींच वाघाच्या भक्ष्यस्थानीं पडला. पुत्राच्या चिरविरहजनित शोकानें त्याच्या

जननीचाहि थोड्याच दिवसांत अंतकाळ झाला. ज्येष्ठपुत्राच्या आणि पत्नीच्या वियोगाचें सर्व दुःख मी आपला कनिष्ठ पुत्र सुरेंद्रनाथ याच्या मुखाकडे पाहून गिळून टाकिलें. अहाहा! सुरेंद्रनाथासारखा वीरपुरुष कोणींहि कधीं पाहिला नसेल! दया, धर्म, विद्या, बळ, शौर्य यांमध्यें त्याच्याशीं स्पर्धा करणारा कोणीहि नाहीं. लहानपणींच त्याच्या अंगांत सिंहासारखें बळ आलेलें होतें. मल्लयुद्धांत त्यानें कितीतरी मी मी ह्मणणाऱ्या पहिलवानांनां चीत केलें आहे. आपल्या बाहुबळानें त्यानें समस्तांचें चित्त विस्मित केलें आहे. त्याच्यासारखा घोड्यावर बसण्यांत पटाईत असा स्वार तर या प्रांतांत मला साऱ्या जन्मांत आढळला नाहीं. ज्यांनीं ज्यांनीं सुरेंद्रनाथास पाहिलें आहे ते ते सर्व त्याला कर्णासारखा दानशूर आणि भीमासारखा बलिष्ठ असें ह्मणतात. त्याला राजा समरसिंह यांच्या तोंडून युद्धसंबंधीं हकीगत ऐकिण्याचें लहानपणापासूनच फार आवडत असे. युद्धवार्ता ऐकतांऐकतां पोराची मुद्रा गंभीर होई, डोळे आरक्त होत. समरसिंहांची तरवार हातांत घेऊन तो युद्धास जाण्याविषयींची आपली उत्सुकता दाखवी. बालकाची ती वीरमूर्ति पाहून राजे समरसिंह सजलनयनांनीं त्याचें चुंबन घेत. राजे सर्वदा ह्मणत कीं 'पठाण लोक बंगालींनां भित्रे म्हणून त्यांची टवाळी करतात; परंतु त्याच बंगालींमध्यें मधूनमधून वीरपुरुष जन्म घेतांना दृष्टीस पडतात. सुरेंद्रनाथ! मी मेल्यावर माझी ही तरवार तूं घे. तुझ्या हातांत असल्यावर माझ्या या खड्गाचा कधींहि अपमान होणार नाहीं.' परंतु हाय! आज तो सुरेंद्रनाथ कुठें आहे! देवा! आतां मी कोणाच्या मुखाकडे पाहून सुरेंद्रनाथाचा विरह सहन करूं!!" बोलतांबोलतां ह्मातान्याच्या नेत्रांतून घळकन् एकदोन अश्रुबिंदु पडले.

चंद्रशेखर शोकविव्हल होऊन ह्मणाला "सुरेंद्रनाथाची कांहीं अमंगल वार्ता आपल्या कानांवर आली आहे कीं काय?"

"तसें असतें तर मी हा वेळपर्यंत जिवंततरी राहिलों असतों?"

यावर चंद्रशेखर ह्मणाला "मग, तुह्मी इतकी चिंता कसची करतां? सुरेंद्रनाथ कांहीं दिवसांकरितां परदेशांत गेला आहे. परमेश्वरकृपेनें तो लौकरच सुखरूपपणें घरीं येईल!"

नगेंद्रनाथ ह्मणाला "आपला आशीर्वाद अन्यथा होणार नाहीं. पण काल रात्रीं मीं एक फारच वाईट स्वप्न पाहिलें. त्यामुळेंच मी इतका चिंतातुर झालों आहें, व ह्मणूनच आपणापाशीं आलों आहें. माझा तो देवतुल्य, परंतु दूर परदेशांत असल्यामुळें बंधुहीन, सहायहीन असा पुत्र भयंकर लाटांमध्यें सांपडून बुडत आहे, असें मीं स्वप्नांत पाहिलें. महाराज या स्वप्नाचा अर्थ काय? कांहीं अनिष्ट, अमंगळ प्रकार घडून येणार असेल तर मी आतांच प्राणत्याग करीन."

चंद्रशेखर ह्मणाला "तुह्मांला घाबरण्याचें कांहींएक कारण नाहीं. भगवान् आपल्या वीरपुत्राचें रक्षण करील. पुण्यात्मा, प्रजावत्सल जमीदाराला दयाळु परमेश्वर वार्धक्यांत कधींहि पुत्रहीन करणार नाहीं!"

नगेंद्रनाथानें सजल नयनांनीं प्रत्युत्तर दिलें "महाराज, मला पुण्यात्मा ह्मणूं नका; मी घोर पातकी आहें. जर आपली इच्छा असेल आणि आपली आज्ञा होत असेल, तर मी आपणास माझी पापकथा निवेदन करितों. मग पापक्षालनार्थ मला कांहीं उपाय सुचवा.

"माझा सुरेंद्रनाथ जेव्हां बारा वर्षांचा होता, तेव्हां एके दिवशीं मी त्याला आपल्याबरोबर घेऊन राजा समरसिंह यांच्या भेटीस गेलों होतों. राजे बंगदेशांतील समस्त कायस्थजमीदारांचे शिरोरत्न होते, हें आपणास सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. माझ्यावर त्यांची सख्या भावाप्रमाणें प्रीति होती. त्या दिवशीं आह्मी बराच वेळपर्यंत गोष्टी बोलत बसलों होतों. माझा सुरेंद्रनाथ आणि समरसिंहाची एकुलती एक कन्या सरला हीं दोघें आमच्याजवळच खेळत होतीं. खेळतांखेळतां त्या मुलीनें सहज एक फुलांची माळ सुरेंद्रनाथाच्या गळ्यांत घातली. सरला समरसिंहांचा केवळ जीव कीं प्राण होती. आपल्या कन्येचें

हें कृत्य पाहून राजांचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून येऊन ते मला ह्मणाले 'नगेंद्रनाथ, मोठमोठे राजे आपल्या पुत्राकरितां माझ्या कन्येची मागणी करित आहेत. परंतु सरलेनें आपण होऊन जो पति पसंत केला आहे त्याच्याबरोबरच मी तिचें लग्न करीन.' हें ऐकून माझ्यातर आनंदास पारावर राहिला नाहीं. बंगचूडामणी राजा समरसिंह हे आपली एकुलती एक कन्या माझ्यासारख्या सामान्य जमीदाराच्या मुलास देणार, हें ऐकून मला आपल्या भाग्याचा मोठा अभिमान वाटूं लागला. समरसिंहांच्या या अनुग्रहाबद्दल मीं त्यांचे अत्यंत आभार मानिले. परंतु त्या वचनाचा मीं आज भंग केला आहे!"

महाश्वेता बुरख्यांतून रोषयुक्त दृष्टीनें पाहूं लागली. तिचें शरीर कंटकित झालें होतें. नगेंद्रनाथाच्या तोंडून ती गोष्ट ऐकण्याकरितांच ह्मणून ती मुद्दाम तेथें बसली होती.

नगेंद्रनाथ पुढें म्हणाला "मीं आपलें वचन पाळलें नाहीं. समरसिंहांच्या मृत्यूनंतर त्यांच्या निराश्रय आणि अनाथ कन्येशीं आपल्या मुलाचें लग्न करण्याचा विचार मीं दूर केला व दुसरीं स्थळें पहाण्याच्या उद्योगास लागलों. बंगदेशांत श्रीमंत कायस्थ जमीदारांचा कांहीं अभाव नाहीं. इच्छापुरच्या जमीदार घराण्याशीं आपला संबंध घडून यावा, असें कोणास वाटणार नाहीं? लौकरच एक मनाजोगें स्थळ पाहून मीं सुरेंद्रनाथाच्या लग्नाचें ठरविलें. परंतु मी जरी आपलें वचन भंग करण्यास तयार झालों होतों, तरी माझा सत्यनिष्ठ आणि धर्मपरायण पुत्र त्या गोष्टीस कबूल झाला नाहीं. तो एके दिवशीं मला म्हणाला 'बाबा, मीं आजपर्यंत आपली कधीं अवज्ञा केली नाहीं. पण एका गोष्टीची मात्र मला माफी करा. आपण राजा समरसिंह यांनां जें वचन दिलें होतें, त्याचा भंग करूं नका.' मुलाचें हें भाषण ऐकून माझ्या अंगाचा नुसता संताप झाला. सुरेंद्रनाथाचा विवाह बलपूर्वक करण्याचा मीं विचार केला. तत्क्षणींच जोशाला बोलावून

लग्नाची तिथी वगैरे निश्चित केली. परंतु शेवटीं माझ्या मुलानें आपलेंच म्हणणें खरें केलें. तो गुप्तपणें घरांतून कोणीकडे निघून गेला, त्याचा आजदिवस पत्ता नाहीं!"

नगेंद्रनाथ पुढें म्हणाला "समरसिंहांस दिलेल्या वचनाचा भंग केल्या-कारणानेंच आज मला म्हातारपणीं या यातना भोगाव्या लागत आहेत. माझें तें पूर्वींचें मनोराज्य कुठें गेलें! माझ्या मुलांनीं जमीदारीचा सर्व भार आपल्या शिरावर घेऊन मला संसारकाळजींतून मुक्त करावें, सुनांनीं या वार्धक्यांत माझी सेवाशुश्रूषा करावी, तें एकीकडेच राहून पुत्र नाहीं, सून नाहीं, पत्नी नाहीं, मीच कायतो एकटा या दुस्तर भवसमुद्रांत गटंगळ्या खात पडून राहिलों आहें. महाराज, माझ्यासारखा हतभागी प्राणी या त्रैलोक्यांतहि सांपडणार नाहीं!"

बोलतांबोलतां म्हातारा दोन्ही हातांनीं डोळे झांकून घेऊन उच्च स्वरानें रुदन करूं लागला. तें पाहून सर्वांनां फारच वाईट वाटलें. चंद्रशेखर बराच वेळपर्यंत त्याचें शांतवन करित होता.

नगेंद्रनाथ कांहींसा शांत होतांच केशवाचार्य म्हणाला "वचनभंग केल्याचें आपल्याला जर खरोखरच दुःख होत असेल, तर आतांतरी आपलें वचन पाळा; अजून वेळ गेली नाहीं."

नगेंद्रनाथ म्हणाला "केशवाचार्य! मी आपलें वचन पूर्ण करीन. राजा समरसिंहांच्या कन्येस आणून द्या, मी तिच्याबरोबर माझ्या सुरेंद्राचें लग्न करीन. माझा पूर्वींचा तो गर्व, ताठा, अभिमान हीं आतां पार नष्ट झालीं आहेत. मीं जर पुनः प्रतिज्ञेचा भंग केला तर मला माझ्या पुत्राचें मुखहि न दिसो!"

यावर केशवाचार्य कांहींएक बोलला नाहीं. तो महाश्वेतेसह पुनः गोष्टी करूं लागला. केशवाचार्य महाश्वेतेला हळूच म्हणाला "बाई, आतां उगीच उशीर कां करितेस? आपली ओळख दे."

महाश्वेता ह्मणाली "जोंपर्यंत परमेश्वर मला पूर्वींसारखीच ऐश्वर्य-संपन्न करित नाहीं, तोंपर्यंत मी आपली ओळख देणार नाहीं व कन्येचा विवाहहि करणार नाहीं."

"कां बरें?" केशवाचार्यानें विचारलें.

"दुसऱ्यांचा आपल्यावर उपकार करून घेणें, ही माझ्या घर-धन्याची चाल नव्हती. त्यांनीं दुसऱ्यांवर असंख्य उपकार केले आहेत, पण आपल्यावर कधींहि कुणाचाहि उपकार घेतला नाहीं."

"मग तूं मला नगेंद्रनाथास वचन पाळण्याविषयीं विचारण्यास कां लावविलें?"

"आतांतरी ते आपलें वचन पाळण्यास तयार आहेत कीं नाहीं, हें पहाण्याकरितांच. ते तयार आहेत; परंतु मी तयार नाहीं. माझा उद्देश सफल झाल्याशिवाय मला पोरीचं लग्न कर्त्तव्य नाहीं."

## प्रकरण ११ वें.

## नवें संकट!

All prevailing foe!
I curse thee! let a suffering curse
Clasp thee, his torture, like remorse.
*Shelley.*

चंद्रशेखराच्या घरीं जमलेली मंडळी हळूहळू आपला मार्ग सुधारूं लागली. परंतु महाश्वेता अजूनहि आपल्याच जागेवर बसली होती. आणि अमला आपल्या प्रिय मैत्रिणीचें मस्तक आपल्या हृदयाशीं धरून तेथेंच विचार करित बसली होती. ती एवढा कसचा बरें विचार करित होती? जमीदाराचा वृत्तांत ऐकून अमलेच्या डोक्यांत नानाविध विचारतरंग उठूं लागले. आपण ठरविलेल्या मुलीशीं लग्न करण्याचें नाकारून मुलगा घरांतून कोणीकडे निघून गेला, असें तो जमीदार ह्मणाला होता. तेव्हां इंद्रनाथ हाच या जमीदाराचा पुत्रतर नसेलना, असा तिच्या मनांत संशय आला. ती जों जों विचार करूं लागली, तों तों तिला आपला संशय खरा असण्याचा अधिकाधिक संभव वाटूं लागला. ती मनांत ह्मणाली "महाश्वेता समरसिंहाची स्त्री आहे काय? तिची चर्या पहातां ती राजपत्नी असावी, असा सहज तर्क होतो. साधारण कायस्थ लोकांच्या स्त्रीसारखी ती दिसत नाहीं. कोणाशीं फारसें बोलावयास•नको; रोज नेमधर्मानें शिवाची पूजा करावयाची; वृद्धपणीं मुखावर स्वर्गीय तेज विराजमान झालेलें आहे. या सर्व गोष्टींवरून ती मोठ्या घराण्यांतील स्त्री असावी, असें अनुमान करणें कांहीं चुकीचें होणार नाहीं. आणि मग माझी ही प्रिय मैत्रीण सरला राजकुमारी आहे काय? बिचारी यावेळीं कशी गाढ निद्रेंत मग्न झाली आहे! आणि तिचें मनतर यापेक्षांहि अधिक निद्रिस्त आहे. आपण राजकन्या आहों, हें बापडीला बिलकूल ठाऊक नाहीं. पण ही खरोखरच राजकन्या आहे काय? राजकन्येच्याच पदरजानें रुद्रपुर आणि वनग्राम येथील रस्ते आणि

घांट पवित्र झाले आहेत काय? परमेश्वरा तुलाच ठाऊक! मलातर कांहींच कळत नाहीं." अशा प्रकारच्या विचारांचें डोक्यांत भ्रमण चालल्यामुळें अमला आज झोंपदेखील विसरली होती.

सर्व मंडळी निघून गेल्यावर नगेंद्रनाथ विश्रांतीकरितां आपल्या शयनमंदिराकडे चालता झाला. वृद्ध, शोकग्रस्त जमीदाराची सेवाशुश्रूषा करण्याचें काम चंद्रशेखरानें स्नेहमयी कमला आणि सरलचित्त सरला यांच्यावर सोंपविलें होतें. त्या दोघींनीं जमीदाराकरितां आपल्या हातांनीं भोजन तयार करून त्यास वाढलें; त्याची निजण्याची उत्तम प्रकारें व्यवस्था लावून दिली, व अशाच प्रकारची त्यांनीं त्याची आणखी पुष्कळ सेवा केली. त्या शांत, विनयसंपन्न बालिकांची कामाविषयींची तत्परता आणि दक्षता पाहून पाहुण्याची मर्जी फारच प्रसन्न झाली. जमीदार कमलेस उद्देशून ह्मणाला "बेटा, तूं आणि सरला या दोघींनीं आज माझी जी सेवाशुश्रूषा केली, तशी सेवाशुश्रूषा आज बऱ्याच दिवसांत मीं अनुभविली नव्हती. मी जर अभागी नसतों तर आज तुमच्यासारख्या विनयशील, सुस्वरूप आणि स्नेहमयी स्नुषा माझ्या सेवेंत तत्पर असत्या; त्यांच्यामुळें माझें घर आज प्रकाशित झालें असतें. परंतु विधात्यानें तें सुख माझ्या अदृष्टांत लिहिलेंच नाहीं! माझ्या देवतुल्य पुत्रांनीं आणि लक्ष्मीसारख्या सुनांनीं आज माझें घर आनंदानें हंसत असतें! पण नशीबांत नाहीं त्याला काय करणार? या गांवासारखें शांत आणि एकांत स्थान मला इतरत्र कुठेंहि आढळलें नाहीं. आणि तुमच्यासारख्या प्रेमळ, सर्वगुणसंपन्न आणि सुस्वरूप मुली मला कोणच्याहि कायस्थकुलांत दिसल्या नाहींत."

अमलेनेंहि नंतर तेथून शयनार्थ गमन केलें. बाहेरच्या पडवींत महाश्वेता आणि सरला या दोघीच कायत्या अजूनहि बसल्या होत्या. झोंप घ्यावयास आतां जावेंच, असा महाश्वेता विचार करित आहे इतक्यांत एक परिचारिका महाश्वेतेजवळ येऊन तिच्या कानांत ह्मणाली "राणीसाहेब, चला, लवकर चला, तुमची घांटावर वाट पहाताहेत."

'राणीसाहेब' हें संबोधन ऐकतांच महाश्वेता चपापली. आपणास ओळखणारें या गांवांतकोण आहे, असा प्रश्न मनांत उद्भवून क्षणकाल ती गोंधळल्यासारखी झाली. आतां काय करावें, हेंच तिला सुचेना. परिचारिका पुनः म्हणाली "राणीसाहेब, आपण मला ओळखलं नाहीं? मी आपलीच एक जुनी दासी आहें."

तेंव्हां कुठें महाश्वेतेला ओळख पटली. ती चतुर्वेष्टित दुर्गांतील एक परिचारिका होती. महाश्वेता विस्मयापन्न होऊन म्हणाली "इतक्या दिवसांनंतर आज तूं कुठून व कशाकरितां आलीस? मी या गांवांत आहें, हें तुला कसं समजलं?"

दासी म्हणाली "राणीसाहेब, आपण चतुर्वेष्टित दुर्गांतून पळून गेल्यावर आपल्या माहेरच्या मंडळीनं आपला व सरलाबाईचा कितीतरी शोध केला. आपल्याकरितां सर्व मंडळी कशी हळहळली, रडली, तें आतां सांगण्यांत हंशील नाहीं. इतका शोध केल्यावर कुठं आतां आपण सांपडलां. सरलाबाईच्या आजीबाई आपल्या लाडक्या नातीचं मुखकमल पहाण्याच्या इच्छेनं कोणकोणते देश भटकत फिरत होत्या, तें कांहीं सांगतां येत नाहीं. फिरतांफिरतां शेवटीं त्या रुद्रपुरास आल्या व तिथून नौकेंत बसून आज इथं आल्या आहेत. परंतु इथं येण्यास त्यांनां भीति वाटते. याकरितां आपण सरलाबाईनां घेऊन माझ्याबरोबर घांटावर चला. म्हणजे पुष्कळ दिवसांनंतर आपणा दोघांनां पाहून त्यांच्या डोळ्यांचं पारणं फिटेल."

मागील गोष्टींची आठवण होतांच मानिनी महाश्वेतेचें हृदय द्रवून गेलें. डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहूं लागले. आपल्या कन्येस घेऊन ती त्या परिचारिकेबरोबर घांटावर जावयास निघाली.

घांट जवळच होता. घांटावर येतांच परिचारिकेनें महाश्वेतेस नौका दाखविली. नौका अत्यंत वेगानें जाणारी होती. तिच्यांत दहा बारा नावाडी हातांत वल्हीं घेऊन उभे होते. नौकेंतून कोणाएका

वृद्ध स्त्रीनें महाश्वेतेस आपल्याजवळ येण्याविषयीं हातानें खूण केली. त्याप्रमाणें महाश्वेता कन्येसह नौकेंत जाऊन बसली. तत्क्षणीं नौका झाली. महाश्वेतेस बोलवावयास आलेली परिचारिका चालू नौकेंत न बसतां आणखी कोणीकडे पसार झाली!

नौकेंतील वृद्ध स्त्री सरलेची आजी नव्हती. वृद्ध स्त्रीचा वेष घेतलेला तो शकुनीचा एक हेर होता! महाश्वेता आपल्या कन्येसह आज सतीशचंद्राच्या कैदेंत पडली!

## प्रकरण २० वें.

## बंदीवास.

The pale stars of the morn
Shine on a misery, dire to the borne.
Dost thou faint?

*Shelley.*

प्रातःकाळचा समय. सूर्याच्या कोमल आणि सुवर्णवर्ण किरणांनीं चतुर्वेष्टित दुर्ग विशेषच शोभायमान झालेला होता. तट, स्तंभ, गवाक्ष, खोली, गच्ची सर्वच प्रकाशमय झालेलीं होतीं. किल्ल्याच्या पायथ्याशीं शांत प्रवाहानें वहाणाऱ्या यमुनानदीचें उदक सूर्यप्रकाशांत चकचक करित होतें. नदीच्या हृदयप्रदेशावर प्रचंड दुर्गाची लांबचलांब पसरत गेलेली छाया पडली होती. नदीच्या पात्रामध्यें कोठेंकोठें एखाददुसरी नावही चाललेली दिसत होती. आधींच थंड असलेला वायु रात्रीं पडलेल्या दंवाच्या योगानें अधिकच थंड होऊन मंदमंद वहात होता. स्नान करावयास किंवा पाणी भरावयास ह्मणून नदीच्या घांटावर आलेल्या रमणींचें शरीर त्या शीतल वायूनें कंटकित होत होतें. गुराखी गुरांवासरांनां घेऊन आनंदानें गाणीं गात आणि पांवा वाजवित कुरणांकडे चालले होते. पक्षिगणहि तरुण अरुणाच्या किरणांनीं आणि शीतल प्रभातसमीरणाच्या योगानें पुलकित होऊन गायनानंदांत गर्क झालेला होता. समस्त जगत् प्रकाशमय आणि आनंदानें स्मितहास्य करित आहेसें दिसत होतें.

त्या प्रचंड किल्ल्याच्या एका तळघरामध्यें मिणमिण जळणाऱ्या दिव्याच्या उजेडांत महाश्वेता आणि सरला या उभयतां निजल्या होत्या. शकुनीच्या हेरांनीं त्यांस कैद करून येथें आणून ठेविलें होतें.

सरलेस झोंप लागली होती. महाश्वेतेच्या कुशीस तिला अगदीं बिलगून सरला निजली होती. सगळ्या रात्रीच्या जागरणामुळें तिला

आतां गाढ झोंप लागली होती. तिचें शरीर आतांशा क्षीण झालें होतें. डोळे खोल गेले होते. मुखमंडलावर पूर्वीसारखी प्रफुल्लता दिसत नव्हती. लहानपणीं कधींहि ठाऊक नसलेल्या परंतु आतां सर्वदा हृदयांत धुमसणाऱ्या काळजीनें तिच्या वयास नैसर्गिक असणारा अल्लडपणा पार नाहींसा झाला होता. सरला आतां बालिका नव्हती. एकदम असीम शोकसागरांत पडल्यामुळें बालिकासुलभ सुखस्वप्नांतून ती अकस्मात् जागी झाली होती.

सरलेला हृदयाजवळ घेऊन महाश्वेता निजली होती. परंतु तिला झोंप लागली नव्हती. तिच्या मुद्रेवर त्यावेळीं कोणत्या विशिष्ट विकाराची छाया उमटलेली होती, हें सांगणें केवळ अशक्य आहे. भय, दुःख किंवा चिंता यांपैकीं एकाहि मनोविकाराचें प्रतिबिंब तिच्या मुद्रेवर दिसत नव्हतें. तिचे डोळे इंगळासारखे लाल झाले होते; वरच्या दांतांनीं खालचा ओंठ तिनें सडकून चावला होता; आणि तिच्या समस्त वदनमंडलावर उन्मत्ततेचें चिन्ह दिसत होतें. कपाळावर शिरा अत्यंत ताठल्या होत्या. पूर्वस्मृति आणि चिंतातरंग यांच्यायोगें हृदय अतोनात क्षुब्ध झालें होतें.

कांहीं वेळानें सरलेची निद्रा भंग पावली. उठून बसल्यावर आपल्या प्रिय जननीकडे पहात ती म्हणाली "आई, सगळी रात्र तूं झोंप घेतली नाहीं?"

महाश्वेतेनें कांहींएक उत्तर दिलें नाहीं. सरला पुन्हा ह्मणाली "आई, तुझ्याकरितां काल वाढून आणलेलं पान तें पहा जशाच्या तसंच पडलं आहे, तूं त्याला बोटदिखील लावलं नाहींस!"

महाश्वेतेनें उत्तर दिलें "बाळ, मला भूक नाहीं."

"पण कांहींच खाल्लं नाहीं तर प्राणतरी कसे रहातील."

"बये, प्राण राखून आतां करायचं काय आहे? जर परमेश्वरानं कृपा करून मला यापूर्वींच या जगांतून मुक्त केली असती, तर आज हा प्रसंग येताना! तुला या दुःखद स्थितींत मी पहातेंना!"

सरला सद्गदित कंठानें म्हणाली "आई, हें काय ह्मणत्येस. तुझ्यानंतर मी कुणाच्या तोंडाकडे पाहूं? या जगांत मला आणखी कोण आहे?"

महाश्वेता अश्रुपूर्ण लोचनांनीं ह्मणाली "नाहीं बरं बेटा, तूं खेद करूं नको. माझी जाण्याची वेळ अजून आली नाहीं."

अशाप्रकारें त्या मायलेकींचें भाषण चाललें आहे इतक्यांत कोणीं खोलीचें दार उघडलें. महाश्वेतेनें पाहिलें तों दारांत एक अनुपम रूपसंपन्न बालिका—नव्हे रमणी उभी आहे. दारांत उभी रहाणारी व्यक्ति विमलाच होती, हें वाचकांनां सांगितलें पाहिजे असें नाहीं.

विमलेच्या जें काय दृष्टीस पडलें, त्यानें तिचें हृदय दुःखित झालें. काल वाढून आणलेलें पान जशाच्या तसेंच पडलें आहे; महाश्वेतेची स्थिति फारच शोचनीय झाली आहे; एखाद्या वेड लागलेल्या स्त्रीप्रमाणें ती दिसत आहे; आणि जवळच सरला बसून रडत आहे.

विमलेनें आपले डोळे पुसून काढून महाश्वेतेस लक्षून ह्मटलें "बाई, तुमचं दुःख पाहून माझी छाती फाटून जाते. आपण बाहेर चला."

रमणीच्या कंठांतून निघालेलें तें करुणाव्यंजक भाषण ऐकून महाश्वेतेनें विमलेकडे पाहून विचारिलें "तूं कोण आहेस?"

विमला ह्मणाली "या किल्ल्याचा धनी सतीशचंद्र त्याची मी कन्या— माझं नांव विमला."

क्रोधातिशयानें महाश्वेतेच्या अंगाचा तिळपापड झाला. थोड्या वेळानें ती ह्मणाली "जा, तुझ्या बापास ह्मणावं कीं माझं आयुष्य आतां फार थोडं राहिलं आहे. हे अवशेष राहिलेले दिवस मला एकांतांत घालवूं दे. घडीघडी येऊन मला व्यर्थ छळूं नकोस!"

अन्य प्रसंगीं हें असलें उत्तर ऐकून मानिनी विमलेच्या अंगाची लाहीलाही झाली असती. परंतु बंदीवानांची ती शोचनीय अवस्था पाहून तिच्या हृदयांत क्रोधाचा लेशमात्र संचार झाला नाहीं. तिनें प्रत्युत्तर दिलें "बाई, तुह्मीं माझ्या बाबांवर मिथ्या दोषारोप करित आहां.

बाबांनां या बाबतींत कांहींच ठाऊक नाहीं. मी आपणास त्रास द्यायला किंवा छळायला इथं आल्यें नाहीं; तर या ओंगळ, भयंकर स्थानांतून काढून आपणास दुसरीकडे नेण्यास आल्यें आहें."

महाश्वेता पुनः निष्ठुरतेनेंच ह्मणाली "बंदीवानास रहाण्यास हेंच स्थान योग्य आहे. कैद्याच्या पायांतील बिड्या सोन्याच्या असण्यापेक्षां लोखंडाच्या असणंच इष्ट आहे. जा बेटा, या हतभागिनीचा उपहास करून तिच्या दुःखावर डागण्या देऊं नकोस."

विमला अश्रुपूरित नयनांनीं ह्मणाली "बाई, मी त्या जगदीश्वरास स्मरून सांगल्यें कीं, मी तुमचा उपहास करायला आल्यें नाहीं."

विमला आणखीहि पुढें कांहीं बोलणार होती. तोंच महाश्वेता ओरडून ह्मणाली "जगदीश्वराचं नांव घेऊं नकोस! तुझ्या बापानं त्या नांवाचा कधींहि उच्चार केला नाहीं. तुझ्या बापाच्या वंशांतील कुणींहि त्या पवित्र नांवाचा उच्चार करून त्याचा अपमान करूं नये!"

विमलेनें प्रत्युत्तर केलें "बाई, तुम्ही माझा अन्यायानं तिरस्कार करितां. आपणासारखीच मीहि हतभागिनी, कपाळकरंटी आहें. हतभागिनींनां त्या एका जगदीश्वराच्या नांवाखेरीज या जगांत आणखी काय आहे? मरणकालपर्यंत मी तेंच नांव घेईन. या दुःखपरिपूर्ण संसारांत या हतभागिनीला त्या पवित्र नांवाचाच कायतो एक आधार आहे; त्या पवित्र नांवापासूनच कायतें सुख मिळतं."

विमलेचें तें श्रद्धायुक्त भाषण ऐकून महाश्वेतेचा क्रोध वितळून गेला. विमलेची ईश्वरभक्ति पाहून ती तिच्याकडे टकमक पहात राहिली. महाश्वेतेस विमला त्यावेळीं देवकन्येप्रमाणें भासली. तिच्या डोळ्यांत अश्रु उभे होते, आणि मुखावर स्वर्गीयप्रेम व ईश्वरभक्ति यांखेरीज आणखी कांहींहि दिसत नव्हतें. आतां महाश्वेता हळूहळू म्हणाली "विमले, मला क्षमा कर. न समजतां मीं तुझा तिरस्कार केला. दुःखसमयीं चित्त ठिकाणावर रहात नाहीं."

विमलेनें नंतर महाश्वेतेस जास्त बोलूं दिलें नाहीं. जवळ जाऊन तिचा हात आपल्या हातांत घेऊन ती ह्मणाली "बाई, क्षमा मागण्याचं कांहीं कारण नाहीं. आपणच दुःखी आहांत, मी कांहीं कमी दुःखी आहें, असं नाहीं. माझी खरी स्थिति समजल्यावर तुह्मीदिखील मजवर दया कराल."

महाश्वेतेनें विमलेचा हात धरला व दोघीहि बराच वेळ रडत बसल्या. हतभागिनी सरलाहि त्यांच्याबरोबर रडूं लागली. थोड्या वेळानें महाश्वेता म्हणाली "विमले, तुझं दुःख काय आहे तें मी समजल्यें. बापाचं पापकर्म पाहून कोणत्या धर्मशील कन्येस दुःख होणार नाहीं?"

"बाई," विमला तत्काळ ह्मणाली "तुह्मी अजूनहि भ्रमांतच आहां. मी जशी हतभागी आहें, तसेच माझे बाबाहि पण हतभागी आहेत. त्यांच्या जिवाचा कांहींच भरंवसा धरवत नाहीं. ज्या दुष्टानं तुह्मांला व मला छळिलं आहे, त्यानंच माझ्या बाबांसहि हतभागी बनविलं आहे. इतकंच नाहीं, तर तो बाबांच्या मृत्यूबद्दल कांहींतरी कृष्णकारस्थान रचित आहे, असा मला बळकट संशय आहे."

महाश्वेता विस्मित होऊन ह्मणाली "ह्मणजे? सतीशचंद्राखेरीज दुसरंच कुणी या गोष्टीच्या मुळाशीं आहे?"

विमला ह्मणाली "वर चला, ह्मणजे मी तुह्मांला सगळा खराखरा प्रकार निवेदन करिल्यें."

त्या तिघीजणी त्या भयंकर घरांतून बाहेर निघाल्या. विमला सरलेचा हात धरून आपल्या धाकट्या बहिणीप्रमाणें प्रेमानें गोष्टी बोलतबोलत तिला वर घेऊन गेली. दुपारीं सर्वांचें जेवणखाण आटोपल्यावर विमलेनें महाश्वेतेस राक्षसशकुनीची सगळी आद्योपांत हकीगत सांगितली.

## प्रकरण २१ वें.

## हें स्वप्न नव्हे—पूर्वस्मृति.

Wall of my Sires, if ye could speak,
If ye could have a tongue,
Save by the owlet's awful shriek,
Or raven's uncouth song,
Fain would I ask of days gone by,
And o'er each tale would heave a sigh.

*J. C. Dutt.*

पृथ्वीवर अशीं कांहीं मनुष्यें आहेत कीं, त्यांचें मुख दृष्टीस पडतांच निर्दयाच्या हृदयांतहि दयेचा पाझर फुटतो; निष्प्रेम्याच्या अंतःकरणांतहि प्रेम उत्पन्न होतें; सर्वांच्या अंतःकरणांत स्नेहाचा प्रादुर्भाव होतो. त्या मनुष्याच्या मुखावरील सौंदर्यामुळेंच केवळ असें होतें असें नाहीं; कारण केवळ सौंदर्य सर्वांचीं अंतःकरणें सारखींच आकर्षण करूं शकत नाहीं. विनय, लज्जा, सरलता यांचा सौंदर्याबरोबर मिलाफ व्हावा लागतो. कित्येकांची सरलता आणि नम्रता पाहून त्याच्याकडे जीव ओढतो, त्यांच्या संतोषार्थ या जगाचा—या संसाराचादेखील त्याग करण्यास मन तयार होतें; त्यांचें सुखसाधन हेंच व्रत स्वीकारावें असें वाटूं लागतें. सरला कांहीं मोठीशी सौंदर्यसंपन्न नव्हती; परंतु तिच्या मुखावर असाच कांहीं अनिर्वचनीय भाव होता, आणि त्याचप्रमाणें तिचें अंतःकरणहि तिच्या मुद्रेचें केवळ प्रतिबिंब होतें. तेव्हां अल्प काळांत विमला तिच्यावर अगदीं धाकट्या बहिणीप्रमाणें प्रेम करूं लागली, यांत कांहीं आश्चर्य नव्हतें.

आणखी एक प्रकारचीं मनुष्यें असतात. त्यांनां निरुपम सौंदर्यानें विभूषित करण्यासाठीं प्रकृति जणों आपलें भांडार शून्य करित असते. उज्ज्वल मुखमंडल, तेजःपुंज नेत्र, सूक्ष्म ओष्ठ, उन्नत ललाट, चित्राप्रमाणें रेखलेल्या भ्रुकुटी, सुकुमार शरीर, सुगठित, सुदीर्घ अवयव पाहून

हृदयांत प्रेमाचा संचार होण्याच्या पूर्वींच भक्तीचा—पूज्यबुद्धीचा—उदय होतो. उज्ज्वल नेत्र, उन्नत—प्रशस्त ललाट हीं हृदयांतील उन्नतभाव प्रगट करित असतात—हृदयांतील दृढनिश्चयाची साक्ष देत असतात. विमलेचें सौंदर्य अशा प्रकारचें होतें. तिचेंहि मुख तिच्या अंतःकरणाचें प्रतिबिंब होतें. अशा प्रकारची ही अलौकिक प्रतिमा पाहून सरला तिच्यावर ज्येष्ठ भगिनीप्रमाणें भक्ति करूं लागली, यांतहि कांहीं आश्चर्य नव्हतें.

सरलेचें मन रिझविण्याकरितां विमला हळुहळू तिला संपूर्ण दुर्ग दाखवूं लागली. दुर्गाच्या मागील उद्यानांत ती प्रथम तिला घेऊन गेली. आम्रवृक्षांच्या दाट छायेमुळें ऐन दोनप्रहरचा समयहि त्या स्थळीं संध्याकाळाप्रमाणें भास[illegible] होता. दोघीजणी क्षणभर त्या गार छायेंत बसल्या. दोन प्रहरच्य[illegible]ऱ्यनें लहानलहान पानांतून मंजुळ शब्द निघत होता; [illegible] पक्ष्याचाहि मृदु, गोड शब्द ऐकूं येत होता. त्य[illegible] मोहित होऊन शांतरसानें परिपूर्ण होत होतें.

[illegible] उद्यानां[illegible] [illegible]ार त्या दोघीजणी सरोवराजवळ गेल्या. चोहों [illegible]ला असलेल्या आम्रवृक्षांची दाट छाया सरोवराच्या विस्तीर्ण जलपृष्ठावर पसरली होती. बराच वेळ दोघीजणी त्या सरोवराच्या कांठावर बसून राहिल्या. प्रकृतीचें तें निस्तब्ध सौंदर्य पहातांपहातां दोघींचेंहि हृदय निस्तब्ध झालें. विमला मधूनमधून बोलत होती परंतु सरलेच्या मुखावाटे शब्द निघत नव्हता; स्तब्ध राहून ती ऐकत होती..

दाट आम्रवृक्षांनीं वेष्टिलेल्या त्या सरोवरावर सूर्यास्ताच्या कितीतरी अगोदरपासूनच अंधकार पडूं लागला. आपल्या मैत्रिणीचें अंतःकरणहि कोणत्यातरी दुःखतिमिरानें आवृत झालें होतें हें विमलेच्या तेव्हांच ध्यानांत आलें. विमलेनें मोठ्या स्नेहानें सरलेला आपल्याजवळ

९

बसविलें आणि तिचा हात आपल्या हातांत धरून ती मृदुस्वरानें ह्मणाली "गडे, सरले! तुझ्या मनाला कांहींतरी दुःख होत आहे. मजजवळून लपवून कां बरं ठेवत्येस?"

"तुझ्याजवळ कशाला लपवूं ताई! खरोखर, मला आज कसंसंच वाटत आहे; परंतु असं कां व्हावं, तें कांहीं मला समजत नाहीं." सरलेनें खिन्न स्वरानें उत्तर दिलें.

"तरमग, कसलीतरी चिंता लागली आहे तुला?"

"कांही सांगवत नाहीं. चिंता कसली असणार? राहूनराहून माझं मन कसंसंच होत आहे."

सरलेचें ह्मणणें अगदीं खरें होतें. मन असें चंचल कां झालें होतें, हें तिला खरोखरच समजत नव्हतें.

संध्याकाळ झाली. विमला आणि [illegible] द्यानांतून पुन्हा दुर्गांत आल्या. मग विमला आपल्या [illegible] तील एकएका खोलींत नेऊन नानातऱ्हेचे मौल्यवान् [illegible] र्थ दाखवूं लागली. शेवटीं ती तिला आपल्या शयनमंदिरांत [illegible] तेथें एका सुंदर पिंजऱ्यांत एक मैना होती. ती हुबेहुब म[illegible] गेलत असे. सरलेची करमणूक व्हावी ह्मणून विमलेनें [illegible] या पिंजऱ्याजवळ नेऊन मैनेला विचारिलें "सांग पाहूं, ही [illegible]"

"ही कोण?" मैना तत्काळ बोलली.

"तूंच सांग, मी कां सांगेन?"

"मी कां सांगेन?"

"तरमग मला वाटतं, तुला माहित नाहीं."

"तुला माहित नाहीं." मैना म्हणाली.

"बरं आतां सांग पाहूं, ही कुठून आली आहे, कीं, इथलीच आहे?"

"इथलीच आहे."

"चल, वेडगळ कुठली!"

"वेडगळ कुठली!"

मैनेचें तें बोलणें ऐकून सरला विस्मित झाली. मी खरोखर येथलीच आहें कीं काय, असा तिला विचार पडला.

मैनेचें ज्ञान किती अगाध होतें, हें विमला पूर्णपणें जाणत होती. आपण जें कांहीं बोलावें त्यांतीलच शेवटचे एकदोन शब्द ती उच्चारित असे.

मैनेची ती गम्मत दाखविल्यावर विमलेनें सरलेला दुसऱ्या एका खोलींत नेलें. त्या खोलीकडे पहातांच सरलेची खिन्नता दुणावली. ती पुन्हा उदास होऊन विचारांत पडल्यासारखी झाली. हें पाहून विमला स्नेहभरानें ह्मणाली "हें काय गडे! पुन्हा कसली तूं चिंता करित आहेस?"

"माझं मन पुन्हा कसंसंच करित आहे. मी जणों कांहीं स्वप्न पहात आहें. आई कुठं आहे?" सरलेचा आवाज कांपरा येऊं लागला. तिच्या डोळ्यांत आंसवें दिसूं लागलीं.

हें पाहून कांहींएक न बोलतां विमला तिला तिच्या आईकडे घेऊन गेली. आईला पहातांच सरलेनें धावत जाऊन तिच्या गळ्यास घट्ट मिठी मारली आणि तिच्या वक्षःस्थलावर मस्तक ठेवून ती अश्रु ढाळूं लागली.

महाश्वेतेनें मोठ्या ममतेनें तिचें मस्तक कुरवाळून स्नेहानें आणि अतिशय उत्सुकतेनें विचारिलें "काय झालं बाळ?"

"आई, या दुर्गांत काय आहे. मला कांहीं समजत नाहीं; परंतु आज सगळा दिवस मी जागृत असून जणूं स्वप्न पहात आहें. इथल्या सर्व वस्तु मीं पूर्वी कधींतरी पाहिल्या असाव्यात, असं मला वाटत आहे. एका खोलींत पाय ठेवतांच एक देवमूर्ति माझ्या दृष्टीस पडली. आई, मी वेडी आहें. मला एकदम असं वाटलं कीं, ती बाबांची मूर्ति! मी मूर्ख आहें ह्मणून मला आपलं असं वाटतं, कीं आई मी खरोखरच स्वप्नांत आहें?"

मुलीचें बोलणें महाश्वेतेच्यानें पुढें ऐकवलें नाहीं. ती उच्चस्वरानें रुदन करूं लागली. त्या अजाण मुलीच्या भाषणानें तिचें हृदय विदीर्ण होऊं लागलें.

शोकाचा पहिला कढ शमल्यावर महाश्वेतेनें कन्येला पुन्हा आलिंगन दिलें आणि ती ह्मणाली "बेटा, हें स्वप्न नाहीं, पूर्वस्मृति तुझ्या हृदयांत जागृत होत आहे. आजवर जी गोष्ट मीं गुप्त ठेविली होती, जी गोष्ट तूं विसरून गेली असशील असें आजवर मी समजत होत्यें, ती गोष्ट आज आपोआप तुझ्या मनांत जागृत होत आहे. आतां तुझ्यापासून कांहीं गुप्त ठेवण्याची आवश्यकता नाहीं."

असें बोलून महाश्वेतेनें आपला इत्थंभूत वृत्तांत तिला सांगितला. सरलेची जन्मकथा, राजा समरसिंहाच्या सन्मानाच्या आणि गौरवाच्या गोष्टी, त्याचा अन्यायानें झालेला वध, आपलें पळून जाणें आणि गुप्त वेशानें रहाणें, इत्यादि सर्व गोष्टी तिनें आपल्या मुलीला उघडउघड सांगितल्या. सरलेला त्या सर्व गोष्टी स्वप्नवत् भासल्या; परंतु क्रमाक्रमानें मोहजाल दूर होऊन मधूनमधून एखाददुसरी गोष्ट तिलाहि आठवूं लागली. हा विशाल दुर्ग, हा विस्तीर्ण दिवाणखाना, हे भव्य खांब पाहून पूर्वस्मृति तिच्या अंतःकरणांत जागृत होऊं लागली.

महाश्वेतेचें कठीण हृदयहि आज द्रव पावूं लागलें. मायलेकी परस्परांनां आलिंगन देऊन रुदन करूं लागल्या.

विमला जवळच बसली होती; परंतु ती दुर्धर चिंतेंत मग्न झाली होती. तिच्या कपाळास आंठ्या पडल्या होत्या व भ्रुकुटी संकुचित झाली होती. वरच्या दांतांनीं आपला खालचा ओंठ तिनें घट्ट दाबून धरला होता. डोळ्यांतून जणों ठिणग्याच पडत होत्या. तिच्या मनांत काय चाललें होतें हें वाचकांनां सहज समजणार आहे. शकुनीच्या दुष्टपणाची मजल कोठवर गेली होती, आपल्या पित्याला त्यानें पापकर्मांत किती लिप्त केलें होतें, महाश्वेतेला कशासाठीं कैदेंत ठेविलें होतें, या एकंदर विचारांनीं तिचें अंतःकरण व्यथित होऊन जर्जर झालें होतें.

या चिंतास्वप्नांतून अकस्मात् जागृत होऊन विमला गंभीर स्वरानें ह्मणाली "आई! त्या चांडाळ शकुनीच्या दुष्टपणाचं स्वरूप इतक्या दिवसांनीं आज मला पूर्णपणं समजून आलं. या संपूर्ण जगांत त्याच्या-सारखा दुष्ट, पातकी दुसरा असेल असं वाटत नाहीं. फार तर काय, पण रौरव नरकांतदिखील त्याच्यासारखा कीटक नसेल. परंतु आई, त्या जगदीश्वराला डोळे आहेत. या भयंकर पातकाबद्दल प्रायश्चित्तहि तसेंच मिळाल्याविना रहाणार नाहीं."

विमलेचे हे गंभीर शब्द ऐकून महाश्वेता ह्मणाली "बेटा, त्या सर्वसाक्षी परमेश्वरावर माझी अढळ भक्ति आहे; परंतु त्याचा हेतु, त्याची लीला आमच्या बुद्धीला अगम्य आहेत. नाहींपेक्षां या जगांत पाप्याचा जय कसा बरं झालेला दिसतो?"

विमला पूर्ववत् गंभीर स्वरानें ह्मणाली "आई! माझ्या बोलण्यावर लक्ष्य टेवा. पापाचा जय झाला तरी तो क्षणिक; पापाच्या भयंकर प्रायश्चित्ताला विलंब लागत नाहीं. त्या दुष्ट चांडाळाला मृत्युरूपी प्रायश्चित्त भोगण्याचा समय आतां नजीक आलेला दिसत आहे. आपल्या पतीच्या वधाबद्दलच्या प्रतिहिंसेला आतां विलंब नाहीं."

## प्रकरण २२ वें.

## विमलेची निराशा.

Has sorrow thy young days shaded
As clouds o'er the morning fleet?
Too fast have those young days faded
That even in sorrow were sweet?
Does time with his cold wings wither
Each feeling that once was dear?
Come, child of misfortune! come hither,
I'll weep thee tear for tear!

*Moo.*

संध्याकाळीं महाश्वेता शिवपूजेकरितां यमुनातीरीं गेली. शकुनीची या गोष्टीला कांहीं हरकत नव्हती. ज्या दुर्गांत तिची यौवनावस्था, तिचा सौख्याचा काळ गेला होता, जेथें तिनें राजकूलचूडामणी समरसिंह याची राजमहिषी ह्मणून काळ घालविला होता, त्याच दुर्गांत एका बाजूला आज ती हीन, दीन, निराश्रित विधवा बंदिवासांत उपासना करित होती. पूर्वीं यमुना नदी दुर्गाच्या बाजूनें जशी मधुर शब्द करित वहात होती, तशीच आजहि ती वक्रगतीनें वहात होती; त्यांत कांहींएक बदल झाला नव्हता. दूरच्या लहानलहान गांवांतील दिसणाऱ्या झाडांच्या ओळी, दुर्गाच्या पाठीमागच्या बाजूस असणारी आंबराई आणि समोरून दिसणारीं विस्तीर्ण शेतें हीं अद्यापि दिसत होतीं; त्यांत कांहींएक फेरफार झाला नव्हता. परंतु महाश्वेतेच्या जीवनांत आज केवढें भयंकर परिवर्तन झालें होतें? तो तिचा पूर्वीचा गौरव, तें पूर्वीचें ऐश्वर्य आज कोठें आहे? तो दुर्गाधिपति, तो वीरश्रेष्ठ आज कोठें आहे? ग्रीष्म काळांतील प्रचंड वायूच्या तडाख्यांत सांपडलेलीं वाळलेलीं पानें जशीं कोठच्या कोठें उडून जातात, समुद्राच्या अनंत लाटांमध्यें पाण्याचे थेंब ज्याप्रमाणें लीन होतात, तद्वतच या अतीत कालरूपी अनंत सागरांत महाश्वेतेचें तें पूर्ववैभव संपूर्ण लीन झालें होतें.

इकडे विमला सरलेला आपल्या शयनमंदिरांत घेऊन गेली. त्या दोघीहि सख्या बहिणींप्रमाणें एकाच शय्येवर निजल्या. सरलेला पाहिल्या घटकेपासून विमलेच्या मनांत तिजविषयीं प्रेम उत्पन्न झालें होतें. परंतु सरला अशी दीन, निराश्रित होण्याला कारण शकुनी आणि आपला पिता यांची दुष्ट मसलत होय, हें जेव्हां तिला समजलें, तेव्हांपासूनतर तिचें तें प्रेम—तिचा स्नेह द्विगुणित झाला. पित्याच्या घोर पातकाचें क्षालन करण्याचा जर कांहीं उपाय असेल तर तो महाश्वेता आणि सरला या दोघींवर निष्कपट प्रेम करणें व त्यांच्या-विषयीं पराकाष्ठेची काळजी घेणें हाच एक आहे, असें समजून ती मनोभावानें तसें करूं लागली. विमला आणि सरला या आज एकाच शय्येवर निजून किती वेळतरी गोष्टी सांगत होत्या. दोघीहि अल्पवयस्क आणि अविवाहित होत्या. अर्थात् दोघींमध्यें अल्पकाळांतच अतिशय पवित्र स्नेह उत्पन्न झाला.

विमला वारंवार सरलेला त्यांच्या अज्ञातवासाच्या आणि आपत्तीच्या गोष्टी विचारूं लागली. खेडेगांवांतील त्यांच्या रहाणीबद्दल नानातऱ्हेचे प्रश्न विचारूं लागली. सरलेच्या तोंडून त्यांची ती हकीगत ऐकतां ऐकतां विमलेचे डोळे पाण्यानें भरून येऊं लागले. पित्याचीं घोर पापकर्मे ऐकून तिला असह्य वेदना होऊं लागल्या. शकुनीचा दुष्टपणा ऐकून क्रोधानें तिचें शरीर कांपूं लागलें. अत्यंत प्रेमभरानें सरलेस आपल्या दोन्ही बाहूंनीं मिठी मारून विमला वारंवार तिला तिच्या दारिद्र्याच्या, तिच्या आपत्तीच्या, त्या क्षुद्र गांवांत काढलेल्या तिच्या हालाच्या गोष्टी विचारूं लागली. वारंवार आपल्या अश्रूंनीं ती सरलेचे नेत्र, मुखकमल आणि मस्तकावरील केशगुच्छ भिजवूं लागली. विमलेनें विचारिलें "सरले, तुह्मी रुद्रपुरांत होतां तेव्हां तुमची स्नेही मंडळी कोण होती? शेतकऱ्यांच्या बायकांशींच कायती तुमची ओळख असेल नाहीं का?"

"आई कांहीं फारशी कुणाबरोबर बोलतचालत नसे. सारा दिवस बहुधा ती दुर्धर चिंतेंत मग्न असे. सायंकाळचा वेळ उपासनेंत घालवी. गांवांतील एकदोघींशीं माझी ओळख झाली होती. अमला नांवाची एक सधन गृहस्थाची स्त्री होती तिची आणि माझी मात्र मोठी मैत्री होती."

"ती तुझ्यावर प्रेम करी, तुझी कळकळ बाळगी अं!"

"होय. आईखेरीज मला नाहीं वाटत माझ्यावर तिच्याइतकी कुणाची ममता असेलशी. तिची आठवण झाली कीं माझे डोळे भरून येतात."

"सरले, तुमच्यावर किती भयंकर अत्याचार झाला आहे हें मला सांगवतदिखील नाहीं. साध्य असेल तर मीं भिकारीण होऊनहि तुह्मांला तुमच्या पूर्वस्थितीला नेऊन पोहोंचवीन."

"गडे, मी खरोखर सांगत्यें, त्या खेड्यांत त्या तशा अवस्थेंत दिखील आह्मांला कांहीं कष्ट झाले नाहींत; पण आई अहोरात्र काळजी करित असे आणि त्यामुळं मात्र मला अतिशय दुःख होई. माझ्या आईला सुखी कर, एवढीच भिक्षा मला घाल."

"सरले, माझीदिखील तीच इच्छा आहे. प्राण देऊन तुझ्या आईला सुखी करितां आलें तर तसं करण्यासहि मी सिद्ध आहें."

"कां बरं? तुला असाध्य काय आहे? तुझी संपत्ती केवढी! तुझं ऐश्वर्य केवढं! तुझा मान केवढा!"

"तुला माझा सर्व वृत्तांत माहीत नाहीं. तो जर तुला कळला तर मला आपल्यापेक्षांहि दुर्दैवी ह्मणूं लागशील. हें धन, हें ऐश्वर्य, वैभव आतां माझें नव्हे."

"कां बरं?"

"मीं तुला सकाळींच नाहींका सांगितलं कीं तो चांडाळ शकुनी माझ्या पित्याचा प्राण घेऊन हा दुर्ग आणि ही संपूर्ण जमीदारी बळकाविण्याच्या उद्योगांत आहे. बाबांच्या काळजीनं मला रात्रंदिवस

झोंप येत नाहीं. आणि गडे, हें एकच केवळ मला दुःख आहे, असं समजूं नकोस."

"अगबाई! खरंच कीं काय?"

"सरले, तुझ्यापासून मी मुळींच कांहीं लपवूं इच्छित नाहीं. माझ्याशीं लग्न करण्याचा त्या चांडाळाचा बेत आहे. कारण तसं केलं ह्मणजे बाबांच्या पश्चात् हा अनायासं त्यांचा वारस होईल. गडे, मला किनई सांगायलादिखील लाज वाटते, पण त्या चांडाळानं आज कित्येक दिवस माझी याबद्दल पाठ पुरविली आहे. मी कबूल झाल्यें नाहीं तर तो बलात्कारानं माझं पाणिग्रहण करूं पाहील. उद्यां सकाळींच त्या दुष्ट नराधमाची भेट घेण्याचा प्रसंग येणार आहे. सरले, तूंच सांग, आहे का माझ्यासारखी कुणी हतभागिनी?" बोलतांबोलतां विमलेचे डोळे भरून आले.

सरला विस्मित झाली. क्षणभऱ्यानें तिनें विचारिलें "मग उद्यां त्याच्या हातून तूं कशी सुटणार?"

विमला अत्यंत गंभीर स्वरानें म्हणाली "अग, तो जगदीश्वर उद्यां माझी सुटका करील. त्याच्या कृपेमुळं उद्यांचा प्रसंग चुकविण्याची मला आशा आहे. नंतर उद्यां रात्रीं मी बाबांकडे निसटून जाईन; एकंदर बंदोबस्त मीं करून ठेविला आहे. तिथं एकदा गेल्यें कीं या चांडाळाला त्याच्या अघोर पातकाचं प्रायश्चित्त मिळालंच ह्मणून समज. मीं तें सगळं योजून ठेवलं आहे. भगवंता, दीनानाथा! या अबलेला या दुष्कर कार्यांत साह्य हो!"

सरला स्तब्ध राहिली. विमला पुढें ह्मणाली "मुंगेरीस जाऊन बाबांचं रक्षण करीन आणि या पाप्याला त्याच्या पापाबद्दल शासन देववीन. नंतर बाबांची प्रार्थना करून हा दुर्ग तुझ्या आईला परत देववीन. मी बाबांचं अंतःकरण ओळखत्यें. शकुनीचं त्यांच्या अंतःकरणावरील वर्चस्व नाहींसं झालं ह्मणजे ते न्यायाची गोष्ट करण्याला नाकबूल

होणार नाहींत. शिवाय, मुंगेरीस एक वीर पुरुष आहे तोहि मला वाटतं या कामीं मला साह्य करील. इंद्रनाथ, आपलं वचन विसरूं नका!"

'इंद्रनाथ' हें नांव ऐकतांच सरला चपापली. तिचें शरीर एकदम रोमांचित झालें. हें पाहून विमलेला मोठा विस्मय वाटला. तिनें विचारिलें "गडे, तूं असं चमकल्यासारखं काय केलंस? तुला कांहीं होततर नाहींना?"

सरला कांहींच उत्तर देईना. पदरानें तोंड झांकून ती स्तब्ध बसली. शेवटीं विमलेनें अगदीं पराकाष्ठाच केली तेव्हां ती ह्मणाली "इंद्रनाथ या नांवाचे आमच्या ओळखीचे एक गृहस्थ आहेत आणि तेहि पण मुंगेरीसच गेले आहेत."

तीक्ष्णबुद्धीच्या विमलेपासून कोणतीहि गोष्ट मग गुप्त राहिली नाहीं. तिनें हळुहळू एकंदर हकीगत सरलेच्या मुखांतून काढून घेतली. इंद्रनाथ ह्मणजे सरलेचा हृदयेश्वर होऊन राहिला आहे, इंद्रनाथ सरलेच्या पवित्र प्रणयाचा अधिकारी झाला आहे, महाश्वेता आणि सरला यांच्या उद्धारार्थ इंद्रनाथ दोनतीन महिन्यांपूर्वीं मुंगेरीस गेला आहे, तर मग आपण महेश्वराच्या मंदिरांत पाहिलेला इंद्रनाथ तो तोच कीं काय? विमलेचें हृदय कंपित झालें. तिनें हळुहळू आणखी एक गोष्ट विचारिली.

"गडे सरले, त्या वीरश्रेष्ठाच्या शरीराच्या एखाद्या भागावर असलेलं कांहीं विशेष चिन्ह तूं पाहिलं आहेस का?"

"होय, त्यांच्या डाव्या हातावर एक मोठा काळाभोर असा तीळ आहे." सरलेनें उत्तर दिलें.

विमलेचें शरीर रोमांचित झालें. तिनेंहि इंद्रनाथाच्या हातावर चिन्ह पाहिलें होतें.

कांहींएक न बोलतां सरलेकडे पाठ फिरवून विमला निजून राहिली. तिला झोंप लागली असें समजून बालिका सरलाहि झोंपीं गेली.

## प्रकरण २३ वें.

## विवाहाचीं वधुवरें.

"O! Do not tempt," she said,
"O! do not add to my distress,
I have tasted much of bitterness."
* * * * *
But ah, fair maid, thou plead'st in vain,
His heart is proof to prayers,
Albeit like darksome floods of rain
Thou shedst thy scalding tears.

*S. C. Dutt.*

सकाळ झाली. आजचा दिवस विमलेला कितीतरी भयंकर गेला. परंतु भावी संकटांतून सुरक्षितपणें पार पडण्याचा उपाय तिनें आधींच योजून ठेविला होता. प्रातःकाळीं विमला परमेश्वराची प्रार्थना करण्याच्या उद्देशानें आपल्या शयनगृहांतून निघून दुसऱ्या एका खोलींत गेली. पुष्कळ वेळपर्यंत एकाग्र चित्तानें तिची उपासना चालली होती. शुद्ध आणि पवित्र परमेश्वरभक्तीनें तिचें हृदय उचंबळून आलें होतें. डोळ्यांतून अश्रूंचे लोटच्या लोट निघून गालांवरून वहात होते. उपासना आटोपल्यावर विमला खोलीबाहेर आली. पहाते तों शकुनि तिची वाट पहात उभा आहे. शकुनीला पहातांच विमलेच्या पोटांत धस्स झालें. अंगावर शहारे उठले. मुखावरील तेज मावळलें.

शकुनि विमलेकडे स्थिरदृष्टीनें पहात शांतपणें उभा होता. ज्याप्रमाणें एखादा सर्प आपल्या भक्ष्यस्थानीं पडणाऱ्या बेडकाचें अगोदर निरीक्षण करितो, त्याचप्रमाणें शकुनि विमलेचें निरीक्षण करित होता.

विमला भूमीकडे टक लावून पहात निश्चळ उभी राहिली. तिचें हृदय भय आणि क्रोध यांनीं व्यापून गेलें होतें. कांहीं काळानंतर ती करुणस्वरानें ह्मणाली "शकुनि! मी हतभागिनी आहें. माझ्यासारखी हतभागिनी या पृथ्वीच्या पाठीवर दुसरी कुणीहि नसेल. मला आणखी छळून दुःख कां देतोस? मला क्षमा कर."

विमलेच्या त्या करुणवाणीनें पाषाणासहि द्रव आला असता; परंतु शकुनीचें हृदय द्रवलें नाहीं. तो किंचित् हंसून ह्मणाला "यासाठींच मला वाटतें तुला अवकाश पाहिजे होता?"

"शकुनि, मला अवकाश दिलास याबद्दल मी तुझी आभारी आहें; पण मला क्षमा कर. माझ्या हृदयाला जे कष्ट होत आहेत त्यांची तुला कल्पनाहि व्हायची नाहीं! माझं हृदय शतशः विदीर्ण होत आहे. शकुनि, मला क्षमा कर."

"विवाहाच्या पूर्वीं सर्व मुली असेंच म्हणत असतात; सासरीं जातांना सर्व मुली मोठमोठ्यानें रडतात; परंतु एकदा का सासरीं जाऊन राहिल्या ह्मणजे मग माहेरीं परत येण्याची इच्छाहि करित नाहींत!"

"शकुनि, उपहास करूं नकोस. माझ्या हृदयांत असह्य वेदना होत आहेत, मला उपहास रुचत नाहीं."

"मी उपहास करण्यास आलों नाहीं. तूं प्रतिज्ञा केली आहेस ती पाळण्यास कबूल आहेस कीं नाहीं?"

"मीं मुळींच कसली प्रतिज्ञा केली नाहीं."

"नसशील केली; पण मजबरोबर विवाह करण्याला तूं कबूल आहेस कीं नाहीं?"

"जिवांत जीव आहे तोंपर्यंततरी मी कबूल होणार नाहीं."

"ठीक आहे. आतां माझा दोष नाहीं. जबरदस्तीशिवाय आतां दुसरा उपाय राहिला नाहीं."

"बाबा इथं असते तर असं बोलण्याची तुझी प्राज्ञा नव्हती. ते इथं नाहींत, माझं रक्षण करणारा कुणी इथं नाहीं, तेव्हां अशा निराश्रित अबलेवर अत्याचार करणं हा ब्राह्मणाचा धर्म नव्हे."

"मी तुजसारख्या पोरीजवळून ब्राह्मणधर्म शिकण्यास इथें आलों नाहीं, समजलीस?"

"तरी पण मी सांगत्यें तिकडे लक्ष्य दे. माझ्या बाबांनीं तुझ्यावर कितीतरी उपकार केले आहेत. दारिद्र्यावस्थेंतून तुला मुक्त करून पुत्राप्रमाणं तुझं लालनपालन केलं, अद्यापिहि पुत्राप्रमाणं ते तुजवर प्रेम करित असतात, तेव्हां त्यांच्या कन्येवर असा अत्याचार करणं तुला उचित नाहीं."

आपल्या पूर्वीच्या दारिद्र्याची गोष्ट ऐकून शकुनी क्रुद्ध होऊन ह्मणाला "हजारों पापकर्मे करूनहि तुझा बाप आजपर्यंत जिवंत आहे, हा केवळ माझा अनुग्रह, हें तूं विसरलीस वाटतें?"

पित्याची निंदा ऐकून विमलेच्या अंगाचा तिळपापड झाला. नेत्र आरक्त झाले. ती संतापानें ह्मणाली "चांडाळा! तूंच माझ्या बाबांचा सर्वनाश केला आहेस आणि तूंच आतां त्यांची निंदा करतोस? भृत्यवेशानें तूं कुठल्या वेळेला या दुर्गांत पाय ठेवलास तो आज तूं त्याचा प्रभू होऊं पहातोस काय? आपल्या पित्याच्या चाकराबरोबर लग्न करण्याला विमला कधींहि कबूल होणार नाहीं!"

"असें काय?" शकुनी उपरोधिक स्वरानें ह्मणाला. "कुणासमोर तूं हें बोलत आहेस तुला माहीत आहे? तुझें जीवनमरण, तुझ्या पित्याचें जीवनमरण माझ्या हातीं आहे, हें विसरलीस वाटतें?"

विमला तिरस्कारानें म्हणाली "मी कुणासमोर बोलत्यें आहें हें पक्कें जाणून आहें. सतीशचंद्राची कन्या सतीशचंद्राच्या चाकराशीं बोलत आहे. पोटाची खांच भरण्यासाठीं ज्या कंगाल ब्राह्मणपुत्रानं माझ्या पित्याचा आश्रय धरिला—त्याच कृतघ्नाबरोबर मी बोलत आहें!"

विमला मानी स्वभावाची होती. पित्याची निंदा श्रवण करतांच तिचा क्रोधानल भडकला. तिच्या नेत्रांतून ज्वाळा निघूं लागल्या. मोकळे असलेले तिचे केश तिच्या कपाळावर आणि उन्नत वक्षःस्थलावर पडून ती उन्मत्तप्राय दिसत होती. तिची ती क्रोधसंतप्त मुद्रा पाहून शकुनीहि किंचित् भ्याला. क्षणभर स्तब्ध राहिला. इतक्यांत विमला

आपला क्रोध आवरून हळुहळू ह्मणाली-"माझ्या या रागांत कांहीं अर्थ नाहीं. शकुनि, मीं सर्वस्वीं तुझ्या आधीन आहें हें मी जाणून आहें. रागाच्या भरांत मीं व्यर्थ तुझी निर्भर्त्सना केली. बाबांची निंदा मला ऐकवत नाहीं; माझ्यासमक्ष तूं बाबांची निंदा करूं नकोस."

"विमले, मी तुझ्या बापाची निंदा करण्यास इथें आलों नाहीं. तुझ्या बापानें मजवर जे अगणित उपकार केले आहेत तेहि मी विसरलों नाहीं. सध्या मी ज्याकरितां इथें आलों आहें, त्याबद्दल तुझें ह्मणणें काय आहे तें सांग."

"माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंततरी तुझ्याशीं लग्न करण्यास मी कबूल होणार नाहीं."

"विमले, तूं मोठी चतुर आहेस. माझ्या हृदयांत दया, क्रोध, दुःख इत्यादि नानारूप विकार उत्पन्न करून तूं मला माझ्या मनकामनेपासून विन्मुख करूं पहात आहेस; पण विमले, त्यांत तुला यश येणार नाहीं. एकवार जी गोष्ट करण्याचा मीं निर्धार केला, ती करण्याला प्रत्यक्ष ब्रह्मदेव आडवा आला तरीहि मग मी माघार घेणार नाहीं. तूं यःकश्चित् मुलगी, तूं आजवर या शकुनीला आपले मनोरथ पूर्ण करूं दिले नाहींस. तेव्हां तुझ्या बुद्धीची आणि तुझ्या दृढ निश्चयाची प्रशंसा करावी तितकी थोडीच आहे. पण आतां हे लपंडाव चालायचे नाहींत. आजच्या आज तुझ्याबरोबर मी लग्न लावून घेणार. मीं सर्व सिद्धता करून टेविली आहे. तूं गोडीगुलाबीनें कबूल झाली नांहींस तर बलात्कारानें मी तुझें पाणिग्रहण करीन. मग उगाच कां हट्ट धरून बसतेस? चल, आपण दोघें बरोबर खालीं जाऊं."

शकुनीचे ते शब्द कानीं पडतांच विमला क्षणभर ज्ञानशून्य झाली. तिचा दृढ निश्चयहि जणों क्षणभर तिला सोडून गेला. एखाद्या अज्ञान अर्भकाप्रमाणें ती रडूं लागली आणि ह्मणाली "बाबा, मला वांचवाहो या संकटांतून."

"बाबा राहिले मुंगेरीस. तुझ्या या रडण्याचा कांहीं उपयोग नाहीं."

"तरमग जगत्पिता परमेश्वर या अबलेचं रक्षण करील." असें बोलून विमला हात जोडून करुण दृष्टीनें वेड्यासारखी आकाशाकडे पाहूं लागली. केशराशीनें तिचें मुखकमल आणि वक्षःस्थल आवृत झालें होतें. अंगावरील वस्त्र किंचित् सरलें होतें. डोळे पाण्यानें भरून आले होते आणि ते दिव्य तेजानें चमकत होते. उन्मत्ताप्रमाणें ऊर्ध्व दृष्टी करून, करुणाव्यंजक स्वरानें विमला म्हणाली "हे दीनानाथा! या अबलेवर दया कर, या संकटसमयीं इला साह्य हो."

विमलेची ती मूर्ति पाहून शकुनि तटस्थ उभा राहिला. एकाग्र दृष्टीनें त्या अपूर्व सौंदर्यराशीकडे तो पहात होता. विमला हळुहळू ह्मणाली "शकुनि, तूं परमेश्वराचं भय बाळग; या जगांत तूं इतकीं पातकं केलीं आहेस कीं, त्या जगदीश्वराचं तुला भय वाटलंच पाहिजे. त्या जगत्पित्याच्या पवित्र नांवाचं उच्चारण करून मी सांगत्यें कीं, तूं मला बंधूसारखा आहेस, मी तुला बहिणीसारखी आहें. तूं मला पुत्राप्रमाणं आहेस, मी तुला आईप्रमाणं आहें. माझ्याबरोबर लग्न करण्याचा हेतु सोडून दे."

जगदीश्वराचें पवित्र नांव ऐकतांच कोणत्या पाप्याचें हृदय कंपित होणार नाहीं? शकुनीला तें मुळींच सहन झालें नाहीं. तो ह्मणाला "हतभागिनी! नष्टबुद्धे! पहातों आतां कोण तुला साह्य करतो तें? एक घटकेचा तुला अवकाश देतों; आणखी एका घटकेनें हें कार्य उरकून घेतलें जाईल."

घटकाभर एकांतांत बसून विमला विचार करूं लागली. तिच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वहात होत्या. परंतु रडत बसण्याचा हा वेळ नव्हे असा विचार करून तिनें आपलें मन घट्ट केलें, आणि कित्येक दिवसांपासून योजून ठेवलेला बेत आज सिद्धीस न्यावयाचा, असा त्या चतुर विमलेनें पक्का निश्चय केला.

घटका भरतांच शकुनी पुन्हा दत्त ह्मणून तिच्यापुढें येऊन उभा राहिला. क्रोधाचें यत्किंचित्हि चिन्ह न दाखवितां विमला शांतपणें ह्मणाली "शकुनि, माझ्या अदृष्टांत लिहिलं असेल तें कांहीं चुकवितां यायचं नाहीं. तुझी पत्नी होण्यासाठींच जर ईश्वरानं मला निर्माण केली असेल, तर तसंच होणार; मीं कितीहि हट्ट घेतला ह्मणून काय होणार आहे ! दैवाच्यापुढं कांहीं मला जातां यायचं नाहीं."

शकुनीच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. तो मोठमोठ्यानें हंसूं लागला. मोठ्या खुषींत येऊन त्यानें विमलेचा हात आपल्या हातांत धरिला. विमलेनें त्याला हरकत केली नाहीं. ती पुन्हा शांतस्वरानें ह्मणाली "शकुनी, माझं एक मागणं आहे. बाबा सुरक्षितपणं घरीं यावे ह्मणून मी कांहीं व्रत करित आहें. आणखी तीन दिवसांनीं त्या व्रताची समाप्ति होईल. कृपा करून या तीन दिवसांचा मला अवकाश द्या; ही माझी विनंति अमान्य करूं नका. शकुनि, या व्रताचं उद्यापन झाल्याविना मी विवाह करणार नाहीं. तुह्मी जबरदस्ती करूं पहाल तर मी आत्मघात करीन. तुह्मांला माझी प्राप्ति मुळींच व्हायची नाहीं."

बराच वेळ विचार करून शेवटीं निरुपायास्तव शकुनीनें विमलेला आणखी तीन दिवसांचा अवकाश दिला.

बुद्धिमती विमलेनें दुर्गांतून पळून जाण्याचा सर्व बंदोबस्त अगोदरच करून ठेविला होता. आपल्या विश्वासांतील एका परिचारिकेच्या द्वारें दुर्गाबाहेर एक कोसावर एक नाव आणवून ठेविली होती. प्रहर रात्रीच्या सुमारास महाश्वेता आणि सरला यांनां अनेक प्रकारें आश्वासन देऊन आपल्याबरोबर कित्येक चाकर व परिचारिका घेऊन विमला दुर्गाबाहेर पडली. एक कोसभर पायींच जाऊन ती त्या नौकेंत बसली. नौका तत्क्षणीं चालू झाली.

## प्रकरण २४ वें.

## पलायन.

And shall my life in one sad tenour run,
And end in sorrow as it first begun.

*Pope.*

वरती अफाट, निळें आणि स्वच्छ आकाश; चोहोंकडे धान्यांचीं शेतें आणि लहानलहान खेडींपाडीं; तींहि निद्रिस्त आणि निस्तब्ध; त्यांच्यामधून वर्षाऋतूमध्यें अफाट झालेल्या आणि मोठ्या वेगानें वहाणाऱ्या त्या नदीच्या पृष्ठावरून ती लहानशी परंतु चपळ नौका झपाट्यानें चालली होती. नौकेंत एकहि दिवा नव्हता. फार काय, पण तींतून कशाहि प्रकारचा शब्ददेखील ऐकूं येत नव्हता. पृथ्वी-प्रमाणेंच आकाशहि अंधकारमय आणि निःशब्द झालें होतें.

आकाश अंधकारानें व्यापून गेलें होतें. मागेंपुढें कोठेंहि नजर टाकली तरी एकसारख्या वहाणाऱ्या नदीच्या पाण्याशिवाय कांहींहि दिसत नव्हतें. आकाशांत एकावर एक उठणाऱ्या काळ्याकुट्ट मेघांचीं प्रतिबिंबें त्या नीळसर पाण्यांत पडत होतीं. वाऱ्याच्या झुळकेबरोबर नदीच्या पाण्याला तरंग येत होते. त्या तरंगांतून आणि फेंसाच्या राशींतून ती नौका सरसर शब्द करित चालली होती. नदीच्या दोन्ही तीरांवर कोठें निशाचरसमूहाप्रमाणें त्या घोर अंधकारांत उभे राहून आम्रवृक्ष वाऱ्यामुळें गंभीर शब्द करित होते, तर कोठें पांढरी शुभ्र वाळु दूरवर पसरली होती. आकाशांत एखाददुसरा तारा मधूनमधून चमकत होता. काळेकुट्ट ढग एकामागून एक उठून पश्चिम दिशेकडे पळत सुटले होते.

नौकेच्या एका टोंकावर बसून विमला त्या चतुर्वेष्टित दुर्गाकडे पहात होती. पहातांपहातां तिच्या अंतःकरणांत जे विचारतरंग उठत होते, ते सांगतां येत नाहींत. सहा वर्षें ज्या दुर्गांत तिनें घालविलीं होतीं, तिच्या प्रिय जननीचा दुःखद मृत्यु ज्या दुर्गांत झाला होता, बाल्यावस्था जाऊन ज्या दुर्गांत तिला यौवनावस्था प्राप्त झाली होती,

त्या दुर्गाचा त्याग करून आज तिनें दुस्तर संसारसागरांत उडी घेतली होती! या सागराला किनारा असेल काय? विमलेच्या हातीं तो किनारा लागेल काय? त्या निराश्रित मुलीला तिचा पिता पुन्हा भेटेल काय? महाश्वेता आणि सरला यांची मुक्तता होईल काय? चांडाळ शकुनीला त्याच्या पापाचें प्रायश्चित्त देण्याचा सुयोग येईल काय?' इत्यादि अनंत विचारतरंग तिच्या अंतःकरणांत उठत होते.

स्वदेश सोडून अनेक दिवसांच्या प्रवासाला निघण्याचा अनुभव ज्यांनीं घेतला असेल, नौकेंत बसून मातृभूमीकडे ज्यांनीं सतृष्ण नेत्रांनीं पाहिलें असेल, या पृथ्वींतील प्रिय सुहृदांचा आणि सुखकर वस्तूंचा सजल नेत्रांनीं निरोप घेण्याचा प्रसंग ज्यांच्यावर आला असेल, अल्पवयांतच निराश्रित होऊन घरदार सोडून या अफाट संसारसागरांत उडी टाकण्याचा ज्यांच्यावर प्रसंग आला असेल, त्यांनांच विमलेच्या त्या रात्रीच्या दुर्धर विचारांची आणि दुःसह दुःखाची कल्पना करितां येईल. एकटीच नौकेच्या पश्चाद्भागीं बसून त्या गंभीर अंधकारांत त्या चतुर्वेष्टित दुर्गाकडे ती पहात होती. नदीचा कलकल शब्द तिला ऐकूं येत नव्हता. आकाशांत उठणारे अनेक प्रचंड मेघ तिला दिसत नव्हते. केवळ त्या चतुर्वेष्टित दुर्गाकडे तिची दृष्टि वेधली होती. सहस्रावधि विचारतरंग तिच्या अंतःकरणांत उठत होते. त्या विचारांनां सीमाच नव्हती! वर असणाऱ्या आकाशाप्रमाणें ते अनंत होते. खालीं वहाणाऱ्या नदीप्रमाणें ते अप्रतिबंध होते. विचार करतांकरतां शेवटीं विमलेला चाऱ्ही दिशा शून्य दिसूं लागल्या. तिचें नैसर्गिक वीरहृदय द्रवूं लागलें. पहातांपहातां शेवटीं जेव्हां तो दुर्ग दिसेनासा झाला, केवळ काळाकुट्ट अंधकारच दिसूं लागला, तेव्हां दोन्ही हातांनीं आपलें मुखकमल झांकून घेऊन ती अविरल अश्रुधारा विसर्जन करूं लागली. बोटांतून बाहेर पडणाऱ्या त्या अश्रूंनीं तिचे बाहु आणि वक्षःस्थल हीं भिजून गेलीं. अखेरीस थकवा येऊन तिचा डोळा लागला.

## प्रकरण २५ वें.

## मित्रस्मरण.

Alas! they had been friends in youth!

*Coleridge.*

इंद्रनाथ राजा तोडरमल्लांच्या सैन्यांत राहिल्याला कित्येक महिने झाले. दिवसेंदिवस युद्धकलेंत तो निपुण होऊन त्याची मोठी ख्याति होत चालली. भागलपूर येथें बंडखोरांचा जमाव झाला होता; त्यामुळें भागलपूर आणि मुंगेरी यांच्या दरम्यान नेहमीं चकमकी उडत असत.

एके दिवशीं बंडखोरांनीं सूर्योदयापासून तों सूर्यास्तापर्यंत तोडरमल्लांच्या दुर्गांत प्रवेश करण्यासाठीं धडपड चालविली. परंतु तोडरमल्लांनां त्यांचा हा हेतु अगोदरच समजला असल्यामुळें त्यांच्या त्या धडपडीचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. दुर्गावरील प्रत्येक माऱ्याच्या जागीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत स्वतः जाऊन तोडरमल्लांनीं देखरेख ठेविली. त्यांच्या उत्साहानें, त्यांच्या बुद्धिबलानें, त्यांच्या युद्धकौशल्यानें त्यांच्या एकंदर सैन्याला उत्साह येऊन त्यांनीं प्रत्येक हल्ल्यांत शत्रूंचा पराजय करून त्यांला मागें पळवून लाविलें. इंद्रनाथाचें साहस आणि युद्धोत्साह पाहून अगोदरच तोडरमल्ल त्याच्यावर संतुष्ट झाले होते; परंतु आजच्या लढाईंत त्यानें पुनःपुन जें असाधारण साहस दाखविलें, शत्रूंचे निकराचे हल्ले परत लावण्यांत जें विलक्षण युद्धकौशल्य प्रगट केलें, त्यानेंतर राजा तोडरमल्ल यांच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. सूर्यास्त होऊन अंधकार पडतांच शत्रूंनीं हतवीर्य होऊन भागलपुरचा रस्ता सुधारला.

याप्रमाणें लढाई आटोपल्यावर इंद्रनाथ सेनापतींनां भेटावयास आला. तोडरमल्ल त्यावेळीं एकटेच विश्रांति घेत होते. इंद्रनाथाला त्यांनीं तत्काळ आंत बोलाविलें.

इंद्रनाथाचें आजचें साहस व शौर्य पाहून तोडरमल्लांचें मन प्रफुल्ल झालें होतें. त्या तरुण योद्ध्याला आदरानें आपल्या जवळ बसवून राजे

मोठ्या प्रेमानें त्याच्याशीं संभाषण करूं लागले. त्या दोघांशिवाय त्यावेळीं तेथें कोणीहि नव्हतें. तोडरमल्ल प्रसन्न मुद्रेनें ह्मणाले "इंद्रनाथ, आजचा तुमचा पराक्रम पाहून मी फार संतुष्ट झालों. आज कित्येक प्रसंगींतर तुह्मीं आपला जीवहि धोक्यांत घातला होता."

"महाराज," इंद्रनाथ नम्रस्वरानें ह्मणाला "ज्या दिवशीं सैन्यांत शिरलों, त्याच दिवशीं राजकार्याला हा प्राण अर्पण केला आहे; आजच्या लढाईतून मी जिवंत परत आलों, तो केवळ आपल्या आशीर्वादानें आणि बाबांच्या पुण्यबळानें."

"घरीं तुमचे वडील आहेत तर मग ?"

"होय महाराज."

"तुम्हांला भाऊबहिणी किती आहेत ?"

"मला एक वडील भाऊ होता, परंतु दुर्दैवानें तो वारला. आत बाबांनां संतती ह्मणजे काय तो मी एकटा."

हें ऐकून तोडरमल्लांची चर्या गंभीर झाली. ते म्हणाले "या युद्धांत तुम्ही पतन पावलां तर तुमच्या पित्याला किती दुःख होईल! मलाहि पुत्र आहे आणि म्हणूनच माझ्या अंतःकरणांत हे विचार येतात. माझा धारू वयानें तुमच्याच बरोबरीचा असून तुमच्यासारखाच साहसी, तुमच्यासारखाच संकटांनां तुच्छ मानणारा, मृत्यूलाहि न भिणारा आहे. तो युद्धांत पडला तर त्याच्या या पित्याच्या हृदयावर वज्राघात होईल. परंतु इंद्रनाथ, राजकार्यांत मरण्यापेक्षां अधिक इष्ट काय आहे ? सार्वभौम अकबर बादशहाच्या सेवेला आह्मीं उभयतां पितापुत्रांनीं वाहून घेतलें आहे; त्यांत आमचा प्राण गेला तरी बेहत्तर !"

"परमेश्वर दिवस असा न आणो! महाराजांनीं दीर्घायु होऊन दिल्लीश्वराचीं अनेक कार्यें सिद्धीस न्यावीं. महाराजांचा मोठा गौरव होऊन सर्वत्र वहावा व्हावी. या भारतवर्षांत आह्मां हिंदुलोकांत आपल्यासारखे

कीर्तीनें दुमदुमणारें नांव दुसरें कोणाचेंहि नाहीं! आपल्यासारखीं धन्यतेचीं कामें कोणाच्याहि हातून घडून आलीं नाहींत."

"अहो, तुम्हांला माहित नाहींसें दिसतें? यापेक्षांहि गौरवाचें आणि धन्यतेचें कार्य घडवून आणण्यांत माझ्या एका जिवलग मित्रानें आपले प्राण खर्च केले आहेत." इतकें बोलून तोडरमल्लांनीं एक दीर्घ निःश्वास सोडला.

इंद्रनाथ स्तब्ध राहिला. तोडरमल्ल पुढें सांगूं लागले "इंद्रनाथ, आजचा दिवस ह्मटला ह्मणजे कितीतरी आनंदाचा आहे! आज आपण शत्रूंचा जो पराजय केला आहे, तो ऐकून दिल्लीश्वर अतिशय संतुष्ट होईल. परंतु या आनंदाच्या प्रसंगीं एक दुःखाची गोष्ट मनांत येते. याच महिन्यांत—अगदीं याच दिवशीं, माझ्या बाल्यावस्थेपासूनच्या एका परमप्रिय मित्रानें आपले प्राण धारातीर्थीं वाहिले. त्या दुःखद गोष्टीला आज बरोबर बारा वर्षे झालीं."

"तो महात्माहि मला वाटतें महान् योद्धा होता; दिल्लीश्वराच्या कार्याला मला वाटतें त्यानेंहि स्वताला वाहून घेतलें होतें."

"लहानपणापासून त्याचा युद्धाखेरीज दुसरा व्यवसाय नव्हता; परंतु दिल्लीश्वराच्या कार्यासाठीं त्यानें प्राण वेंचले नाहींत; दिल्लीश्वराच्या विरुद्ध लढूनलढून त्यानें धारातीर्थीं शयन केलें." तोडरमल्ल मोठ्या आवेशानें आपल्या मित्राचें शौर्य वर्णन करित होते.

हा वृत्तांत ऐकून इंद्रनाथ चकितच झाला. हें पाहून तोडरमल्ल हास्य करून ह्मणाले "दिल्लीश्वराच्या या वृद्ध सेवकाच्या तोंडून दिल्लीश्वराच्या कट्टया शत्रूची प्रशंसा ऐकून तुह्मी चकित झालां! परंतु तुह्मी स्वता कधीं दिल्लीस गेलां आणि खुद्द अकबर बादशहाच्या तोंडून त्याचा कट्टा शत्रु राणा प्रतापसिंह याची प्रशंसा ऐकलीत ह्मणजे तर मला वाटतें, तुह्मी आणखीहि चकित व्हाल! इंद्रनाथ, अकबराच्या सेवेंत माझा जन्म गेला आहे; अकबराचे शत्रु ते माझेहि शत्रूच असें

मी समजतों; परंतु साहस, शौर्य, युद्धकौशल्य आणि स्वदेशप्रीति हीं दृष्टोत्पत्तीस आलीं ह्मणजे तो शत्रु असो वा मित्र असो, तो प्रशंसेला पात्रच होतो; शत्रु आणि मित्र हा भेदभाव मग तेथें रहात नाहीं. मातृभूमीच्या स्वातंत्र्यरक्षणासाठीं प्राणांचीहि पर्वा न करितां गिरिकंदरांत वास करून मरुभूमींत प्रतापसिंह वर्षानुवर्ष अकबर बादशाहाच्या प्रचंड सेनेशीं लढत राहिला. प्रतापसिंहाचें हें अलौकिक शौर्य आणि साहस पाहून स्वता अकबर बादशहाहि विस्मित आणि आनंदित झाला आहे. चार वर्षांमागें हळदी घाटांत झालेल्या युद्धांत प्रतापसिंहाचें असंख्य सैन्य नष्ट झालें; त्यानंतर कितीतरी किल्ले, कितीतरी प्रदेश, केवढी मोठी संपत्ति–सर्व कांहीं नष्ट झालें; परंतु त्याचें तेज, त्याचें साहस, त्याची कर्तव्यतत्परता हीं कमी झालीं नाहींत. त्याची प्रतिज्ञा अद्यापिहि अढळ आहे. गिरिकंदरांत वास करणारा प्रतापसिंह स्वदेशासाठीं अद्यापिहि लढत आहे. जिवांत जीव आहे तोंपर्यंत तो तसाच लढत राहील. शत्रु असो वा मित्र असो, भारतवर्षांत असा एकहि हिंदु किंवा मुसलमान नाहीं कीं जो प्रतापसिंहाचे धन्यवाद गाणार नाहीं. भारतवर्ष आज प्रतापसिंहाच्या यशोदुंदुभींनीं दुमदुमून राहिलें आहे."

हा वृत्तांत ऐकून इंद्रनाथाचें हृदय उत्साहपूर्ण झालें. तो तटस्थ झाला. तोडरमल्ल आस्तेआस्ते पुढें बोलूं लागले "पण आज माझा विचार प्रतापसिंहाबद्दलचा नाहीं. बारा वर्षें झालीं, ज्यानें त्याच मेवाडची राजधानी जें चितोर शहर त्याचें रक्षण करण्यांत आपले प्राण खर्चीं घातले, अशा दुसऱ्या एका महान् योद्ध्याचें मला स्मरण होत आहे. इंद्रनाथ ! आज तुमचा पराक्रम पाहून मी तुष्ट झालों आहें. त्यामुळें जें मीं इतर कोणास सांगितलें नसतें तें विश्वासानें तुह्मांला सांगत आहें. थोडीशी हकीगत ऐका.

"माझ्या तारुण्यास नुक्ताच आरंभ झाला होता अशा वेळीं मी एकवार मेवाडांत फिरावयाला गेलों होतों. तेथें रानडुकरांच्या शिकारींत

एकदा माझ्या प्राणांवर वेळ आली होती. परंतु एका असाधारण शूर योद्ध्यानें आपला भाला असा कांहीं अचूक नेम धरून मारला कीं त्यानें तो डुकर अचानक खालीं आला आणि माझे प्राण वांचले. तो असाधारण शूर योद्धा दुसरा कोणी नसून सूर्यमहाल दुर्गाचा तिलकसिंह होता.

"क्रमाक्रमानें तिलकसिंहाचा आणि माझा फार स्नेह जमला. तेव्हां त्याचे एकएक असाधारण गुण माझ्या प्रत्ययास येऊं लागले. त्याचाहि उत्तरोत्तर माझ्यावर अत्यंत लोभ जडत चालला व पुढेंपुढेंतर आह्मी सख्या बंधूंप्रमाणें एकमेकांनां मानूं लागलों.

"आजन्म टिकणारें बंधुत्व एकवारच जुळून येतें; पुनःपुनः तें जुळत नाहीं. इंद्रनाथ! स्त्रियांच्या प्रेमाच्या गोष्टी तुह्मीं अनेक वाचल्या असतील, त्याचप्रमाणें अनेक ऐकल्याहि असतील; परंतु तारुण्यांत दोन सरळस्वभावी, उत्साहपूर्ण पुरुषांमध्यें जें प्रेम निर्माण होतें, तसें अकृत्रिम प्रेम या जगांत दुसरें मला माहित नाहीं.

"पुढें जेव्हां मीं दिल्लीश्वराचें कार्य करण्याचें व्रत स्वीकारलें तेव्हां तिलकसिंहानेंहि हें व्रत स्वीकारावें ह्मणून मीं प्रयत्न केले. त्याच्यासारखा रणपंडित आणि असाधारण शूर योद्धा जर का दिल्लीश्वराचें कार्य शिरावर घेता, तर आज दिल्लीश्वराच्या प्रत्येक सेनापतीला त्याला गुरु ह्मणून वंदनच करावें लागलें असतें. इतक्या अवधींत केव्हांच तो बंगदेशाचा किंवा दक्षिणेचा अधिकारी होऊन बसला असता.

"परंतु तिलकसिंहानें तें व्रत स्वीकारलें नाहीं. त्यानें माझ्या ह्मणण्यास जें उत्तर दिलें तें हा वेळपर्यंत माझ्या हृदयावर कोरल्याप्रमाणें राहिलें आहे. तो ह्मणाला 'माझ्या बापानें, माझ्या आजानें, माझ्या पणजानें मेवाडच्या राण्याच्या सेवेंत जन्म घालविला आहे आणि मीहि तेंच करणार आहें. दिल्लीश्वर मेवाडचा कट्टा शत्रु, त्याचा मला संपर्कहि नको! परंतु मी असें ऐकतों कीं, चितोडावर आपली सत्ता स्थापन करण्याचा

अकबराचा उद्योग चालला आहे; तेव्हां त्यासाठीं तो चितोडास आलाच तर तिलकसिंहाची आणि त्याची एक दिवस गांठ पडेलच!"

"त्या वीर पुरुषानें आपलें ह्मणणें खरें केलें. दिल्लीश्वर चितोडावर स्वारी करून गेला तेव्हां तिलकसिंहानें सिंहाप्रमाणें अप्रतिम युद्ध करून, चितोडाच्या रक्षणार्थ आपले प्राण अर्पण केले. अकबरानें हें स्वतां अवलोकन केलें; आणि त्यानेंच स्वतां मला हें सांगितलें."

तोडरमल्ल इतकें बोलून बराच वेळ स्तब्ध राहिले. त्यांची वीरमुद्रा हळुहळू म्लान झाली. त्या वृद्ध योद्ध्याच्या नेत्रांतून एक अश्रुबिंदु खालीं पडला. डोळे पुसून तोडरमल्ल ह्मणाले "इंद्रनाथ! प्रतापसिंह सांप्रत आमचा शत्रु आहे. मीं असें ऐकलें आहे कीं, तिलकसिंहाचा पुत्र तेजसिंह सध्या प्रतापसिंहाच्या वतीनें लढत आहे. दिल्लीश्वरानें माझी योजना मेवाडावर केली तर त्या माझ्या परमप्रिय मित्राच्या पुत्राशीं युद्ध करण्यास मी मागेंपुढें पहाणार नाहीं हें खरें आहे; तथापि शत्रूच्या अंगीं गुण असेल तर त्याचा स्वीकार करणें निषिद्ध नाहीं. आपल्या जिवाचा परम मित्र दैवदुर्विलासानें आपल्या शत्रुपक्षास मिळाला, तरी त्याच्या मृत्यूबद्दल डोळ्यांतून अश्रु काढणें मुळींच निषिद्ध नाहीं!"

## प्रकरण २६ वें.

## अपरिचित शत्रु आणि परिचित मित्र.

Prisoner! pardon youthful fancies;
Wedded? If you can say no!
Blessed is and be your consort:
Hopes I cherished, let them go!

*Wordsworth.*

तोडरमल्लांच्या शिबिरांतून निघून इंद्रनाथ आपल्या शिबिरांत आला. चिंता, विस्मय आणि खेद यांनीं त्याचें अंतःकरण व्याप्त झालें होतें. प्रतापसिंह आणि तिलकसिंह यांची गोष्ट पुनःपुनः त्याच्या मनांत येत होती.

अशा प्रकारें इंद्रनाथ विचार करित बसला होता इतक्यांत एका चाकरानें त्याच्या हातांत एक पत्र आणून दिलें. तें उघडून इंद्रनाथानें एकदा, दोनदा, तीनदा वाचून पाहिलें; परंतु त्यांतील मर्म कांहींकेल्या त्याला कळेना. पत्रांत पुढील मजकूर होताः—

**"तुमचें बुद्धिकौशल्य पाहून मोठा चमत्कार वाटतो. ज्याचा बुद्धिकौशल्यानें पराजय करण्यास या संपूर्ण भरतखंडांत आजवर कोणीं शक्तिमान् झाला नाहीं, त्यालाहि तुह्मीं आज चकविलेंत. मींहि आतां याच मार्गाचें अवलंबन करण्याचा निश्चय केला आहे. कारण, पडावयास झालेलें घर अगोदरच सोडून देतो तोच खरा बुद्धिमान्! अर्ध प्रहर रात्रीला स्मशानघाटावर माझी भेट होईल."**

इंद्रनाथाला या पत्राचा कांहींच अर्थ समजेना. 'ज्याचा बुद्धिकौशल्यानें पराजय करण्यास या संपूर्ण भरतखंडांत आजवर कोणी शक्तिमान् झाला नाहीं' ह्मणजे कोण? मला वाटतें राजा तोडरमल्ल. पण त्यांनां चकविलें कोणीं? पडावयास झालेलें घर म्हणजे काय? इंद्रनाथाला असें वाटूं लागलें कीं, बंडखोरांपैकीं कोणींतरी हें पत्र लिहिलें असलें पाहिजे. स्मशानघाटावर जाऊन काय करावयाचें आहे? असा इंद्रनाथ

विचार करूं लागला. आणि अखेरीस त्यानें असें ठरविलें कीं, जाण्यांत कांहीं नुकसान नाहीं. कदाचित् एखादी गुप्त गोष्ट समजण्याचा संभव आहे.

पत्रांत निर्दिष्ट केलेल्या वेळीं तो स्मशानघाटावर येऊन पोहोंचला. त्याच्याबरोबर कोणीहि नव्हतें; फक्त त्याची तरवार हीच कायती त्याची साह्यकर्त्री होती. रात्रीं घोर अंधार पडला होता. आकाश काळ्याकुट्ट ढगांनीं व्याप्त होऊन गेलें होतें. विशेषतः पश्चिम दिशातर ढगांनीं पूर्णपणें व्याप्त झाली होती. त्या दिशेकडून क्षणोक्षणीं विजाहि चमकत होत्या. मधूनमधून त्या विजांच्या प्रकाशानें स्मशानांतील भयंकर देखावा स्पष्ट दिसत होता. कोठें नुक्तेंच शवदहन झालेलें दिसत होतें. त्या भस्मराशींतून मधूनमधून अग्निज्वाळा उठत होत्या. कोठें जळत असलेल्या चितेंतून भयानक अग्निज्वाळा निघून चोहों बाजूंला पसरत होत्या. रात्रीचा घोर अंधकार या रक्तवर्ण प्रकाशानें अधिकच भयंकर वाटत होता. त्या भीषण प्रकाशांत आणि अंधकारांत नानातऱ्हेच्या छाया दिसत होत्या. जवळ असणाऱ्या वृक्षसमूहांतून वायूच्या वेगामुळें नानाप्रकारचे अद्भुत शब्द कानांवर येत होते. त्या छाया पाहून आणि ते शब्द ऐकून इंद्रनाथाचें जात्या साहसी हृदयहि राहूनराहून डगमगूं लागलें. केव्हांकेव्हां दूर एखादी भयानक आकृति त्याच्या दृष्टीस पडावी. पण त्यानें त्या बाजूला पहावें तों दुसरें कांहीं नसून एखाद्या चितेंतून धुराचा लोळ निघतांना मात्र दिसावा. एखादे वेळीं ती आकृति हळुहळू चालत जाऊन वृक्षांमध्यें निबिड अंधकारांत गुप्त झालेली दिसावी. गगनमंडळ क्रमशः गंभीर अंधकारानें अधिकाधिक व्याप्त होऊं लागलें; वायु उत्तरोत्तर घोर गर्जना करून वाहूं लागला; गंगेंत उसळणाऱ्या लाटा भयानक कल्लोळ करूं लागल्या. आकाशांत नक्षत्रांचा मागमूसहि लागत नव्हता. दूर ओरडणाऱ्या कोल्ह्यांचा चीत्कार भूतप्रेतांच्या विकट हास्याप्रमाणें भासत होता.

इतक्यांत ज्या बाजूला दाट जंगल होतें त्याच बाजूला दोन भीषण आकृति अंधकारांत दिसत आहेत असा इंद्रनाथाला भास झाला. प्रथम त्याला तें खरें वाटलें नाहीं म्हणून तो पुनःपुनः तिकडे अगदीं निरखून पाहूं लागला, तों पुनःपुनः त्या भीषण आकृति दृष्टीस पडूं लागल्या. तेव्हां तो त्या बाजूला गेला; परंतु इतक्यांत त्या आकृति अदृश्य झाल्याचा त्याला भास झाला. इंद्रनाथ माघारा फिरला तोंच त्या जंगलांतून कोणाचेंतरी अट्टहास्य ऐकूं आल्यासारखें वाटलें. तत्काळ तो मागें फिरला, पहातो तों त्या दोन्ही भीषण आकृति उभ्याच आहेत!

"परमेश्वर रक्षण करो," असें ह्मणून त्यानें तरवार हातांत घेतली आणि धीरानें तो त्या बाजूला जाऊं लागला. मोठ्या सावधगिरीनें त्या आकृतींचें निरीक्षण करितकरित तो हळुहळू पुढें जाऊं लागला. परंतु तो त्या जंगलाच्या जवळ येतो न येतो तोंच त्या आकृति पुनः अदृश्य झाल्या; पुनः दुरून तें पैशाचिक विकट हास्य ऐकूं आलें.

"परमेश्वर रक्षण करो," असें पुनः एकवार ह्मणून इंद्रनाथानें त्या जंगलांत प्रवेश केला. त्या जंगलांत इतका घोर अंधकार पसरला होता कीं, चार हातांच्या अंतरावर असणारी कोणतीहि वस्तु पहातां येणें शक्य नव्हतें. इंद्रनाथाच्या शरीरावर कांटा उभा राहिला. कपाळास दरदरून घाम आला. त्या विकट हास्याला अनुलक्षून तो चालला होता. इतक्यांत त्याच्या खांद्यावर कोणीं अकस्मात् हात टाकला.

इंद्रनाथ चपापल्यासारखा होऊन पहातो तों भूतप्रेत कोणीहि नसून छद्मवेष धारण केलेलीं दोन माणसें दृष्टीस पडलीं त्यांनीं खुणेनें इंद्रनाथाला आपल्या मागोमाग येण्यास सांगितलें. इंद्रनाथहि कांहींएक न बोलतां त्यांच्या पाठोपाठ जाऊं लागला.

बराच वेळ तो त्या दोन व्यक्तींच्या मागून मुकाट्यानें चालला होता. चोहों बाजूंला गाढ अंधकारानें व्याप्त झालेलें घोर अरण्य; त्या निबिड अरण्याच्या मध्यप्रदेशांतून ते तिघेहि निस्तब्धपणें चालले

होते. जातांजातां शेवटीं गंगातीरावरील एका एकांत स्थळीं ते येऊन पोहोंचले. तेथें येतांच त्या छद्मवेषधारी व्यक्तींनीं आपल्या तोंडावरील आवरण काढून टाकलें. त्याबरोबर इंद्रनाथानें तत्काळ त्यांनां ओळखिलें. राजा तोडरमल्लांच्या हाताखालील हुमायून आणि तर्खान या नांवाचे ते दोघे सरदार होते.

इंद्रनाथानें विस्मित होऊन विचारिलें "इतक्या रात्रीं या छद्मवेषानें अशा भयानक स्थळीं तुह्मी काय करित होतां?"

यावर हुमायून किंचित् हास्य करून ह्मणाला "सेनानी इंद्रनाथ याच्या साहसाची परीक्षा पहात होतों."

"पण मी आपल्यापुढें परीक्षा द्यायला कबूल नसलों तर?"

"तर आह्मी समजूं कीं, आह्मीं जें अतिशय साहसाचें कार्य हातीं घेतलें आहे तें सिद्धीस नेण्यास इंद्रनाथ असमर्थ आहे."

"असमर्थ आहे कीं समर्थ आहे याचा निर्णय प्रसंग आला ह्मणजे लोक करतील. स्मशानांत पिशाचाशीं युद्ध केल्यानेंच साहसाची परीक्षा होते कीं काय?"

"सेनानी इंद्रनाथाच्या असाधारण साहसाचा सैन्यांत आह्मां सर्वांनां प्रत्यय नाहीं असें नाहीं. परंतु त्यांच्या अंगीं पैशाचिक साहस आहे कीं नाहीं, हेंच आज आह्मांला पहावयाचें होतें. पैशाचिक कार्यास हात घातल्यावर पैशाचिक साहसाचीच आवश्यकता असते."

"अशा कोणत्या पैशाचिक कार्यास मीं हात घातला आहे?"

"आपल्याला जणुं काय तें माहितच नाहीं! आमचा उपहास कां बरें करतां? आपण ज्या कार्याचा प्रारंभ केला आहे, गहन युक्तीनें आणि अत्यंत चातुर्यानें जें कार्य संपादन करण्याचा आपला उद्योग चालला आहे, तें आपलें कार्य आपणच जाणत नाहीं अं! इंद्रनाथ, आपलें अद्भुत कौशल्य आणि अपूर्व बुद्धिसामर्थ्य पाहून आह्मी अगदीं थक्क झालों आहों. राजा तोडरमल्लांनां फसविण्यास आजवर

कोणी समर्थ झालें नव्हतें, परंतु तुम्हीं तेंहि केलें आहे. धन्य आहे तुमची ! तुह्मांला उदंड आयुष्य असो ! तुमचा कीर्तिध्वज संपूर्ण बंगदेशावर फडकत राहील !"

इंद्रनाथाला हें कांहींएक समजलें नाहीं. तो विस्मित होऊन गेला. हें पाहून तर्खान म्हणाला "खरोखरच, आह्मीं दोघांनीं आपल्या अपूर्व कौशल्याबद्दल आपल्याला मनांतल्या मनांत कितीदातरी धन्यवाद दिले असतील. या छावणींत आमच्यासारखे आणखी कितीतरी दुसरे सरदार बंड करण्यास तयार आहेत. तीस हजार स्वारांचा सेनापती मासूमी फरांमुदीदेखील बंड करण्यास एका पायावर तयार आहे; परंतु काय करणार? राजा तोडरमल्लांनां आमच्या मनांतील हा भाव कसा तरी समजला आहे, आणि त्यांनीं आमच्यावर इतकी कांहीं सक्त नजर ठेविली आहे कीं, त्यामुळें आह्मांला मनांतले बेत मनांतच ठेवणें भाग पडलें आहे. आपण तोडरमल्लांला कशी मोहिनी घातली आहे, काय चातुर्यानें त्यांच्या डोळ्यांनां भुरळ पाडली आहे, कांहीं तर्क चालत नाहीं. धन्य आहे तुमच्या बुद्धिसामर्थ्याची—"

तर्खान आणखीहि कांहीं बोलणार होता, परंतु इंद्रनाथाचा क्रोध अनावर होऊन तो त्वेषानें मध्येंच ह्मणाला "हें मी काय ऐकतों आहें? मी बंडखोरांपैकीं नाहीं! मी शत्रूकडील कोणीतरी गुप्त हेर असून या सैन्यांत फितुर करण्याच्या हेतूनें कपटरूपानें राजा तोडरमल्लांच्या हाताखालीं राहिलों आहें, असें तुह्मांला वाटत असेल तर तुह्मी घोर भ्रांतींत निमग्न झालां आहां असें ह्मटलें पाहिजे. आणि तुह्मी जर फितुर झालां असाल तर हा मी चाललों पहा! मला तुमचा संबंधहि नको ! मी आत्तां जाऊन हा सर्व वृत्तांत राजा तोडरमल्लांनां सांगतों. अरेरे ! कोणत्या कुमुहूर्तावर तुमचें पत्र माझ्या हातीं पडलें?"

हुमायून आणि तर्खान दोघेहि चपापले. "आपण इतके दिवस खरोखरच भ्रांतींत होतों कीं काय? मासुमी फरांमुदीलाहि इंद्रनाथाचें

हृदय बरोबर ओळखतां आलें नाहीं कीं काय? आपण होऊन ही कुऱ्हाड आपल्या पायावर पाडून घेतली! आतां काय करणार?" असा क्षणभर विचार करून दोघांनींहि आपला हात तरवारीला घातला. शस्त्रास्त्रांच्या कामांत इंद्रनाथहि अनभ्यस्त नव्हता. त्यानेंहि झर्कन् आपली तरवार म्यानांतून बाहेर काढिली. इतक्यांत हुमायून त्याला पुनः एकवार अजमावून पहाण्याच्या उद्देशानें हंसतहंसत ह्मणाला "इंद्रनाथ, मला वाटतें आपला अद्यापि आमच्यावर विश्वास बसत नाहीं; आणि ह्मणूनच आपलें विद्रोहाचें गौप्य आपण आह्मांला सांगूं इच्छित नाहीं. परंतु आमच्याजवळ ही गोष्ट गुप्त ठेवण्याची खरोखरच आवश्यकता नाहीं; आपण हें काम हातीं घेण्याच्या पूर्वींच आह्मी बंडवाल्यांस सामील झालों आहों. हीं बंडवाल्यांकडून आह्मांला आलेलीं पत्रें हवीं तरी पहा."

इंद्रनाथ हें ऐकून विस्मयानें आणि क्रोधानें अंध झाला; आणि बेफाम वृत्तीनें ह्मणाला "दुष्टा, दगलबाजा! तुह्मी दोघेहि शिखानष्ट शंढ आहां! बंडखोरांनां फितुर झालां काय? भोगा आपल्या पापाचीं फळें."

तत्क्षणी इंद्रनाथानें तरवार सरसावून हुमायुनाला गांठला. हुमायूनहि तयार होताच. दोघांचे तरवारीचे हात सुरू झाले. इंद्रनाथ हुमायुनापेक्षां फार बळकट होता. शिवाय, अल्पकाळांत तो शस्त्रविद्येंत पराकाष्ठेचा निष्णात झाला होता. हां हां ह्मणतां त्यानें हुमायुनाला भूमितलावर लोटांगण घ्यावयास लाविलें.

या द्वंद्वयुद्धास प्रथम सुरुवात झाली तेव्हां तर्खान दूर स्तब्ध उभा राहिला होता. हें द्वंद्वयुद्ध प्रथमपासूनच अशा कांहीं भयंकर आवेशानें सुरू झालें कीं, तर्खान जड मूढ होऊन तटस्थ उभा राहिला; परंतु त्याची ही तटस्थवृत्ति फार थोडा वेळ टिकली. हुमायुनानें भूमीवर लोटांगण घेतलेलें पहातांच तो उडी मारून इंद्रनाथावर धावला. हें पाहून इंद्रनाथ मागें फिरून त्याच्याशीं युद्ध करूं लागला.

इतक्यांत हुमायूनहि उठला आणि खालीं पडलेली आपली तरवार हातांत घेऊन तो पुन्हा युद्धास सरसावला. अर्थात्, दोघेहि एकदम एकट्या इंद्रनाथावर तुटून पडले.

आतां मात्र इंद्रनाथ मोठ्या संकटांत सांपडला. दोघां प्रतिस्पर्ध्यांबरोबर एकट्यानें असियुद्ध करणें संभवनीय नव्हतें. आणि त्यांतहि तर्खान आणि हुमायून हे दोघेहि शस्त्र धरण्याच्या कामांत केवळ कच्चे नव्हते. परंतु हुमायून जर्जर होऊन गेला होता आणि निबिड अंधकार पडला होता ह्मणूनच कायतो कांहीं वेळ त्याचा टिकाव लागण्याचा संभव होता.

हुमायुनाला बरेच वार लागले होते; त्याचा फार वेळ टिकाव लागेना; तेव्हां होतें नव्हतें तेवढें सर्व अवसान खर्च करून त्यानें इंद्रनाथावर शेवटचा हल्ला केला. तर्खानानेंहि हीच संधी साधली. इंद्रनाथानें पाहिलें कीं, प्रसंग मोठा कठीण आहे. यांतून कांहीं युक्तीनेंच मुक्तता करून घेतली पाहिजे. मागें सरून दोघांच्याहि आवेशाच्या हल्ल्यांतून निसटून जाण्याचा त्यानें विचार केला व एकदम मागें उडी घेतली. परंतु तो नदीच्या तीराच्या अगदींच जवळ उभा होता हें युद्धाच्या भरांत तो विसरला. त्याची उडी अचानक नदीच्या प्रवाहांत पडली. "धरणीमाते! या विपत्कालीं तूंहि याला आधार दिला नाहींसना?" असें मनांतल्या मनांत ह्मणतह्मणत तो गंगाप्रवाहांत मग्न झाला. इंद्रनाथाला अनायासें जलसमाधी मिळाली, असें निश्चित समजून हुमायून आणि तर्खान आपापल्या उद्योगाला चालते झाले.

हुमायून आणि तर्खान यांचा समज केवळ चुकीचा नव्हता. इंद्रनाथ अशा कांहीं वेगानें पाण्यांत पडला होता कीं, त्याला वर येण्याचीदेखील शक्ति राहिली नव्हती; मग पोहून पार पडण्याचें नांव कशाला पाहिजे? उंच तीरावरून तो जो धाड्दिशीं खालीं आला तो बेशुद्ध झाला. सुदैवानें जवळच्याच एका घाटाशीं एक नौका

बांधली होती आणि त्या नौकेंत एक माणूस जागें होतें. कोणीतरी मनुष्य पाण्यांत पडलें असें पाहून त्यानें नावाड्यांनां तत्काळ पाण्यांत उतरविलें आणि ह्मणूनच मृतप्राय झालेल्या इंद्रनाथाचा प्राण वांचला. अचेतन पडलेल्या इंद्रनाथाला नावाड्यांनीं नौकेंत नेलें.

नावाड्यांनां पाण्यांत उतरवून इंद्रनाथाचे प्राण वांचविण्याचें श्रेय एका रमणीनें संपादिलें होतें. इंद्रनाथाला नावाड्यांनीं नौकेंत आणतांच तिनें मोठ्या काळजीनें त्याचें सर्व शरीर धुऊन पुसून काढलें आणि शस्त्राचे वार लागलेल्या जागीं ओल्या पट्टया बांधल्या. इंद्रनाथास पुष्कळ जखमा झाल्या होत्या; परंतु त्यांत मोठीशी अगर मर्मस्थानावर झालेली अशी एकहि नव्हती. रात्रभर उत्तम झोंप आली तर सकाळीं फारशा वेदना होणार नाहींत हें त्या स्त्रीच्या तेव्हांच ध्यानांत आलें.

आणि त्या परोपकारी स्त्रीच्या यत्नानें इंद्रनाथास खरोखरच गाढ झोंप लागली. प्रातःकाळीं तो डोळे उघडून पहातो तों शेजारीं एक परम सुंदर रमणी उभी आहे. या सुंदरीला आपण पूर्वी कोठेंतरी पाहिली असावी, असें इंद्रनाथास वाटलें; परंतु कोठें तें कांहीं त्याला आठवेना. तो ह्मणाला "आपण मला आज जीवदान दिलें. पाण्यांतून आपणच मला बाहेर काढलें नाहीं का? आपण कोण? मला आपल्या या ऋणांतून कसें मुक्त होतां येईल? आपण माझे प्राण वांचविलेत हें समजल्यावर राजा तोडरमल्ल काय पाहिजे तें देण्यास नाकबूल होणार नाहींत."

त्या रमणीनें बराच वेळ कांहीं उत्तर दिलें नाहीं; परंतु इंद्रनाथ पुनःपुनः तिला विचारूं लागला तेव्हां शेवटीं ती ह्मणाली "सेनापतींनां इतक्यांतच या अबलेचें विस्मरण पडलंना?"

कोकिलेलाहि लाजविणाऱ्या त्या कंठध्वनीचें इंद्रनाथाला अद्यापि विस्मरण झालें नव्हतें. तो उद्विग्न होऊन ह्मणाला "सुंदरी, जिवांतजीव

आहे तोंपर्यंततर मला आपली विस्मृति व्हावयाची नाहीं. आपण इथें कशाला आलां? महेश्वराचें मंदिर आपण केव्हां सोडलें ?"

त्या नौकेंतील स्त्री ह्मणजे विमला होती, हें वाचकांनीं ताडलेंच असेल. इंद्रनाथानें विमलेला प्रथम महेश्वराच्या मंदिरांत पाहिलें होतें; परंतु आज तिला या स्थळीं अशा अवस्थेंत पाहून तो विस्मित झाला. इंद्रनाथाची विस्मित मुद्रा पाहून विमला किंचित् हंसली, आणि आपला पदर सांवरून घेऊन ती त्याची शुश्रूषा करूं लागली.

इंद्रनाथाला अनेक जागीं जखमा झाल्या होत्या; परंतु त्यांत मोठीशी एकहि नव्हती, हें मागें सांगितलेंच आहे. विमलेनें त्यांवर नीट पट्टया वगैरे बांधल्या; आणि नंतर इंद्रनाथ तेथून आपल्या छावणींत जाण्याच्या उद्योगास लागला.

विमलेचा स्नेहपुरस्सर निरोप घेऊन इंद्रनाथानें तिला शतशः धन्यवाद दिले आणि आपल्याजवळून कांहींतरी पारितोषिक घ्यावें, ह्मणून तो तिला आग्रह करूं लागला.

प्रथम बराच वेळ विमला कांहींएक बोलली नाहीं; परंतु इंद्रनाथ आपला आग्रह सोडीना, हें पाहून शेवटीं ती डोळ्यांत आंसवें आणून दीन मुद्रेनें ह्मणाली "हे शूर आणि उदार पुरुषा! सतीशचंद्राचं रक्षण करा, ही भिक्षा महेश्वराच्या मंदिरांत मीं आपणापाशीं मागितली होती त्याचं आपल्याला स्मरण असेलच. तीच भिक्षा आज पारितोषिक ह्मणून मी मागत्यें."

"परंतु ती कांहीं भिक्षा नव्हे; सतीशचंद्र जर निर्दोषी असतील तर त्यांचें रक्षण करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. आपल्याकरितां मला आणखी काय करतां येईल तें सांगा; मी तें करण्यास कधींहि मागें घेणार नाहीं."

यावर बराच वेळ विचार करून विमला नम्रस्वरानें ह्मणाली "हो, माझी दुसरी एक याचना आहे. महेश्वराच्या मंदिरांत आपली प्रथम

भेट झाली, त्यावर आज ही इथं झाली, हें आपण अजिबात विसरून जावं. आपल्या स्मृतिपथांतून मला आपण काढून टाकावं."

इंद्रनाथ हें ऐकून आश्चर्यचकित झाला. तो ह्मणाला "आज आपण मला जिवदान दिलें, हें मी कधींकाळीं विसरेन हें शक्य नाहीं. आपण अशी भलतीच याचना कां करतां?"

दीर्घ निःश्वास सोडून विमला म्हणाली "महाराज, मी ब्राह्मणकन्या अर्थात् आपल्या स्मृतिपथांत रहाण्यास अयोग्य. सरला आपली मार्गप्रतीक्षा करित आहे, तेव्हां अन्य कोणत्याहि स्त्रीला आपल्या हृदयांत स्थान मिळणं योग्य नाहीं."

## प्रकरण २७ वें.

## अपूर्व व्यूह.

Yet though thick the shafts as snow,
Though charging knights like whirlwinds go.
Though billmen ply their ghastly blow,
Unbroken was the ring.
The stubborn spearmen still made good
Their dark impenetrable wood,
Each stepping where his comrade stood,
The moment that he fell.

*Scott.*

बंडखोरांनीं आतां मुंगेरीच्या जवळ आपला तळ दिला होता. तोडरमल्ल आपल्या अलौकिक युद्धकौशल्यानें बंडखोरांचे निकराचे हल्ले परतवून दुर्गाचें रक्षण करित होते. इंद्रनाथाचीहि उत्तरोत्तर अधिकाधिक ख्याति होत चालली होती. तो आतां आपल्या कर्तबगारीनें पांचहजार घोडेस्वारांचा अधिपति झाला होता. संधी सांपडतांच आपल्या स्वारांनिशीं दुर्गाबाहेर पडून शत्रूंवर तो मोठ्या आवेशानें तुटून पडे. अमक्या ठिकाणीं शत्रूंची एखादी टोळी आहे अशी बातमी समजतांच तोडरमल्लांची अनुमति घेऊन इंद्रनाथ तिच्या पारिपत्यास तत्काळ बाहेर पडे आणि तिला मोठी मदत येऊन मिळण्यापूर्वींच तिचा विध्वंस करून तो परत दुर्गात येऊन दाखल होई. इंद्रनाथाचें हें अपूर्व रणकौशल्य, साहस आणि वीरश्री पाहून किल्ल्यांतील एकंदर लोक त्याची वाहवा करूं लागले. दिवसेंदिवस त्याच्या शौर्याची ख्याति अधिकाधिक पसरूं लागली.

भागलपुराहून पुढें पुढें येऊन शत्रूंनीं शेवटीं खुद्द मुंगेरीच्या दुर्गानजीक तळ दिला होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. एके दिवशीं सूर्यास्ताच्या सुमारास शत्रूंची छावणी पहाण्याच्या उद्देशानें राजा तोडरमल्ल दुर्गाच्या तटाबाहेर पडून सरासरी अर्ध्या कोसाच्या अंतरावर गेले. शत्रूंची छावणी तेथून बरीच दूर होती; अर्थात् त्यांनां कोणत्याहि प्रकारें भीति बाळगण्याचें कारण नव्हतें. त्यांतहि महाराज यावेळीं

वेष पालटून निघाले होते. बरोबर पन्नास घोडेस्वारहि होते. स्वार इकडेतिकडे घोडे उडवित चालले होते, परंतु महाराज मात्र एकाग्र दृष्टीनें शत्रूंच्या छावणीकडे पहात होते. इतक्यांत दुरून कांहीं आवाज ऐकूं आला. सगळे विस्मित होऊन पाहूं लागले, तों दूर अंतरावर धुळीचा लोट त्यांच्या दृष्टीस पडला. थोड्याच वेळांत एक घोडेस्वार वायु-वेगानें राजा तोडरमल्लांच्याच समोर येत आहे असें दिसलें. घोडा अशा कांहीं वेगानें येत होता कीं, त्याचे पाय जमिनीला लागतात कीं नाहीं, हेंदेखील लक्ष्यांत येत नव्हतें. हां हां ह्मणतां तो स्वार जवळ येऊन ठेपला. तेव्हां तो आपल्याच सैन्यांतील आहे असें सर्वांनां समजून आलें. महाराजांजवळ येतांच त्या स्वारानें घोड्यावरून खालीं उडी मारिली. घोडा अशा कांहीं वेगानें पळत आला होता कीं, स्वार उतरण्याचीच खोटी, त्यानें जमिनीवर धाडकन् अंग टाकलें, दोनचार वेळां खिंकाळला, पाय झाडले आणि बिचारा या जगाचा त्याग करून गेला.

परंतु त्या बिचाऱ्या मुक्या प्राण्याच्या हृदयद्रावक स्थितीकडे लक्ष्य देण्यास कोणालाहि अवकाश नव्हता. तो स्वार राजा तोडरमल्लांला नम्रतेनें प्रणाम करून भीतिग्रस्त स्वरानें ह्मणाला "महाराज, दगा दगा! आपल्यापैकींच बंडखोरांनां फितुर झालेल्या कोणा दगलबाजा-कडून महाराज आज यावेळीं दुर्गाबाहेर पडणार आहेत ही बातमी बंडखोरांनां समजून त्यांचे दोन हजार घोडेस्वार इथून अर्ध्या कोसावर दबा धरून बसले होते. ते पहा ते आतां आपल्यावर चालून आले देखील—" इतकें बोलून तो स्वार ग्लानि येऊन जमिनीवर पडला.

तोडरमल्लांच्या बरोबरचे स्वार तो समोरून येणारा बंडखोरांचा प्रचंड समूह पाहून गांगरून गेले. महाराज त्यांनां धीर देऊन ह्मणाले "असे घाबरतां कां? तुह्मीहि घोड्यावरच बसलेले आहां. दुर्गाकडे कूच करा. शत्रु येऊन पोहोंचण्यापूर्वींच आपल्याला दुर्गांत प्रवेश करतां येईल."

हा हुकूम ऐकतांच सर्वांचे घोडे दुर्गाकडे वेगानें धावत सुटले.

दीर्घदर्शी इंद्रनाथानें दूर दिसणारे धुळीचे लोट पाहून रणभेरी वाजविली. त्याचे निवडक पांचशें स्वार सज्ज होऊन दुर्गाबाहेरील एका आंबराईत उभे होते. त्यांनां घेऊन तत्क्षणीं तो तोडरमल्लांला येऊन मिळाला आणि ह्मणाला "महाराज, आज्ञा होईल तर हे माझे स्वार पुढें घेऊन जाऊन शत्रूंनां कांहीं वेळ मी अडवून धरतों. तितक्या अवकाशांत आपल्याला दुर्गांत सहज जातां येईल."

तोडरमल्लांनीं गंभीर स्वरानें उत्तर दिलें "इंद्रनाथ, युद्धाची वेळ आली असतां हा तोडरमल्ल कधींहि पराङ्मुख होत नाहीं. परंतु निष्कारण प्राण नष्ट करणें याला युद्ध ह्मणत नाहींत, नरहत्या ह्मणतात."

बोलतांबोलतां सर्वजण दुर्गानजीक येऊन पोहोंचले. दुर्गाभोंवतालचा खंदक काय तो ओलांडावयाचा राहिला होता. खंदकाच्या तोंडाशीं येऊन पहातात तों त्यावरील लांकडी पूल कोणीं मोडून टाकलेला! आतां काय करावें? सर्वजण घाबरून गेले. ज्या दगलबाजानें शत्रूला ही बातमी दिली त्याचेंच हें काम असलें पाहिजे, अशी सर्वांची खात्री झाली. परंतु उपयोग काय? स्वारांनां आंत शिरण्यास मुळींच मार्ग राहिला नाहीं.

तेव्हां खंदकांतून पोहून पलीकडे जावें अशी सर्वांनीं मसलत ठरविली. परंतु मागून येणाऱ्या शत्रुसैन्याकडे बोट दाखवून तोडरमल्ल ह्मणाले "तुह्मी अर्ध्यावर जातां न जातां तोंच शत्रु येऊन थडकणार आणि मग भ्याडासारखे तुह्मी पाण्यांत बुडून मात्र मरणार ह्मणून खात्रीनें समजा. यापेक्षां वीराची कृति करा. शत्रूला तोंड द्या. इकडे आपण नवा पूल करण्यास एकदम सुरुवात करूं. पूल तयार होईपर्यंत शत्रूशीं निकरानें लढत राहूं. पाण्यांत बुडून मरण्यापेक्षां धारातीर्थीं देह ठेवणें वीरांनां श्रेयस्कर नाहीं काय? इंद्रनाथ! चला, आजचा हल्ला करण्याचा मान तुमचा आहे."

खऱ्या शूराला आणखी कसला मान पाहिजे असतो? 'मनुष्याला साध्य तें करण्यास मी मागें घेणार नाहीं,' एवढेंच बोलून इंद्रनाथ आपल्या सैन्याची व्यूहरचना करूं लागला. शंभरशंभर स्वारांची एक रांग याप्रमाणें आपल्या सैन्याच्या पांच रांगा करून त्यांनां एकामागें एक असें अर्धचंद्राकृतींत त्यानें उभें केलें. अग्रभागीं असलेल्या रांगेनें प्रथम लढण्यास सुरुवात करावयाची. ती थकली ह्मणजे तिनें मागें सरावयाचें आणि दुसऱ्या रांगेनें पुढें येऊन युद्ध करावयाचें; तिच्या मागून तिसरीनें, तिसरीच्या मागून चौथीनें याप्रमाणें क्रमाक्रमानें प्रत्येक रांगेनें पुढें सरून पुढील रांगेला विश्रांति द्यावयाची. याप्रमाणें सैन्याची रचना करून इंद्रनाथानें शत्रूला समोरून अडवून धरण्याचा निश्चय केला. मागच्या बाजूला खंदक होता; अर्थात् त्या बाजूनें दुसरा हल्ला येईल ही धास्ती करावयाचें कारण नव्हतें. त्या खंदकाजवळ चारपांच वृक्ष तोडून कित्येकजण नवा पूल करित होते. इतक्यांत शत्रु येऊन थडकले. इंद्रनाथाचें हृदय उत्साहपूर्ण झालें.

आज कांहीं नाहीं तरी तीनचार महिने मुंगेरीला शत्रूंनीं जवळ जवळ वेढाच दिला होता ह्मणण्यास हरकत नाहीं. आजवर शत्रूंचे अनेक हल्ले झाले असतील; परंतु आज दोन्हीं पक्षांनीं जें कांहीं भयंकर साहस मांडिलें होतें, तसें आजवर कोणीं कधीं पाहिलें नव्हतें. व्यूहाचा भेद करून पलीकडे गेलों कीं राजा तोडरमल्ल आपल्या हातीं लागलेच अशा विचारानें समुद्राच्या लाटांप्रमाणें शत्रु एकामागून एक हल्ले करूं लागले; परंतु व्यूह कांहीं केल्या फुटेना. पर्वताच्या पायथ्यावर आदळणाऱ्या लाटा जशा पुनः पुनः मागें सरतात त्याच-प्रमाणें इंद्रनाथानें निर्मिलेल्या अपूर्व सेनाव्यूहावर होणारे शत्रूंचे हल्ले मागें सरत होते. शत्रूंची संख्या जरी फार मोठी होती, तरी त्यांनां कांहीं त्यापासून फायदा झाला नाहीं. कारण, इंद्रनाथानें सैन्याची अशा कांहीं कुशलतेनें रचना केली होती कीं, शत्रूंकडील शंभरांपेक्षां अधिक

इसमांनां एकाच वेळीं पुढें येऊन त्याच्या सैन्यव्यूहावर हल्ला करितां येऊं नये. त्याचप्रमाणें त्यानें आपलें सैन्य उभें केलें होतें ती जागाहि इतकी आकुंचित होती कीं, शत्रूच्या दोन हजार लोकांनां तेथें हालचाल करण्यासहि मोठी अडचण पडूं लागली. तथापि बंडखोर आज अगदीं निश्चयानें लढत होते. वारंवार सिंहगर्जना करून अतुल पराक्रम दाखवित होते. वीरमदानें उन्मत्त होऊन गर्जना करितकरित ते वारंवार व्यूहभेद करण्याचा यत्न करित होते. इंद्रनाथाचे लोकहि कांहीं कमी साहसी नव्हते. त्यांतहि आज खुद्द महाराजा तोडरमल्ल यांची त्यांच्यावर समक्ष देखरेख होती आणि त्यामुळें आज त्यांच्या उत्साहाला सीमाच राहिली नव्हती. इंद्रनाथाचा घोडा व्यूहाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सारखा धावत होता. जेथें जेथें शत्रु विशेष जोर दाखवीत तेथें तेथें इंद्रनाथ स्वतः जाऊन लढत होता. मधूनमधून "महाराज स्वतः आज तुमचा पराक्रम पहात आहेत, महाराजांचें रक्षण करण्याचें काम आज तुमच्या शिरावर आहे, दिल्लीश्वराचें नांव आणि गौरव हीं आज तुमच्या हातीं आहेत," असें उच्चस्वरानें बोलून तो आपल्या लोकांनां उत्तेजन देत होता. त्याच्या या कृतीनें त्याच्या लोकांनां मोठा चेव आला. ते सिंहगर्जना करूं लागले. त्या रणशब्दांनीं आकाश भरून गेलें. शत्रूंचीं हृदयें कांपूं लागलीं.

तथापि दोन हजार मनुष्यांबरोबर पांचशें माणसें कोठवर लढणार? इंद्रनाथाकडील एक एक स्वार रणांगणीं पडूं लागला. शत्रूकडीलहि अनेक लोक पडले. परंतु दोन हजारांतून शेंदोनशें लोक जायबंदी झाले तरी त्यांत कांहीं मोठासा फरक पडत नाहीं. हा प्रकार पाहून राजा तोडरमल्ल विचारांत पडले. इंद्रनाथास जवळ बोलावून ते ह्मणाले "इंद्रनाथ, या तुझ्या सैन्याला तूं दिलेली रणशिक्षा पाहून मी थक्क झालों. परंतु सैन्यांतील लोक पहा कसे पडत आहेत आणि जखमी होत आहेत ते! मला वाटतें, हे आतां माघार घेतील."

हें ऐकून इंद्रनाथाचें मुख आरक्त झालें. तो ह्मणाला "महाराज, मीं माझ्या शिपायांस शत्रूला तोंड देऊन लढण्यास मात्र शिकविलें आहे, माघार घेऊन शत्रूला पाठ दाखविण्याचें नामर्दपणाचें काम मुळींच शिकविलें नाहीं. यांतील एक स्वार जरी राहिला तरीहि तो शत्रूला तोंड देऊन लढत राहील."

हळुहळू रणक्षेत्रावर सायंकाळची छाया पसरूं लागली; परंतु इंद्रनाथाचा तो अपूर्व व्यूह तसाच अभेद्य राहिला होता. एक स्वार पडला कीं त्याच्या जागीं दुसरा येऊन उभा राहिलाच. दुसरा पडला कीं तिसरा पुढें झालाच. असा अव्याहत क्रम चालू होता. रांगा जसजशा लहान होऊं लागल्या तसतसा त्यांतील शिपायांचा उत्साह अधिकाधिक वृद्धिंगत होऊं लागला. "शत्रूला पाठ दाखविण्याचें काम आपल्या लोकांनां मुळींच माहित नाहीं," असें जें इंद्रनाथ ह्मणाला होता, तें अक्षरशः खरें होतें. शत्रूकडचे लोक अगदीं हताश झाले आणि भीषण गर्जना करून त्यांनीं अखेरचा मोठ्या निकराचा हल्ला केला. त्या प्रचंड सेनेच्या भीषण गर्जनेनें चाऱ्ही दिशा थरारून गेल्या; घोड्यांच्या टापांनीं भूमि कंपित झाली; परंतु त्या भीषण गर्जनेचा किंवा त्या घोड्यांच्या टापांचा इंद्रनाथाच्या सेनाव्यूहावर कांहीं एक परिणाम झाला नाहीं; तो तसाच अढळ राहिला. युद्ध समाप्त झालें. शेवटपर्यंत तो अपूर्व व्यूह भंग पावला नाहीं.

इकडे तो पूलहि तयार झाला. राजा तोडरमल्ल खंदक ओलांडून पलीकडे गेले. ते सुरक्षित दुर्गांत शिरले हें ऐकून इंद्रनाथाच्या सैन्यानें आनंदानें सिंहगर्जना केली. ती गर्जना शत्रूंच्या छावणींतहि ऐकूं गेली. ती ऐकतांच ते समजून चुकले कीं, ज्या उद्देशानें दोन हजार लोक पाठविले होते तो उद्देश निष्फळ झाला.

निरुत्साह होऊन बंडखोर मुकाट्यानें परत आपल्या छावणीकडे गेले. राजा तोडरमल्ल पुलावरून पार होईपर्यंत इंद्रनाथ एकाग्र दृष्टीनें

त्यांच्याकडे पहात होता. त्यांनां सुरक्षितपणें दुर्गांत शिरलेले पहातांच तो घोड्यावरून खालीं उतरूं लागला; परंतु उतरतांउतरतां एकाएकीं घेरी येऊन जमिनीवर निश्चेष्ट पडला. हें पहातांच त्याच्या सैन्यांतील एकदोन स्वार त्याला उठविण्याकरितां धावत त्याच्याजवळ आले; परंतु पहातात तों त्याच्या छातींत भाल्याची मोठी जखम झाली होती, रक्तानें त्याचें सर्वांग भरून गेलें होतें, अंगांत त्राण न राहिल्यामुळें तो मूर्च्छित होऊन पडला होता.

इतक्या अवकाशांत इकडे इंद्रनाथाच्या सैन्यांतील बहुतेक लोक पूल ओलांडून पलीकडे गेले. बंडखोरांपैकीं कित्येकांची नजर याच संधीस इंद्रनाथाकडे गेली. त्यांनीं मागें फिरून पाहिलें तों तो बेशुद्ध पडला आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. मग काय विचारतां? आनंदानें आरोळ्या मारित ते इंद्रनाथाजवळ आले, आणि त्याला जमिनीवरून उचलून घेऊन आपल्या छावणीकडे चालते झाले. इंद्रनाथाच्या तेथें असलेल्या शिपायांची कत्तल उडविण्यास त्यांनां मुळींच आयास पडले नाहींत. इंद्रनाथ याप्रमाणें अखेरीस अचानक शत्रूच्या हातीं सांपडून बंदिवान झाला.

## प्रकरण २८ वें.

## बंदिवान.

The soldier's hope, the patriot's zeal,
For ever dimmed, for ever crossed,
Oh! who shall say what heroes feel,
When all but life and honor's lost.
The last sad hour of freedom's dream,
And valor's task moved slowly by,
While mute they watched till morning's beam,
Should rise and give them light to die.
There's yet a world where souls are free,
Where tyrants taint not nature's bliss,
If death that world's bright opening be,
Oh! who would live a slave in this?

*Moore.*

बेशुद्ध स्थितींत शत्रूंनीं इंद्रनाथाला बंदिवान करून छावणींत आणलें. बऱ्याच वेळानें इंद्रनाथ पुन्हा शुद्धीवर आला. त्यानें डोळे उघडून विस्मित दृष्टीनें सभोंवार पाहिलें.

त्याच्या चाऱ्हीं बाजूंला शत्रूकडील लोक वेढा घालून बसल्यासारखे दिसत होते. समोर एका उच्च आसनावर मासुमी बसला होता. त्याच्या दोन्ही बाजूंला मोठमोठे अमीरउमराव आणि मानकरी आपापल्या दर्जाप्रमाणें बसले होते. राजा तोडरमल्लाचे फितुर झालेले सेनापति तर्खान आणि हुमायून हेहि त्यांत दिसत होते. इंद्रनाथाच्या मागील बाजूस एक मारेकरी हातांत एक मोठी भयंकर कुऱ्हाड घेऊन एकाग्र दृष्टीनें आपल्या धन्याकडे पहात उभा राहिला होता. आज्ञा किंवा इशारा केव्हां होतो आणि या बंदिवानाचा शिरच्छेद आपण केव्हां करतों, असें त्याला झालें होतें. परंतु हा भयंकर देखावा पाहून इंद्रनाथ यत्किंचित्‌हि डगमगला नाहीं. तीव्र दृष्टीनें तो मासुमीकडे पाहूं लागला.

इंद्रनाथाला शुद्धीवर आलेला पाहून मासुमी गंभीरस्वरानें ह्मणाला "ए–हिंदु ! तूं शूर पुरुष आहेस; परंतु तूं राजद्रोह केला आहेस. तुला माहित असेल कीं, राजद्रोह करणाराला शिरच्छेदाशिवाय दुसरी शिक्षा नाहीं."

इंद्रनाथ भीषणस्वरानें ह्मणाला "वीरपुरुष मृत्यूला कधींच भीत नाहीं. आपल्या इच्छेस येईल तें करा; परंतु मीं राजद्रोह केलेला नाहीं."

इंद्रनाथाच्या उग्रस्वरानें मुळींच न रागावतां मासुमी ह्मणाला "तोडरमल्लाला मिळून बंगदेशाच्या जहागिरदारांविरुद्ध समशेर उचलणें हा राजद्रोह नव्हे काय?"

"बंगदेशाचा बादशहा, संपूर्ण भारतवर्षाचा सार्वभौम बादशहा अकबरशहा याच्या वतीनें मी बंगदेशाच्या राजद्रोही जहागिरदारां-बरोबर युद्ध केलें." इंद्रनाथ पुन्हा कठोरस्वरानें ह्मणाला.

इंद्रनाथ आपण होऊन मृत्यूला आमंत्रण देत आहे, व मासुमी आतां त्याचा शिरच्छेद करण्याची आज्ञा देईल असें सर्वांस वाटलें. परंतु महानुभाव मासुमी त्या इंद्रनाथाची निर्भीडता पाहून मुळींच रागावला नाहीं. उलट आनंदित होऊन शांतस्वरानें म्हणाला "वीरपुरुषा, तुझ्या उद्धटपणाबद्दल मी तुला क्षमा करतों. तुझें शौर्य पाहून मला पराकाष्ठेचा आनंद झाला आहे; परंतु बंगदेशांतील जहागिरदारांनां तूं पुनः कधींहि राजद्रोही ह्मणूं नकोस. आमचा जन्म मोंगलवंशांत झाला आहे; आह्मीं बंगदेश पादाक्रांत केला आहे–आमच्या बाहुबलानें हा देश जिंकला आहे; या देशाचे खरे राजे आह्मी आहों."

इंद्रनाथानें पूर्ववत् कठोर स्वरानें उत्तर दिलें "आपण बंगदेश जिंकलात हें मी नाकबूल करित नाहीं; परंतु सार्वभौम अकबर बादशहाच्या प्रतापानें आपल्याला तो जय मिळाला, हें आपण विसरूं नका. त्या शहानशहाच्या विरुद्ध युद्ध करून सांप्रत आपण राजद्रोह

करित आहां. परमेश्वराच्या इच्छेविरुद्ध आचरण करून हा सुंदर बंगदेश आपण रक्तानें माखून कां टाकतां?"

"हिंदू! परमेश्वराच्या इच्छेवर भर टाकून तुह्मी खुषाल स्वस्थ रहा, परंतु साहसी मोंगल जिवांत जीव आहे तोंपर्यंततरी अजागळा-सारखे स्वस्थ बसणार नाहींत! दुसऱ्याची गुलामगिरी ते कधींहि पत्करणार नाहींत!"

"पठाण लोकहि असेंच ह्मणत असत; परंतु आतां पठाणराज्य कुठें आहे? दिल्लीश्वराविरुद्ध आपणहि व्यर्थ युद्ध करित आहां; या बंगदेशाला निष्कारण रक्ताचें स्नान घालित आहां."

"काफर! तुझें जीवनमरण सांप्रत माझ्या हातांत आहे. माझ्या समोर असें उद्दामपणाचें भाषण करतोस? तुला जिवाची पर्वा नाहींशी दिसते!"

"मला जिवाची पर्वा फार आहे; पण सध्या मी आपल्या हातीं सांपडलों आहें, तेव्हां जिवाची आशा धरून उपयोग काय?"

"कां बरें?"

"साहसी पुरुष शत्रूला क्षमा करण्यास तयार असतो. आपल्याला जय मिळेल अशी ज्याला पक्की खात्री असते तोहि शत्रूला क्षमा करतो. परंतु जयाविषयीं ज्याला संशय असतो तो कधींहि शत्रूला क्षमा करण्यास धजत नाहीं."

बराच वेळ बोलल्यामुळें इंद्रनाथाला ग्लानि आली. त्याच्या छातीवरील जखमेंतून पुनः रक्त वाहूं लागलें. तो स्तब्ध राहिला.

मासुमी क्रोधांध होऊन ह्मणाला "काफर! अशा वाक्चातुर्यानें मजजवळून क्षमा मिळविण्याची आशा करूं नकोस!"

इंद्रनाथानें पुनः अभिमानानें उत्तर दिलें "मी कसलीच आशा करित नाहीं. या मोंगाला आपला कार्यभाग त्वरित उरकून घेण्याचा हुकूम व्हावा, अशी माझी विनंति आहे."

परंतु त्या मांगाला आपली कुन्हाड चालविण्याचा प्रसंग आला नाहीं. इंद्रनाथाच्या जखमेंतून अधिकाधिक रक्त वाहूं लागलें. शरीर निर्बल होऊं लागलें. तो पुन्हा मूर्च्छित होऊन भूमीवर पडला.

मासुमी स्वभावतः निष्ठुर हृदयाचा नव्हता. घायाळ, बलहीन, चैतन्यहीन योद्ध्याचा शिरच्छेद करण्याचा हुकूम त्यानें दिला नाहीं. "याला सध्या बंदिखान्यांत घेऊन जा," एवढेंच तो ह्मणाला.

इंद्रनाथाला पुन्हा बंदिखान्यांत पाठविण्यांत आलें.

## प्रकरण २९ वें.

## अबलेचें शौर्य.

The midnight passed, and to the massy door
A light step came—it paused—it moved once more.
Slow turns the grating bolt and sullen key—
'Tis as his heart foreboded—that fair she?

*Byron.*

एका लहान अंधार कोठडींत एक शूर पुरुष तृणशय्येवर पडला होता. कारागृहाला असलेल्या एका लहानशा झरोक्यांतून प्रातःकालच्या बालरवीचीं सौम्य किरणें आंत आलीं होतीं. आंतील अंधकारांत त्या किरणांच्या रेषा स्पष्ट दिसत होत्या. असंख्य क्षुद्र परिमाणू त्या किरण-रेषेंत खेळत होते, वर चढत होते, खालीं पडत होते. केव्हा किरणांत दिसत तर केव्हां अंधकारांत अंतर्धान पावत होते. मधूनमधून एखाद दुसरा पक्षी त्या झरोक्यावर येऊन बसे आणि क्षणभरानें पुनः उडून जाई. ते पक्षी कांहीं बंदिवान नव्हते. दोन्ही पंख पसरून झाडाच्या या खांदीवरून त्या खांदीवर आनंदानें उडत होते. भूमीवर किंवा आकाशांतहि स्वैर संचार करित होते. तो शूर पुरुष तृणशय्येवर पडून त्या झरोक्याकडे टक लावून पहात होता. अंधकारांत असलेल्या लता आपले बाहु विस्तारून ज्याप्रमाणें प्रकाशाकडे उत्कंटेनें धाव घेत असतात त्याचप्रमाणें त्या बंदिवानाची दृष्टि मोठ्या उत्कंटेनें त्या झरोक्याकडे धाव घेत होती. तो बंदिवान दुर्धर चिंतेंत गढून गेला होता कीं किरणांत खेळणाऱ्या त्या परिमाणूंची मौज पहात होता? झरोक्याशीं जमलेले पक्षी पुनः पक्षविस्तार करून उडून जात होते, त्यांच्याबरोबर तो बंदिवानहि आपले मानसपक्ष विस्तृत करून सुंदर पृथ्वीवर आणि अनंत नीलवर्ण आकाशांत भ्रमण करिततर नव्हता ना?

छे छे! हे विचार इंद्रनाथाच्या मनांत मुळींच नव्हते. तो दुसऱ्याच विचारांत मग्न झाला होता. इंद्रनाथ शूर पुरुष होता. असा

पुरुष मृत्यूला भीत नाहीं; परंतु त्याच्या मृत्यूनें दुसऱ्या कित्येकांनां जे अपार क्लेश होतील त्या विचारानें त्याचें अंतःकरण अतिशय अस्वस्थ झालें होतें. अशा वार्धक्यांत एकुलत्या एका पुत्राचें निधनवृत्त ऐकून त्याचा पिता पुण्यात्मा नगेंद्रनाथ निःसंशय प्राणत्याग करील. नगेंद्रनाथाला दुसरें कोणीहि नव्हतें. भार्या नव्हती, कन्या नव्हती, दुसरा पुत्रहि नव्हता. या एका मुलाच्या मुखाकडे पाहून म्हातारा प्राण धरून राहिला होता. त्या मुलाचें निधनवृत्त कानीं पडतांच म्हातारा प्राणच सोडील. त्याचें घर शून्य होईल.

आणि त्या अज्ञान बालिकेची, त्या प्रेममूर्तीची, झोंपडींत रहाणाऱ्या त्या अनाथ, संपत्तिहीन सरलेची दशा काय होईल? सातव्या पौर्णिमेच्या आंत परत जाऊन तिला भेटण्याचें इंद्रनाथानें वचन दिलें होतें, ती सातवी पौर्णिमा निघून जाईल; आशापूर्ण दृष्टीनें मार्गप्रतीक्षा करून करून बालिका अखेरीस निराशेनें डोळे मिटील; जलाच्या अभावीं सुकून जाणाऱ्या फुलाच्या कळीप्रमाणें तिचें हृत्कमलहि अकालीं सुकून जाईल! अशा प्रकारच्या दुःखद विचारांनीं इंद्रनाथाचें मस्तक फिरूं लागलें, डोळ्यांला कांहींएक दिसेनासें झालें. मस्तकावर हात टेंकून तो गहिंवरून म्हणाला "भगवन्! तुझ्या इच्छेस येईल तें कर. भवितव्यता असेल तसें होणारच. पण या दुर्धर विचारांच्या यातना आतां कांहीं मला सहन होत नाहींत."

शत्रूंच्या छावणींत इंद्रनाथाला या प्रसंगीं जपणारें किंवा त्याची कळकळ बाळगणारें कोणीहि नव्हतें. कारागृहाभोंवतीं हातांत नागव्या तरवारी घेऊन पहारेकरी रात्रंदिवस खडा पहारा करित होते. संध्याकाळच्या वेळीं एकदा एक ब्राम्हण कांहीं खाण्याचे पदार्थ मुकाट्यानें आणून ठेवी. नंतर कांहीं वेळानें एक दासी तशीच येऊन उष्टेंखरकटें काढून ती जागा झाडूनलोटून साफ करून जाई. या दोघांखेरीज तिसऱ्या कोणाचाहि कारागृहांत प्रवेश होत नसे. नाहीं म्हणण्यास त्या छावणींत इंद्रनाथाची स्थिति

पाहून कळवळणारें एक मात्र मनुष्य होतें. रोज संध्याकाळीं उष्टेंखरकटें काढण्याला जी एक दासी येत असे म्हणून सांगितलें,तिला मात्र इंद्रनाथाचें दुःख पाहून अतिशयच दुःख होई. रोज गुपचूप येऊन ती गुपचूप आपलें काम करून जाई खरी, परंतु त्या वीराचें दुःख पाहून डोळ्यांवर पदर घेऊन ती रोज अश्रु गाळित असे. शत्रूंनीं इंद्रनाथाला अतिशय कष्टांत ठेविलें होतें. त्याला अंग टाकावयासाठीं ह्मणून जमिनीवर पसरलेलें गवत हेंच काय तें साधन होतें. त्या दयाळु दासीला हें पहावत नसे. रोज जातांना आपल्या अंगावरचें वस्त्र ती इंद्रनाथाकरितां त्या तृणशय्येवर पसरून ठेवी. इंद्रनाथाला साऱ्या दिवसांत एकदा कायतें संध्याकाळीं भोजन—तेंहि रुक्ष अन्नाचें—मिळत असे; परंतु ती दासी आपण स्वतः उपाशीं राहून इंद्रनाथाला पथ्यकर असे नाना पदार्थ आणून देई. इंद्रनाथाच्या अंगावरील जखमांकडे कोणीच पहात नसे; परंतु ती दासी रोज त्या जखमा धुऊन चोळून साफ करी; त्यांवर स्वच्छ पट्टया बांधी व आपल्यापरीनें औषधोपचारहि करी. तिच्या या प्रेमळ वर्तनानें इंद्रनाथाच्या प्रकृतीला दिवसेंदिवस आराम पडूं लागला. त्याच्या जखमाहि बऱ्या होऊं लागल्या. इंद्रनाथ नेहमीं बहुधा दुर्धर चिंतेंत मग्न असे; परंतु मधूनमधून या दासीची कळकळ आणि ममता पाहून तो चकित होई. कारागृहांत अंधकारामुळें ती दासी त्याला स्पष्ट दिसतहि नसे; कधींकाळीं त्यानें बोलण्याचा प्रयत्न केलाच तर पहारेकऱ्यांकडे ती हलकेंच बोट दाखवी. बिचारा इंद्रनाथ तत्काळ स्तब्ध होई आणि पुनः आपल्या विचारांत गढून जाई.

त्या दासीची ही स्वाभाविक ममता पाहून ते पहारेकरीहि कधींकधीं तिचा उपहास करीत आणि तिला ह्मणत "ए बिबी! हा हिंदु तुझ्याशीं शादी करणार आहे काय?"

त्या दासीला या उपहासाचा राग येत नसे. एखादे वेळीं ती त्यांनां कांहींतरी नम्रतेचें उत्तर देई आणि कधींकधींतर ती त्यांनां पिण्याकरितां मद्य आणून देई. अर्थात्, एकंदर पहारेकरी तिच्यावर

अगदीं संतुष्ट होते. सगळी रात्र उभें राहून पहारा करित असतांना कमलाप्रमाणें सुंदर दिसणाऱ्या त्या दासीचें मुख त्यांच्या डोळ्यांपुढें उभें राही आणि झोपेंतदेखील ती आणि सुंदर हातानें तिनें दिलेले मद्याचे पेले, यांचींच त्यांनां स्वप्नें पडत!

कारागृहावरील दोघांहि पहारेकऱ्यांनां आज रात्रीं मद्य पाजण्याचें त्या दासीनें अभिवचन दिलें होतें. आणि त्याप्रमाणें प्रहर रात्रीच्या सुमारास मद्य घेऊन ती तेथें आली. पहारेकऱ्यांच्या आनंदाला अर्थातच पारावार उरला नाहीं. पेल्यांवर पेले झोंकण्यांत त्या दोघांनींहि मुळींच कसूर केली नाहीं. मद्यच तें! त्यानेंहि तत्काळ आपला अमल बसविण्यास प्रारंभ केला. दोनप्रहर रात्र होते न होते तोंच दोघेहि गुंग होऊन पडले. मद्याच्या पेल्यांचीं आणि पऱ्यांच्या गाण्यांचीं त्यांनां स्वप्नें पडूं लागलीं. दासी हें पाहून कारागृहांत शिरली.

आंत तृणशय्येवर इंद्रनाथ निजला होता. त्याचें भव्य ललाट तेजःपुंज दिसत होतें. ओंठावर हास्य चमकत होतें. या दुःखसागरांत तोहि सुखस्वप्नाचा अनुभव घेत होता कीं काय? तो स्वप्न पहात होता, कीं आज पौर्णिमा आहे. युद्धांत जय मिळवून तो ऋद्रपुरास गेला आहे. बहुतां दिवसांनीं सरलेची गांठ पडल्यामुळें तिला हृदयाशीं धरिली आहे. आपल्या आनंदाश्रूंनीं सरला त्याचें वक्षःस्थल भिजवून टाकित आहे. अकस्मात् इंद्रनाथाची निद्रा भंग पावली. तो डोळे उघडून पहातो तों त्याच्या तृणशय्येजवळ उभी राहून एक स्त्री खरोखरच रुदन करित आहे! इंद्रनाथ दचकला. कारागृहांतील ती बिचारी मायाळु दासी इंद्रनाथाकडे पाहून एकसारखा अश्रुपात करित होती.

इंद्रनाथाच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्या दासीची माया आणि ममता पाहून त्याचें हृदयहि द्रवून गेलें. त्याच्या डोळ्यांतूनहि अनावर अश्रुधारा वाहूं लागल्या. तो सद्गदित कंठानें ह्मणाला

"या हतभाग्याचें दुःख पाहून तूं व्यर्थ कां दुःखी होतेस? माझ्या जिवाची कांहीं मला आतां आशा राहिली नाहीं. परमेश्वर तुला सुखी करो!"

दासीनें कांहींएक उत्तर दिलें नाहीं. ती एकसारखी रुदन करूं लागली. हें पाहून इंद्रनाथ पुनः ह्मणाला "या संकटांत तूं जी माया. ममता दाखविलीस त्याबद्दल जगदीश्वर तुला सुखी करील. तुझ्या या उपकारांची फेड करण्याला सांप्रत मजजवळ कांहींएक नाहीं. मी बंदिवान् आहें. तथापि ही माझी आंगठी मी तुला देतों, तिचा स्वीकार कर. या विपत्तींत आणि दुखण्यांत तूं जशी माझी शुश्रूषा केलीस तसेंच उद्यां मुसलमानांच्या हातून माझा वध झाला ह्मणजे ही आंगठी पाहून कधींमधीं ह्या अभाग्याची तुला आठवण होईल!"

यावरहि बराच वेळ त्या दासीनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. मस्तक खालीं करून बराच वेळ ती स्फुंदत होती. शेवटीं निस्तब्धपणें हात पुढें करून तिनें ती आंगठी घेतली आणि आपल्या गळ्यांतील माळेंत अडकवून ठेविली. नंतर कांहीं वेळानें डोळ्यांतील आंसवें पुसून टाकून ती हळूच ह्मणाली "महाराज, आपण मजवर संतुष्ट झालां आहां, आपल्या अंतःकरणांत मजविषयीं दया उत्पन्न झाली आहे याची खूण ह्मणून मी ही मुद्रिका घेत्यें, आणि या आठवणीसाठीं आजन्म ही मी जवळ ठेवीन. सेनापति इंद्रनाथ या दासीला विसरले वाटतं?"

हें काय! कोकिलेलाहि लाजविणारा तो कंठध्वनि ऐकून इंद्रनाथ दचकला आणि शय्येवर एकदम उठून बसला! वनग्रामाजवळील महेश्वराच्या मंदिरांत हा स्वर त्यानें एकवार ऐकला होता; गंगेंत नौकेमध्येंहि तो पुन्हा एकवार ऐकला होता. गंगेच्या प्रचंड प्रवाहांत बुडून मरत असतां इंद्रनाथाला जिनें वांचविलें तीच रमणी, तीच विमला आज दासीवेष धारण करून शत्रूंच्या गोटांतून इंद्रनाथाला मुक्त करण्याकरितां आली होती!

ह्या वेळीं इंद्रनाथाच्या मनांत अनेक विचार येऊं लागले. त्याचें हृदय उचंबळूं लागलें. दोन्ही नेत्र अश्रूंनीं भरून आले. शेवटीं विमलेचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन तो करुणस्वरानें ह्मणाला "आपण मनुष्य आहां कीं मनुष्यदेहधारी देवता आहां ? आपण कोण हें मी यथार्थ जाणत नाहीं, परंतु संकटसमयीं आपलें मला अखंड साह्य असतें ! भयावह शत्रूच्या या भयंकर गोटांत माझी सुटका करण्या-साठीं आपण एकट्या आलां, आपणास एक सामान्य दासी समजून मी आपल्याशीं बोलत आलों, मला जीवदान दिलेंत म्हणून आपल्या उपकाराची एका क्षुद्र मुद्रिकेनें अंशतःतरी फेड करण्यास मी उद्युक्त झालों, या सर्व अपराधांची आपण मला क्षमा कराल काय ?"

इंद्रनाथाच्या भाषणानें विमलेच्या कर्णरंध्रांत जणूं अमृतवर्षाव झाला. इंद्रनाथाच्या हस्तस्पर्शानें तिचे हृदयांत आनंद मावेनासा झाला. गात्रें रोमांचित झालीं. परंतु विमला दूरदृष्टि होती. मोठ्या कष्टानें आत्मसंयमन करून तिनें हळूच इंद्रनाथाच्या हातांतून आपले हात सोडवून घेतले आणि शांत स्वरानें ह्मटलें "वीरश्रेष्ठा ! आपला कांहींएक अपराध नाहीं. मी दासीवेषानं इथं आल्यें असतांहि आपण मला पराकाष्ठेच्या सौजन्यानं वागविलं. आपण दिलेली खूण ही आपली मुद्रिका मी आपल्या स्मरणार्थ आजन्म धारण करीन. आपल्या या स्नेहाचं मला आजन्म स्मरण राहील. परंतु हें बोलत बसण्याला आतां अवकाश नाहीं; सध्या मी दुसरंच कांहीं सांगण्या-करितां इथं आल्यें आहें. आपली इथून सुटका करण्याला मीं कांहीं उपाय योजला आहे. बाहेर पहारेकरी मद्याच्या धुंदींत बेशुद्ध पडले आहेत, तर आपण हा स्त्रीवेष धारण करून एकदम इथून निघून जा. बाहेर कुणी शिपायानं कदाचित् विचारलंच तर दासी आहें असं सांगा ह्मणजे झालं."

विमलेचें हें भाषण ऐकून इंद्रनाथ थक्क झाला. तिचें साहस आणि दृढसंकल्प पाहून तो पराकाष्ठेचा विस्मित झाला. परंतु क्षणभर विचार करून ह्मणाला "देवि! क्षमा करा. आपल्याला या विपत्तींत ढकलून माझी मुक्तता करून घेण्याची मला इच्छा नाहीं. अशा युक्तीनें आपण माझी मुक्तता केली हें समजल्यावर हे अधम आपला निःसंशय प्राण घेतील."

"माझ्याविषयीं आपण काळजी करूं नका. माझी इथून सुटका होण्याला पुष्कळ उपाय आहेत; आणि कदाचित् माझी सुटका झाली नाहीं तरीहि त्याची मला पर्वा नाहीं. माझ्यासाठीं काळजी करित बसणारीं, माझ्यासाठीं शोक करणारीं माणसं या जगांत फारशीं नाहींत. अफाट सागरामध्यें एक जलबिंदु जसा लीन होऊन जातो तद्वत् या अनंत जगांत माझ्यासारख्या एकट्या हतभागिनीचा मृत्यु कोणासहि समजणार नाहीं, कोणाच्याहि ध्यानांत येणार नाहीं, कोणालाहि त्याबद्दल कांहीं वाटणार नाहीं. आपण यशस्वी, क्षमाशील व वीर पुरुष आहां, आपण सुखी राहिल्यानं अनेक सुखी होतील."

इंद्रनाथ तीव्र दृष्टीनें विमलेकडे पाहूं लागला. आणि शेवटीं शांत स्वरानें ह्मणाला "देवि! माझी सुटका करण्याला आपण तयार झालां आहां याबद्दल मी आजन्म आपला ऋणी आहें; परंतु आपल्याला या ठिकाणीं ठेवून मी या कारागृहांतून बाहेर पडणार नाहीं. आपण मला भलताच आग्रह करूं नका."

विमलेनें नानाप्रकारें विनवणी केली, अनेक कारणें दाखविलीं, परोपरीनें त्याची समजूत घालण्याचा यत्न केला, परंतु व्यर्थ. त्या वीर-पुरुषाची प्रतिज्ञा कांहींकेल्या ढळेना. सर्वांला त्याचें एकच उत्तर! "जिनें एकवार माझे प्राण वांचविले, पुनः माझी सुटका करण्याकरितां जिनें इतके कष्ट सोसले तिला दुःखांत ढकलून सुटका करून घेण्याची मला मुळींच इच्छा नाहीं. अशा जीवनांत मला पुरुषार्थ वाटत नाहीं!"

शेवटीं अगदीं नाइलाज झाला हें पाहून विमला अत्यंत कष्टानें ह्मणाली "महाराज, आपल्या प्रेमास पात्र झालेली आपली सरला हल्लीं चतुर्वेष्टित दुर्गामधें बंदिवान होऊन पडली आहे हें मला वाटतं आपल्याला माहितच नाहीं? आपण तिची त्वरित सुटका केली तर ठीक, नाहींपेक्षां तो चांडाळ शकुनि तिचा आपल्या एका सेवकाबरोबर विवाह करून देणार आहे."

इंद्रनाथाच्या मस्तकावर जणूं अकस्मात् वज्राघात झाला. त्याच्या सर्व शरिराला कंप सुटला; कपाळाला दरदरून घाम सुटला. विमलेनें हळुहळू त्याला सर्व वृत्तांत सांगितला. इंद्रनाथानें स्तब्धपणें तो ऐकून घेतला आणि तळहातावर मस्तक टेकून तो शून्य दृष्टीनें खालीं पहात राहिला. त्याच्या कपाळावरील शिरा फुगून तट्ट झाल्या. डोळे रक्तासारखे लाल झाले.

बऱ्याच वेळानें मस्तक वर करून तो ह्मणाला "देवि! तुमच्या ह्मणण्याप्रमाणेंच होऊंद्या. मी इथून पळून जाण्यास कबूल आहें; परंतु मला एक वचन द्याल तर!"

"वचन! कशाबद्दल?"

"उद्यां आपली सुटका झाली नाहीं, आणि जर का या दुष्टांनीं आपला वध करण्याचें निश्चित केलें, तर मासुमीची प्रार्थना करून आपण तीन दिवसांचा अवधी मागून घ्याल, असें कबूल करा. मी मासुमीला पूर्णपणें ओळखतों. आपल्यासारख्या अबलेची याचना तो कधींहि अमान्य करणार नाहीं. या तीन दिवसांत काय पाहिजे तें करतां येईल."

विमलेनें ही गोष्ट कबूल केली. इंद्रनाथाचें समाधान झालें.

नंतर विमलेनें त्याला स्त्रीवेष चढविला. आपला हा नूतन वेष पाहून इंद्रनाथ हंसूं लागला. त्यानें पुन्हा विमलेकडे पाहिलें तोंच त्याचें

हृदय पुन्हा उद्विग्न झालें. विमलेचे दोन्ही हात मोठ्या आदरानें आपल्या हातांत धरून तो सद्गदित स्वरानें हाणाला "देवि ! दोन वेळां आपण माझें प्राणरक्षण केलें. आपलें ऋण फेडण्याचा मी मनोभावानें यत्न करीन, जगदीश्वर मला साह्य करो!"

बोलतांबोलतां इंद्रनाथाचे उष्ण श्वास विमलेच्या खांद्यांवर पडूं लागले. त्याच्या ओष्टद्वयांनीं विमलेच्या करपल्लवांनां स्पर्श केला. वायूच्या तडाक्यांत सांपडलेल्या लतापल्लवांप्रमाणें विमलेचीं गात्रें कांपूं लागलीं. तिचे पाय कांपूं लागले. क्षणार्धांत इंद्रनाथ अदृश्य झाला. विमला आपल्या कपाळावरील घर्मबिंदु पुसून काढून त्या अंधकारमय कारागृहांत बसून राहिली. रात्रीच्या वेळीं संपूर्ण जगत् दुर्भेद्य अंधकारानें व्याप्त झालें होतें, त्याचप्रमाणें विमलेचें कोमल हृदयहि दुर्भेद्य अंधकारानें व्याप्त होऊन गेलें होतें.

## प्रकरण ३० वें.

## विमलेची सुटका !

Heard ye the din of battle bray,
Lance to lance and horse to horse.

*Grey.*

इंद्रनाथ अकस्मात् छावणींत परत आलेला पाहून त्याच्या सैन्यांतील लोकांनां अपार आनंद आणि विस्मय वाटला; परंतु इंद्रनाथ त्यांनां गंभीर स्वरानें ह्मणाला "सध्या आनंद करित बसण्याची किंवा विस्मित होऊन रहाण्याची वेळ नाहीं. आपापलीं शस्त्रास्त्रें घेऊन एकदम सज्ज व्हा. आत्तांच्या आत्तां गुपचूप जाऊन शत्रूच्या छावणीवर छापा घातला पाहिजे."

इंद्रनाथाचें सैन्य अधिकच विस्मित झालें; परंतु एक शब्दहि न उच्चारतां सर्वजण आपापलीं शस्त्रास्त्रें घेऊन सज्ज होऊं लागले. या अवकाशांत इंद्रनाथ जगदीश्वराची आराधना करूं लागला. साष्टांग दंडवत घालून तो मनोभावानें ह्मणाला "भगवन्! आजच्यासारखें भयंकर साहसाचें कार्य मीं कधींहि अंगावर घेतलें नव्हतें. तुझ्या कृपेवांचून ही असाध्य गोष्ट साध्य होणार नाहीं. तरी हे दयामय प्रभो! मजवर प्रसन्न हो, मला साह्य हो. तुझी कृपा असेल तर यांत मला खात्रीनें जय मिळणार आहे. माझ्या उपकारकर्त्रीची मुक्तता करण्याच्या कामीं माझा प्राण गेला तरी बेहेत्तर, परंतु हे कृपाळू परमेश्वरा! तिची त्वरित सुटका होऊंदे."

तीन प्रहर रात्र होऊन गेली. चंद्र अस्तास गेला. चाऱ्ही दिशा घोर अंधकारानें व्याप्त झाल्या. आकाशांत एखाददुसरी चांदणी मधूनमधून चमकूं लागली होती. मधूनमधून पुन्हा ती मेघराशींत गुप्त होत होती. मधूनमधून घुबडाचा भीषण घूत्कार ऐकूं येत होता तर मधूनमधून गंगेचा गभीर कल्लोळ कानीं पडत होता. त्या घोर अंधकारांतून इंद्रनाथाचें सैन्य शत्रूच्या गोटाकडे निःशब्द चाललें होतें.

याप्रमाणें कांहीं वेळ जातांजातां अकस्मात् दूर एक कसलासा प्रकाश त्यांच्या दृष्टीस पडला. तो प्रकाश मधूनमधून दिसे आणि मधूनमधून दिसेनासा होई. इंद्रनाथानें आपलें सैन्य उभें केलें आणि हें काय आहे याचा तपास करण्यासाठीं एक दूत पुढें पाठविला. दूत गुपचूप जाऊन थोड्याच वेळांत परत आला आणि सांगूं लागला कीं शत्रूपक्षांतील चौघे पहारेकरी या ठिकाणीं पहारा करित आहेत. हें ऐकतांच आपल्या सैन्यापैकीं दहा तिरंदाजांनां समोर बोलावून इंद्रनाथ ह्मणाला "तुह्मी पुढें जा आणि लक्ष्यांत ठेवा कीं त्या चौघांपैकीं शत्रूला आपल्या छाप्याची बातमी देण्याकरितां जर एक जण निसटून गेला तर तुम्हां दहाजणांचा शिरच्छेद करीन!" तिरंदाज तत्काळ तेथून निघाले आणि एका अर्ध्या घटकेच्या आंत त्या चौघांहि पहारेकऱ्यांनां त्यांनीं जीवन्मुक्त केलें. त्याबरोबर इंद्रनाथाचें सैन्य पुनः पुढें चालूं लागलें.

आणखीहि दोनतीन ठिकाणीं असाच पहारा होता; परंतु त्या पहारेकऱ्यांचीहि याप्रमाणेंच व्यवस्था लागली. इंद्रनाथाचें सैन्य शत्रूच्या छावणीभोंवतीं असलेल्या खंदकाशीं येऊन बिनबोभाट थडकलें. खंदक ओलांडून पार जाण्याचा इंद्रनाथानें तत्काळ हुकूम दिला.

खंदकाच्या आंतल्या बाजूस पहाऱ्यावर असलेल्या मुसलमान लोकांनां या अकस्मात् आलेल्या छाप्याची चाहूल लागली आणि ते आपापलीं शस्त्रास्त्रें सज्ज करूं लागले; परंतु ते सज्ज होऊन आडवे येण्याच्या अगोदरच इंद्रनाथ सैन्यासह खंदक ओलांडून आंत आला आणि त्या लोकांवर तुटून पडून त्यानें त्यांनां छिन्नभिन्न करून त्यांचा विध्वंस केला. नंतर आपलें सर्व सैन्य त्या खंदकाच्या मार्गाचें रक्षण करण्यास ठेवून फक्त पन्नास लोक बरोबर घेऊन इंद्रनाथ मोठ्या लगबगीनें कारागृहाकडे आला.

कारागृहाच्या बाहेरल्या बाजूस शिपाई लोक पहारा करित होते. इंद्रनाथ अद्यापिहि कारागृहांत बंदिवान् आहे असा त्यांचा समज होता. इतक्यांत इंद्रनाथाचा वज्रनाद अकस्मात् त्यांच्या कानीं आला. आणि हें काय ह्मणून ते पहातात तोंच इंद्रनाथानें त्यांच्यावर हल्ला केला. त्याबरोबर दुसरातिसरा विचार न करितां त्यांनीं तेथून 'यःपलाय' केलें. इंद्रनाथ नंतर आंत शिरला. मद्यप्राशनानें धुंद झालेले ते दोघेहि पहारेकरी अद्यापिहि अचेतनच पडले होते. जवळ एक दिवा जळत होता. तोच दिवा हातांत घेऊन इंद्रनाथ विमला होती त्या खोलींत शिरला. त्या अंधकारपूर्ण कारागृहांत तृणशय्येवर आपला कोमल देह टाकून विमला निजली होती. श्वासोच्छ्वासामुळें तिचें वक्षःस्थल हळुहळू वरखालीं होत होतें.

क्षणभर स्तब्ध राहून इंद्रनाथानें प्रथम परमेश्वराचे सजलनेत्रांनीं शतशः आभार मानिले. आणि नंतर त्या तृणशय्येवरून विमलेला हळूच उचलून घेऊन तो कारागृहांतून बाहेर पडला. थोड्याच वेळांत विमला जागी झाली आणि इंद्रनाथाला ओळखून ह्मणाली "रणधुरंधर इंद्रनाथांनीं माझ्या सुटकेसाठीं इतक्या त्वरेनं परत येणं केलं काय? परमेश्वर आपलं कल्याण करील! मला आतां मृत्युमुखीं पडावं लागणार हें मी खास समजून चुकल्यें होत्यें आणि त्याला मी सिद्धहि होत्यें. मरण्यापूर्वी बाबांची एकवार भेट होत नाहीं ह्मणून मात्र कायतें मला फार वाईट वाटत होतं. इंद्रनाथ, आपण माझी सुटका करा, मी आपल्या बाबांनां आणखी एकवार भेटेनतरी."

हे शेवटचे शब्द ती अशा कांहीं करुणस्वरानें ह्मणाली कीं इंद्रनाथाचें अंतःकरण भडभडून आलें. त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. परंतु विमलेला उत्तर देण्याला त्याला त्यावेळीं अवकाश नव्हता. बाहेर येऊन इंद्रनाथ घोड्यावर बसला. विमलेला उचलून घेऊन त्यानें आपल्या मागें बसविलें; आणि ती पडेल या भीतीनें तिला आपल्या पाठीला बांधून टाकिलें.

खंदकाच्या ज्या तोंडाशीं त्याचे स्वार रक्षण करित उभे होते तेथें इंद्रनाथ विद्युत्वेगानें आला. इतक्यांत तीनचार हजार शत्रुसैन्य कृष्णवर्ण मेघांप्रमाणें सज्ज होऊन येत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याबरोबर सैन्यासह तो तत्क्षणींच खंदक ओलांडून तांतडीनें आपल्या छावणीकडे फिरला; आणि शत्रुसैन्य जवळ येऊन लगट करण्यापूर्वीच मुंगेरीस येऊन सुरक्षितपणें दाखल झाला.

सैन्यांत जिकडेतिकडे जयजयकार होऊं लागला. इंद्रनाथ शत्रूच्या कारागृहांतून सुटला, सुटल्याबरोबर त्यानें शत्रूवर हल्ला केला, आपले पांचशें स्वार बरोबर घेऊन शत्रूच्या छावणीभोंवतालचा खंदक ओलांडून तो आंत गेला आणि शत्रूवर एकदम छापा घालून त्यांचा धुव्वा उडवून परत आला, अशी बातमी हां हां म्हणतां जिकडे-तिकडे पसरून मोंगल सैन्य आनंदानें बेहोष झालें. राजा तोडरमल्लांनीं मोठ्या प्रेमानें इंद्रनाथाला आलिंगन दिलें. त्यानें आपली सुटका कशी करून घेतली हें विचारण्याचें त्या गडबडींत कोणालाच सुचलें नाहीं आणि कोणाला अवकाशहि मिळाला नाहीं. त्यामुळें अर्थातच कित्येक स्वारांखेरीज विमलेची हकीगत कोणालाच समजली नाहीं. रात्रीच्या रात्रीं विमला आपल्या पित्याच्या घरीं निघून गेली.

## प्रकरण ३१ वें.

## पापाचें प्रायश्चित्त.

Out! Out! brief candle!

*Shakespeare.*

मागील प्रकरणांतील हकीगत घडल्यानंतर दोनतीन दिवसांनीं संध्याकाळच्या वेळीं राजा तोडरमल्ल आणि इंद्रनाथ, हे दुर्गाच्या तटावर बोलतबोलत फिरत होते. दोघांचें बराच वेळ संभाषण चाललें होतें. अर्थात् तें चालू युद्धाविषयींच होतें. राजा तोडरमल्ल इंद्रनाथाची शत्रूवर एकदम तुटून पडण्याची मसलत ऐकून ह्मणाले "इंद्रनाथ, युद्धामध्यें केवळ साहसच उपयोगी पडत नाहीं; कौशल्यहि आवश्यक आहे."

"परंतु महाराज, दुर्ग सोडून शत्रूशीं समोरासमोर तोंड देण्यास आह्मी प्रवृत्त झालों तर आमचा पराजय होईल असेंतर नाहींना आपल्याला वाटत?"

"तुह्मीं जर नेटानेंच युद्ध केलेंत तर वेळेस नाहीं तुमचा पराजय होणार; परंतु असें युद्ध कितीजण करतील?"

"तर मग महाराज, अशा स्थितींत दुर्गाच्या आंततरी किती दिवस बसून रहायचें?"

"आतां फार दिवस बसायला नको. ती पहा समोरून एक शिबिका येत आहे. तींत बसून येणारे गृहस्थ आतांच आपल्याला अशी बातमी देतील कीं, शत्रूचा थोड्याच दिवसांत निकाल लागेल; युद्ध केल्याविना आपल्याला जय मिळेल."

इंद्रनाथ चकित झाला. हें काय आहे हें त्याच्या लक्ष्यांत येईना. तो ह्मणाला "महाराजांचें रणकौशल्य जगविख्यात आहे; परंतु महाराजांनां भविष्यहि वर्तवितां येतें, हें मात्र मला माहित नव्हतें!"

ती शिबिका इतक्यांत जवळ येऊन पोहोंचली आणि बंगदेशाचे दिवाण सतीशचंद्र तींतून खालीं उतरले. त्यांनां पाहूनतर इंद्रनाथ अधिकच विस्मित झाला.

सतीशचंद्राबरोबर राजा तोडरमल्लांचें झालेलें संभाषण येथें विस्तृतपणें सांगण्याची आवश्यकता नाहीं. राजा तोडरमल्लांनीं सतीशचंद्राला बंगाल्यांतील प्रमुख प्रमुख हिंदु जमीदारांकडे पाठविलें होतें. सतीश मोठा कार्यदक्ष, वाक्पटु आणि अत्यंत बुद्धिमान् होता. त्यानें त्या सर्व जमीदारांनां नानातऱ्हेचीं कारणें दाखवून त्यांनां एकएकाला शत्रुपक्ष सोडावयास लावून दिल्लीश्वराचा पक्ष अवलंबन करावयास लाविलें. "अकबरशहाचा हिंदु लोकांवर फार लोभ आहे; त्यानें हिंदु लोकांवरील अन्यायानें बसविलेले अनेक कर उठवून टाकले आहेत. हिंदु लोकांच्या शास्त्रांचा त्यानें अभ्यास केला आहे; एका हिंदु स्त्रीशीं त्यानें विवाह केला आहे; हिंदुलोकांच्या अनेक चालीरीतींचें त्यानें अनुकरण केलें आहे; आपल्या या बंगदेशांतच पहाना, त्यानें हिंदु सेनापति व सुभेदार पाठविले आहेत; विजयलक्ष्मीतर जणूं छायेप्रमाणें त्या सेनापतीच्या पाठीशीं आहे. यापूर्वीं दोन वेळां त्यानें बंगदेश पादाक्रांत केला आहे आणि या खेपेलाहि तो करणारच. एकदा का आतां त्यानें जय मिळविला, कीं बंडखोर जमीदारांचें पुरतेपणीं शासन केल्याविना तो रहाणार नाहीं; परंतु आतां त्याला साह्य केल्यास तो क्षत्रिय महात्मा हे उपकार कधींहि विसणार नाहीं." अशा नानातऱ्हेच्या गोष्टी सांगून आणि त्याचप्रमाणें लालुच आणि भय दाखवून सतीशचंद्रानें अनेक जमीदारांनां दिल्लीश्वराच्या पक्षास वळवून घेतलें होतें. या जमीदारांनीं यापुढें बंडखोरांनां धान्यसामुग्री किंवा रसद न पोहोंचविण्याचें कबूल केलें होतें. असें झालें ह्मणजे अर्थातच बंडखोरांनां अन्नाची पंचाईत पडेल; आणि पांचचार दिवसांत ते युद्ध करण्याचें सोडून देऊन भागलपुरांतून आपलें ठाणें उठवितील आणि दाही दिशा भटकत फिरतील यांत तिळमात्र संदेह नव्हता.

सतीशचंद्राला मोठ्या सन्मानानें निरोप दिल्यानंतर राजा तोडरमल्ल इंद्रनाथाकडे वळून ह्मणाले "कां इंद्रनाथ! मी ह्मणालों तें खरें कीं खोटें?"

"महाराज," इंद्रनाथ आदरपूर्वक ह्मणाला "युद्धांत आपण ज्या-प्रमाणें अजिक्य आहां, त्याप्रमाणेंच राजकारणांतहि आपण अद्वितीय आहां! परंतु–"

"परंतु काय?" इंद्रनाथाकडे पाहून तोडरमल्लांनीं विचारलें.

"नाहीं, कांहीं नाहीं. माझी कांहीं कुणाच्या विरुद्ध बोलण्याची इच्छा नाहीं. परंतु सतीशचंद्राच्या सर्व बोलण्यावर महाराजांचा विश्वास आहे काय?"

"आमच्या तरुण सेनापतींची मला वाटतें आज मला राजनीति शिकविण्याची इच्छा आहे! कोणावर विश्वास ठेवावा आणि कोणावर ठेवूं नये हें मजपेक्षांहि इंद्रनाथाला चांगलें समजतें का?"

"महाराजांनीं माझ्या बोलण्याचा राग मानूं नये; परंतु निदान या सतीशचंद्राच्या संबंधानेंतरी महाराजांपेक्षां मला कांहीं अधिक माहिती आहे."

"कदाचित् असेल! परंतु इंद्रनाथाला जितकी माहिती आहे तितकी मलाहि कदाचित् असेल. इंद्रनाथ, तुमच्या मनांत सध्या कोणती गोष्ट आली आहे हेंदेखील कदाचित् मला सांगतां येईल."

आश्चर्यानें थक्क होऊन इंद्रनाथ राजा तोडरमल्लांकडे पहात राहिला; तोडरमल्ल पुनः स्मित हास्य करित ह्मणाले "याच सतीशचंद्रानें राजा समरसिंहाचा प्राण घेतला ही गोष्ट यावेळीं इंद्रनाथाच्या मनांत घोळत आहे."

विस्मयानें इंद्रनाथ हतबुद्धच झाला. "महाराज! मला क्षमा करा, आपण अंतर्ज्ञानी, व सर्वज्ञ आहां!"

तोडरमल्ल यावर गंभीरस्वरानें ह्मणाले "इंद्रनाथ! केवळ तो जगदीश्वर सर्वज्ञ आहे; परंतु दिल्लीश्वराचा सेनापति चोहोंकडचें अनुसंधान ठेवल्याविना कोणत्याहि कार्याला प्रवृत्त होत नाहीं. युद्धकर्मीत माझे हे काळ्याचे पांढरे केश झाले आहेत; भगवंताच्या कृपेनें कांहीं युद्धकौशल्यहि मी शिकलों आहें."

क्षणभर स्तब्ध राहून इंद्रनाथानें नम्रतेनें विचारिलें "महाराज! तरमग राजा समरसिंहांच्या वधासंबंधीं आपणाला सर्व कांहीं ठाऊक असेलच?"

"होय," तोडरमल्ल गंभीरस्वरानें ह्मणाले "मला तें सर्व ठाऊक आहे, आणि योग्य वेळीं मी त्याची चौकशीहि करणार आहें. प्रत्यक्ष माझ्या पुत्राची हत्या करणारासहि मी एक वेळ क्षमा करीन, परंतु राजा समरसिंहाची हत्या करणाराला मजकडून कालत्रयीं क्षमा होणार नाहीं!"

*   *   *   *   *

त्याच दिवशीं प्रहर रात्रीच्या सुमारास सतीशचंद्र गंगातटाकीं फिरत होता. आज राजा तोडरमल्लांनीं त्याचा फार सन्मान केल्यामुळें त्याचें हृदय उल्हासानें परिपूर्ण झालें होतें. आशेनें आपलें कपटजाल त्याच्या अंतःकरणावर पसरिलें होतें. "पापाचें प्रायश्चित्त भोगावें लागेल म्हणून तूं घाबरला होतास नाहीं का? अरे पण वेड्या! त्या पातकाचा पत्ता कुणाला लागला आहे? कसचा दंड आणि कसचें प्रायश्चित्त घेऊन बसला आहेस तूं? दंडाच्याऐवजीं आतां दिवसेंदिवस तुझा मानसन्मान वृद्धिंगत होणार, तुझी योग्यताहि वाढत जाणार!" असें सूर्यास्तापासून कपटी आशा त्याच्या कानांत एकसारखी गुणगुणत होती; परंतु तोच सूर्य दुसरे दिवशीं पुनः उदयाचलावर येण्याच्या पूर्वीच बिचाऱ्या सतीशचंद्राला आशेच्या कपटरूपाचा, तिच्या इंद्रजालाचा, खोटेपणाचा पूर्ण प्रत्यय आला.

चंद्रप्रकाशांत गंगातटाकीं सहल करतांकरतां एक भयंकर काळीकुट्ट आकृति हातांत सुरा घेऊन वेगानें आपल्याकडे धावत येत आहे, असें अकस्मात् त्याच्या दृष्टीस पडलें. ती आकृति पहातांच सतीशचंद्र घाबरला आणि तेथून पळून जाण्याचा त्याचा बेत होतो न होतो तोंच त्या मारेकऱ्यानें क्षणार्धात त्याला गांठलें आणि आपल्या हातांतील तीक्ष्ण सुरीनें त्याच्यावर तत्काळ घाव घातला. इतक्यांत सतीशचंद्राचे नोकरचाकर धावून आले आणि त्यांनीं आपल्या तरवारींनीं त्या मारेकऱ्याला जमिनीवर लोळविलें.

मृतप्राय झालेला तो मारेकरी ह्मणाला "सतीशचंद्र! मी आतां थोड्या वेळाचा सोबती आहें; पण आपलाहि मृत्यु सन्निध आला आहे. आपण तयारीला लागा."

"चांडाळा! नराधमा!" सतीशचंद्र दांतओंठ खाऊन ह्मणाला "त्या परमेश्वराच्या कृपेनें तुझा दुष्ट हेतु तडीस गेला नाहीं. तुझा घाव नुसता निसटता बसला आहे."

"अरेरे! सतीशचंद्र महाराज! या दुष्टाचें बोलणें अगदीं खरें आहे. माझी सुरी जरी आपल्याला निसटती बसली आहे तरी ती आपला प्राण घेतल्याविना रहाणार नाहीं. तिला विष लाविलेलें आहे. महाराज, या घातक्याला अद्यापि आपण ओळखलें नाहीं का?"

हा मारेकरी म्हणजे सतीशचंद्राचाच एक जुना नोकर होता. सतीशचंद्रानें त्याला तत्क्षणींच ओळखलें आणि त्वेषानें ह्मटलें "चांडाळा, ही असली स्वामिभक्ति तुला कोणीं शिकविली?"

तो नोकर अडखळत अडखळत ह्मणाला "महाराज, तोच-तोच दुष्ट चांडाळ शकुनि! त्यानेंच-"

त्याच्यानें पुढें बोलवेना. शकुनीचें नांव ऐकतांच सतीशचंद्राच्या अंगाचा भडका झाला. तो ह्मणाला "मलाहि वाटलेंच होतें कीं, हें त्याच चांडाळाचें कृत्य असावें. त्याच्यासारखा भयंकर पातकी

या पृथ्वींततर नाहींच नाहीं, परंतु रौरव नरकांतहि आढळणें अशक्य आहे. परंतु चांडाळा, तूं माझा फारा दिवसांचा नोकर आणि तूंच माझा प्राण घ्यायाला कसा सिद्ध झालास?"

आतांतर अगदींच खोल आवाजानें आणि अत्यंत कष्टानें तो नोकर ह्मणाला "त्या शकुनीनें मला लोभ दाखवून फसविलें–लोभाला मी बळीं पडलों–लोभानें मीं हें अघोर पाप केलें–प्राणाला मुकलों–"

पुढें कांहीं त्याच्या मुखांतून शब्द निघाला नाहीं. प्राणवायु शरीरांतून निघून गेला. ओंठ किंचित् हालल्यासारखे करून स्थिर झाले. दृष्टि ऊर्ध्व झाली.

चंद्रप्रकाशांत त्या मृतदेहाला पाहून सतीशचंद्र आपल्याशींच ह्मणाला "बाबारे, तुलाच कांहीं दोष द्यायला नको! मोठमोठे ज्ञानी देखील या लोभाला बळी पडून ज्ञानशून्य बनतात; तुझ्यापेक्षां भयंकर अपराध करण्यास प्रवृत्त होतात. तुझ्यासारखें स्वस्थपणें मरणदेखील त्यांनां येत नाहीं. जा, परमेश्वर तुला क्षमा करो. या हतभाग्याच्या पापाला मात्र क्षमा नाहीं!"

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं राजा तोडरमल्लांनां मोठ्या तांतडीचा निरोप आला कीं, दिवाण सतीशचंद्र मरणोन्मुख होऊन पडले आहेत. निरोप ऐकतांच तोडरमल्ल सतीशचंद्राच्या भेटीला आले. इंद्रनाथहि बरोबरच होता.

पहातात तों सतीशचंद्र शय्येवर पडला होता. मोठमोठे नामांकित चिकित्सक भोंवतालीं जमले होते. परंतु ज्या जालीम विषाचा सतीशचंद्राच्या शरीरांत प्रवेश झाला होता त्याच्यापुढें कोणाची कांहीं मात्रा चालेना. त्या विषाचा उतारा कोणाजवळहि नव्हता. या आकस्मिक आणि अद्भुत घटनेचें कारण राजा तोडरमल्लांनीं विचारलें. तेव्हां जवळ असलेल्या मंडळीनें सविस्तर वृत्तांत त्यांनां निवेदन केला. इतक्यांत सतीशचंद्र अति क्षीण स्वरानें बोलूं लागला "महाराज! मी घोर पातकी आहें, मला क्षमा करा."

तोडरमल्ल कांहींएक बोलले नाहींत. हें पाहून सतीशचंद्र पुन्हा ह्मणाला "महाराज! मीं घोर अपराध केला आहे, आपण मला तो अपराध क्षमा करा."

तरीहि तोडरमल्ल स्तब्धच राहिले. सतीशचंद्र पुन्हा म्हणाला "महाराज, आपण बोलत नाहीं! मीं नरहत्या केली आहे. परंतु सर्व अपराधांनां क्षमा आहे; मलाहि क्षमा करा. या मृत्युशय्येवर आपली प्रार्थना करून मी क्षमा मागतों. माझी एवढी याचना पूर्ण कराच."

सतीशचंद्राची ती केंविलवाणी मुद्रा पाहून आणि तो करुणस्वर ऐकून तोडरमल्लांचें अंतःकरण गहिंवरलें. ते म्हणाले "राजा समरसिंहाचा वध करणाराला मी क्षमा करीन असें स्वप्नांतहि मला वाटलें नव्हतें; परंतु काय करणार? त्या जगन्नियंत्यानें तुला तुझ्या घोर पातकाबद्दल शासन केलेंच आहे; जा, मी तुला क्षमा करतों. आतां फार वेळ तूं जगशीलसें दिसत नाहीं, याकरितां त्या भगवंताचें स्मरण कर. तो प्रभू पूर्ण दयामय आहे. मृत्युकाळीं त्याच्या पवित्र नांवाचा उच्चार केल्यास अखिल जन्मांचीं पातकें दग्ध होतात."

चकित होऊन सतीशचंद्र राजाकडे पाहूं लागला. तो म्हणाला "महाराज! एकूण समरसिंहाच्या वधाची एकंदर हकीगत आपल्याला माहित आहे?"

"होय; मला ती सर्व माहित आहे." तोडरमल्ल शांतपणें ह्मणाले. हें ऐकून सतीशचंद्र पराकाष्ठेचा विस्मित होऊन स्तब्ध राहिला. बऱ्याच वेळानें तो पुन्हा ह्मणाला "महाराज! मला कांहीं सांगायचें आहे. मी पापी तर खराच; परंतु जन्मापासून कांहीं मी पापीच नव्हतों. तारुण्यांतदेखील मीं आपल्या चारित्र्याला कधीं कलंक लागूं दिला नाहीं. शुद्ध हेतु, पवित्र विचार आणि उदात्त कल्पना माझ्या अंतःकरणांत सदा वास करित होत्या. परंतु महाराज! लोभाला—

महालोभाला किं हो मी बळी पडलों–सर्वस्वाला अंतरलों–जीवित पापमय करून टाकलें आणि आज अखेरीस प्राणालाहि मुकलों!"

सतीशचंद्राचा क्षीण स्वर अधिकच क्षीण होऊं लागला. जीभ कोरडी पडली. त्याच्यानें पुढें बोलवेना. हें पाहून तोडरमल्लांनीं स्नेह-भरानें त्याच्या तोंडांत थोडें दूध घातलें. सतीशचंद्राचे कोरडे पडलेले ओंठ पुन्हा ओलसर झाले. तो पुन्हा बोलूं लागला "मीतर पापी खराच, परंतु मजपेक्षांहि एकजण घोर पापी आहे! महाराज, माझा आश्रित शकुनि यानेंच वास्तविक समरसिंहाचा वध केला, माझाहि वध आज त्यानेंच केला आहे, आपण याची चौकशी करालच."

तोडरमल्लांचे डोळे रागानें लाल झाले. परंतु आपला राग आवरून ते हळुहळू ह्मणाले "कांहीं हरकत नाहीं. तो जगच्चालक पाप्याला दंड करीलच करील!"

कांहीं वेळपर्यंत मग कोणीच कांहीं बोललें नाहीं. सर्वत्र स्तब्धता पसरून राहिली. सतीशचंद्राचा श्वासोच्छ्वास जड येऊं लागला. त्याची प्राणज्योति निर्वाण होण्याच्या बेतांत आली. तो अत्यंत क्षीण आणि कातर स्वरानें म्हणाला "माझी मु–ल–गी मा–झी ला–ड–की वि–मला–"

परंतु पुढचे शब्द तोंडांतल्या तोंडांतच राहिले. एकदम त्याची वाचा बंद झाली.

तोडरमल्लांनीं पुन्हा आपल्या बोटानें त्याच्या ओंठांनां दूध लाविलें; पुन्हा त्याचे ओंठ हालूं लागले. तो पुन्हा अगदींच खोल आवाजानें ह्मणाला "विमले, तूं दुर्दैवी! आई तुला नाहींच! आज मीहि तुला सोडून जात आहें! आज तूं पितृहीन–"

इतकें तो ह्मणत आहें तोंच बाजूच्या एका खोलींतून एका स्त्रीचा हृदयविदारक आर्तस्वर ऐकू आला; तो स्वर ऐकतांच सतीश-चंद्राचे निस्तेज झालेले नेत्रहि पाण्यानें भरून आले. क्षणार्धांत विमलेनें धावत येऊन सतीशचंद्राच्या गळ्याला मिठी मारिली. कितीतरी

परकी मंडळी त्यावेळीं तेथें होती परंतु तिकडे लक्ष्य देण्याचें भान अशा वेळीं कोणास रहाणार?

आपल्याला संकटांतून वांचविणारी रमणी ही सतीशचंद्राची कन्या विमला, हें इंद्रनाथाला आतां समजलें. त्याला मोठें आश्चर्य वाटलें.

पित्याला आलिंगन देऊन विमला नंतर त्याच्या पायांवर मस्तक ठेवून निस्तब्ध अश्रुवर्षाव करूं लागली. त्या पवित्र आलिंगनानें सतीशचंद्राचें हृदय जणों उद्वेगशून्य झालें. मुखमंडलावर शांतता दिसूं लागली. दोन्ही डोळे कायमचे मिटून घेऊन तो महानिद्रेंत मग्न झाला.

त्या मृत देहाच्या गळ्यांत गळा घालून विमला उच्चस्वरानें रुदन करूं लागली. विमलेच्या डोळ्यांतील तेज आज नष्ट झालें. चोहोंकडे तिला अंधकार दिसूं लागला. तिचें हृदय विदीर्ण झालें. जगत् तिला शून्य झालें.

तो हृदयभेदक देखावा पाहून राजा तोडरमल्लांनीं आपल्या डोळ्यांवर हात धरिला आणि ते तेथून उठून बाहेर आले. इंद्रनाथ आपल्या तरवारीवर शरीराचा भार टाकून एखाद्या बालिकेप्रमाणें सारखे अश्रु गाळूं लागला.

## प्रकरण १२ वें.

## पुनर्मीलन.

If after every tempest come such calms,
May the winds blow till they have wakened death.

*Shakespeare.*

आज पौर्णिमा. परंतु आकाशाकडे पाहिलें तर आज पौर्णिमा असें कोण ह्मणेल? काळ्याकुट्ट मेघांनीं आज आकाश भरून गेलें होतें. संपूर्ण जगतावर घोर अंधकार पसरला होता. मधूनमधून कडकडणारी वीज आपल्या उग्र प्रकाशानें क्षणभर त्या अंधकारालाहि झुगारून देत होती; परंतु तें तितक्याच पुरतें. तो विद्युत्प्रकाश नाहींसा होतांच पुन्हा लागलाच पूर्वींपेक्षांहि घनघोर अंधकार होई. मुसळधार पाऊस पडत होता. शेतें, रस्ते, घाट पाण्यांत बुडून गेले होते. गांवांत देखील जिकडेतिकडे पाणीच पाणी होऊन गेलें होतें. क्षणोक्षणीं पावसाचा जोर वाढतच होता. राहूनराहून वायु प्रचंड वेगानें वहात होता. वाऱ्याचा फडफडाड आणि त्यांतच मधूनमधून होणारा मेघांचा गडगडाट यांनीं दशदिशा दणाणून जात होत्या. विजेच्या कडकडाटानंतर ब्रह्मांड कंपित होऊन त्रस्त होत होतें.

अशा या भयंकर तुफानांत त्या चतुर्वेष्टित दुर्गांतील अंधकार-मग्न बागेंत एका अगदीं एकीकडच्या खोपटामध्यें सरला एकटीच बसून काय बरें करित होती? त्या बालिकेला भयच वाटत नव्हतें कीं काय? त्या घोर अंधकाराचें, भयानक मेघगर्जनेचें तिला कांहींच का वाटत नव्हतें?

छे! आज सरलेला आतां कशाचेंच भय वाटत नव्हतें! तिच्या हृदयांत आज भीतीला जागाच नव्हती. तिच्या सुखाची आशा—तिच्या जीविताची आशा आज नष्ट झाली होती. आशाच ज्याला राहिली नाहीं त्याला भयतरी कसलें आलें आहे? आपल्या प्रखर

तेजानें आकाशांत क्षणोक्षणीं चमकणाऱ्या विजेकडे सरला स्थिर दृष्टीनें पहात होती; त्याचप्रमाणें मधूनमधून होणारी भयंकर मेघगर्जनाहि ती स्वस्थपणें ऐकत होती. इंद्रनाथ पश्चिमदेशांत गेल्याला आज सहा महिने झाले. तो सरलेला विसरूनहि गेला! इकडे त्या चांडाळ शकुनीनें तिचें लग्न दुसऱ्या एकाशीं लावण्याचें निश्चित केलें होतें. सरलेचें हृदय आशाशून्य झालें असल्यास नवल कसलें?

बाल्यावस्थेंतील एक एक गोष्ट यावेळीं तिला आठवूं लागली. महाराजा समरसिंहाची ही एकुलती एक कन्या याच उद्यानांत लहानपणीं क्रीडा करित फिरत असे. कधीं बापाच्या खांद्यावर उभी राहून झाडावरचीं फुलें खुडित असे, तर कधीं आईच्या मांडीवरून उठून फुलपांखरांच्या मागें धावत असे. तीं फुलपांखरें का हिला सांपडणार? तीं केव्हांच उडून जात, आणि मग ही अज्ञान बालिका रडत बसे! या जीवनरूपी उद्यानांतील सर्व आशा, सर्व मनोरथ त्या फुलपांखरांप्रमाणेंच एक एक उडून जात असतात हें त्या अज्ञान बालिकेला त्या वेळीं कोठून समजणार? आज या गोष्टीची सरलेला आठवण झाली.

नंतर तिला रुद्रपुरची आठवण झाली. सहा वर्षें तेथें गेलीं होतीं. त्या क्षुद्र गांवांत एका क्षुद्र झोंपडींत हीं सहा वर्षें गेलीं होतीं. परंतु तीं कितीतरी अनुपम सुखांत गेलीं होतीं? संपत्ती असूनहि सौख्य मिळत नाहीं आणि दारिद्र्यांतहि दुःख होत नाहीं ह्मणतात, तें खोटें नव्हे. सरलेच्या समजाप्रमाणें खरा सौख्याचा काळ काय तो तोच होता. रुद्रपुराचें स्मरण होतांच तिची जिवलग मैत्रीण अमला हिची सहाजिकच तिला आठवण झाली. आतां अमला आपल्याला कधीं भेटेल का? प्रति दिवशीं प्रातःकाळीं ती अमलेबरोबर घाटावर पाणी आणण्यास जात असे; संध्याकाळच्या शांत वेळीं दोघींच्या कितीतरी प्रेमानें गोष्टी होत असत. सुखाच्या वेळीं अमला जवळ असली ह्मणजे सरलेला द्विगुणित सुख होई. दुःखाच्या वेळीं अमलेच्या सांत्वनपर

गोष्टींनीं दुःखाचा विसर पडे. मनाला शांती वाटे. आज ती अमला कोठें आहे? फुलपांखरांसारखीच उडून गेली!

नंतर वनग्रामांतील आश्रमांत रहाणाऱ्या कमलेचें तिला स्मरण झालें. कमलेचें सरलेवर केवढें प्रेम! नंतर याच दुर्गांत भेटलेली विमला तिला आठवली. तीहि सरलेला जीव कीं प्राण करित असे. परंतु त्या दोघीहि आहेत कोठें? त्याहि फुलपांखरांप्रमाणें उडून गेल्या!

आणि इंद्रनाथ! ज्याच्या ध्यासानें आज सहा महिने तिला कांहीं सुचेनासें झालें होतें, ज्याच्या आशेवर आज सहा महिने ती जीव धरून होती, तो इंद्रनाथतरी आहे कोठें? बाल्यावस्थेंत इच्छामतीच्या तीरीं इंद्रनाथाच्या शेजारीं बसून त्याच्या कितीतरी गोष्टी सरलेनें ऐकल्या असतील. एकाग्रदृष्टीनें त्याच्या मुखाकडे पहात रहाण्यांत कितीतरी वेळ घालविला असेल. तारुण्याच्या प्रारंभीं ज्याच्या प्रेममय मुखकमलाचें ती सदैव चिंतन करित बसावयाची, चिंतन करतांकरतां ज्याचें दर्शन झालें म्हणजे तिचें हृदय आनंदित व्हावयाचें, तो इंद्रनाथ आज कोठें बरें आहे? रुद्रपुरांतील त्यांच्या झोंपडीसमोर पौर्णिमेच्या रात्रीं इंद्रनाथ सरलेचा मोठ्या प्रेमानें निरोप घेऊन गेला होता; त्या इंद्रनाथाचें पुढें काय झालें? हाय! हाय! तोहि त्या फुलपांखरांप्रमाणेंच सरलेपासून उडून गेला काय? या संसाररूपी अनंत आकाशांत तो भराऱ्या घेत आहे काय?

विचार करतांकरतां सरलेला कांहीं सुचेनासें झालें. तिचें मस्तक दुखूं लागलें; परंतु तिच्या डोळ्यांत अश्रु मुळींच आले नाहींत. तिच्या हृदयांत असह्य यातना होत होत्या. त्यांचें अश्रुजलानें निवारण होण्यासारखें नव्हतें. जोंपर्यंत कांहीं आशा असते तोंपर्यंत हें जीवित दुःसह वाटत नाहीं; परंतु सरलेच्या एकामागून एक अशा सर्व आशा नष्ट झाल्या होत्या. हें जग तिला शून्य झालें होतें. हा संसार तिला घोर

अंधकारमय झालेला दिसत होता. या रंगभूमीवरील एकामागून एक सर्व दिवे विझून गेले होते. तेव्हां आपणहि या रंगभूमीचा त्याग करावा, या आशेनें ती बसली होती.

परंतु जगांत सुखसंपत्तीमध्यें अनेक वेळां विपत्तीचा घाला येतो, त्याचप्रमाणें निराशेच्या भयंकर कचाट्यांतहि अनेक वेळां आशेचा संचार होतो. सरला एकटीच त्या अंधारांत बसली असतां एकाएकीं कांहीं शब्द ऐकूं आल्याचा तिला भास झाला. त्याबरोबर ती त्या खोंपटांतून उठून बाहेर आली आणि चोहोंकडे न्याहाळून पाहूं लागली; परंतु त्या निबिड अंधकारांत तिला कांहींएक दिसेना. एरवीं एखाद्या दिवशीं सरला भीतीनें गांगरून गेली असती; परंतु आज तिच्या हृदयांत भीतीला मुळींच थारा नव्हता.

इतक्यांत वीज चमकली. त्याबरोबर त्या विद्युत्प्रकाशांत सरलेच्या दृष्टीस काय पडलें बरें? सरलेच्या अगदीं समोर, केवळ आठदहा हातांच्या अंतरावर एक मनुष्याची आकृति! आकृति मोठी, बाहुहि लांब, प्रशस्त आणि उन्नत ललाट, वीराला योग्य अशा मंदिलानें मस्तक सुशोभित झालेलें असून कमरेला एक लांब तरवार लटकलेली! ती आकृति, तें मुखकमल, ते उज्वल नेत्र सरलेच्या पूर्ण परिचयाचे होते. क्षणार्धांत भूमीवर पडणारी सरलेची कंपित देहलता सेनापति इंद्रनाथानें वरच्यावर उचलून आपल्या हृदयाशीं धरली.

प्रातःकाळीं इंद्रनाथानें आपल्या नौकेंतील कित्येक शिपाई बोलावून आणिले आणि राजा तोडरमल्ल यांच्या आज्ञेनुसार शकुनीला चतुर्भुज करून तो इच्छापुराकडे निघाला. महाराजहि स्वतः लवकरच इच्छापुरास सुरेंद्रनाथाच्या वाड्यांत यावयाचे आहेत अशी बातमी आली होती. महाश्वेता, सरला आणि विमला अशा तिघी एका नौकेंत बसून निघाल्या. त्याच दिवशीं संध्याकाळीं मंडळी इच्छापुरास सुखरूप येऊन पोहोंचली. इंद्रनाथानें आपल्या पित्याच्या चरणांवर मस्तक ठेवून त्याची चिंता दूर केली.

## प्रकरण ३३ वें.

## इच्छापुरास पुनर्गमन.

When wild war's deadly blast was blown,
And gentle peace returning,
With many a sweet babe fatherless,
And many a widow mourning,
I left the lines and tented field,
Where long I'd been a lodger.

*Burns.*

अनेक दिवसांनीं आज पितापुत्र, सोयरेधायरे परस्परांस भेटल्यामुळें त्यांनां जो अपार आनंद झाला, जें अपरिमित सुख झालें तें का वर्णन करून सांगतां येणार? फारा दिवसांनीं आपला पुत्र सुखरूप परत आलेला पाहून नगेंद्रनाथ आनंदसागरांत पोहूं लागला; पुत्राला वारंवार आलिंगून त्याला आशीर्वाद देऊं लागला.

वनग्रामाहून चंद्रशेखर आपली धर्मकन्या कमला हिला बरोबर घेऊन इच्छापुरास आला. रुद्रपुराहून अमलाहि आपल्या पतीसह येऊन दाखल झाली. राजा तोडरमल्ल येणार आहेत हें ऐकून चोहोंकडून लोक इच्छापुरास येऊं लागले.

इंद्रनाथ ह्मणजेच इच्छापुरचे जमीदार नगेंद्रनाथ यांचा पुत्र सुरेंद्रनाथ होय, हें आतां सर्वांनां समजून आलें! सर्वांनां मोठें आश्चर्य वाटलें. सरला एके दिवशीं इंद्रनाथाला एकीकडे ह्मणाली "आपण कुणातरी गरीब अब्रुदार गृहस्थाचे पुत्र आहां, अशा समजुतीनें मी आजवर आपल्याशीं उघडउघड बोलत आल्यें; आपण जमीदारांचे पुत्र आहां असं जर का अगोदर मला समजतं तर भीतीनं माझं तोंडदिखील उघडलं नसतं!"

इंद्रनाथ हें ऐकून हंसूं लागला. तो म्हणाला "इंद्रनाथाचा सुरेंद्रनाथ झाला, गरीबाचा जमीदार झाला ह्मणून तुझ्या प्रेमांततर

नाहींना अंतर पडणार? जुनें प्रेम का कुणी या अशा नवीन गोष्टींनीं विसरणार आहे?"

सरलेनें कांहींएक उत्तर दिलें नाहीं. परंतु मनांतल्या मनांत ती ह्मणाली "पण तें विसरतां येईलतरी कसं?" लज्जेनें खालीं मान घालून वेगानें ती तेथून पळून गेली.

इंद्रनाथ हा कोणीतरी सामान्य कायस्थाचा पुत्र आहे असें समजून रुद्रपुरास अमला त्याच्याशीं कितीतरी थट्टामस्करी करित असे, कितीतरी हास्यविनोद करित असे! परंतु तोच इंद्रनाथ आतां एका मोठ्या धनाढ्य जमीदाराचा पुत्र आहे असें समजतांच तिला त्याच्या पुढें उभें रहाण्याचीहि लाज वाटूं लागली! मग तोंड वर करून बोलण्याची गोष्ट कशाला? परंतु इंद्रनाथाला हें कोठलें रुचायला? एके दिवशीं कोणालाहि न सांगतां तो एकदम नवीनदासाच्या घरांत शिरला. त्याला असा अकस्मात् आलेला पाहून अमलेनेंहि दीड हात पदर तोंडावर ओढून घेतला!

इंद्रनाथ हें पाहून हंसत हंसत ह्मणाला "आपला पूर्वीचा स्नेह तो हाच वाटतें!"

अमला लज्जित झाली. तथापि तिच्या विनोद करण्याच्या हौसेनें तिला सोडिलें नाहीं. ती पदराच्या आंतून म्हणाली "संभाळा बरं! आपण परक्याच्या घरांत शिरून असे परक्या मुलीशीं बोलतां, हें चांगलं नव्हे! मी सरलेला हें सांगितल्याविना रहायची नाहीं!"

"अबब! अमलाताई, एवढें मात्र करूं नका! पण ताई, इतक्यांतच कां तूं मला परकी मानूं लागलीस? मी तुला परकी समजत नाहीं."

या उत्तरानें अमला ओशाळली. तोंडावरचा पदर दूर करून ती ह्मणाली "मला क्षमा करा, मी आतां तुमच्याशीं अशी वागणार नाहीं." अमलेनें त्या वेळेपासून इंद्रनाथास लाजण्याचें खरोखरच सोडून दिलें.

महाश्वेता ही महाप्रतापी राजा समरसिंहाची विधवा स्त्री होय हें समजल्यावर लोकांनां फारच विस्मय वाटला. महाश्वेता आतां दरिद्री राहिली नव्हती. राजा तोडरमल्लांच्या आज्ञेवरून राजा समरसिंहांची विस्तीर्ण जहागीर आतां तिला देण्यांत आली होती.

सर्वांनां याप्रमाणें सुखी पाहून विमलेलाहि आपल्या दुःखाचा कांहीं अंशीं विसर पडला. सरलेवर तिचें पराकाष्ठेचें प्रेम जडलें होतें. सरला अखेरीस आपल्या पित्याच्या जहागिरीची मालकीण झाली, तो चांडाळ, अधमाधम शकुनि बंदींत पडला, हें पाहून विमलेच्या मनाचे क्लेश कांहीं अंशीं कमी झाले. दुःखाचा तिला विसर पडूं लागला.

सदासर्वदा सचिंत असणारी कमलाहि त्यांच्याजवळच रहात असे. नगेंद्रनाथाच्या घरीं राहून ती दररोज त्याला आपल्या हातांनीं स्वयंपाक करून घाली. त्याची सर्व प्रकारें सेवाशुश्रूषा करी. नगेंद्रनाथहि कमलेवर कन्येप्रमाणें प्रेम करूं लागला.

इच्छापुरांत आनंदोत्सव होऊं लागले. राजा तोडरमल्ल येणार ह्मणून त्यांच्या स्वागतार्थ जिकडेतिकडे धामधूम उडून गेली.

## प्रकरण ३४ वें.

## उपेंद्रनाथ आणि कमला.

She gazed—She reddened like a rose,
Sine pale like only lily;
She sank within my arms and cried,
"Art thou my ain dear Willie?"
"By Him who made you sun and sky,
By whom true love's regarded,
I am the man; and thus may still
True lovers be rewarded."

*Burns.*

सायंकाळची वेळ. कमला एकटीच सहज फिरतांफिरतां इच्छापुराजवळ असणाऱ्या यमुनानदीच्या तीरावर येऊन बसली होती. यमुनेच्या रम्य तटाकीं एकटीच बसून ती सृष्टिसुंदरीचें मनोहर सौंदर्य अवलोकन करूं लागली. घनदाट वृक्षांची रांग लागली होती, त्यांतून काजव्यांचे पुंजच्या पुंज क्रीडा करित होते; आकाशांत मधूनमधून एखाददुसरा शुभ्र मेघ तरंगत होता; नदीच्या शांत पृष्ठभागावर अनेक नौका तरंगत होत्या. राजा तोडरमल्ल इच्छापुरास येणार असल्यामुळें दूरदूरचे लोक तेथें येत होते.

कमला केव्हांहि पाहिलें तरी चिंतामग्न असावयाची; परंतु आज तिची मुद्रा नेहमींपेक्षां अधिक दुर्धर अशा चिंतेनें व्याप्त झालेली दिसत होती. त्या नदीकांठीं बसून शांत आणि एकाग्र दृष्टीनें ती आकाशाकडे पहात होती; आकाशांतील ताऱ्यांची शांत प्रभा तिच्या शांत नेत्रांवर आणि मुखमंडलावर पडत होती. मस्तकावरील मोकळे केश पृष्ठभागावर लोळत होते, आणि कित्येक वायूच्या साह्यानें तिचें मुखकमल कुरवाळून वक्षःस्थलाकडे धाव घेत होते. तळहातावर गाल टेंकून ती बसली होती. कमला आज कसलें बरें चिंतन करित होती?

दुसरें कसलें चिंतन करणार? त्या एकांत स्थळीं तिला साहजिकच गतगोष्टींचें स्मरण झालें. पतीच्या मृत्यूची गोष्ट तिला आठवली. पतीची ती रम्यमूर्ति तिच्या अंतःकरणांत जागृत झाली. पतिप्रेमानें तिचें हृदय उचंबळूं लागलें. सायंकाळच्या मंदमंद वहाणाऱ्या वायूबरोबर पतीच्या कंठांतून निघणारा मधुर संगीतध्वनि ऐकूं येत आहे असें तिला वाटूं लागलें. त्याबरोबर दचकून ती त्या दिशेकडे पाहूं लागली तों एक मनोहर मूर्ति एक सुंदर नौका चालवित आहे आणि आकाशाकडे पाहून उच्च स्वरानें गात आहे, असें तिच्या दृष्टीस पडलें.

कमला एकसारखी तिकडेच पाहूं लागली. हजारों गतगोष्टी तिच्या हृदयांत जागृत होऊं लागल्या. नौकेंतील ती मूर्ति पुन्हा गाऊं लागली. त्या कर्णमधुर संगीतानें कमलेचें हृदय पुन्हा उचंबळूं लागलें. एक घटकाभर ती सारखें तें गाणें ऐकत होती—इतकी ती लुब्ध झाली होती! काय बरें याचें कारण असावें? अशी त्या गाण्यांत काय जादू भरली होती? तें गाणें तिनें पूर्वी ऐकलें होतें. गाण्याच्या प्रत्येक शब्दांतून माधुर्य वहात होतें. प्रत्येक अक्षरांत पूर्वस्मृति ग्रथित होऊन राहिली होती. कमला अगदीं तन्मय झाली. हें स्वप्न आहे कीं सत्य आहे कीं आपली केवळ पूर्वस्मृति आहे, तिला कांहींच कळेना!

इतक्यांत आपल्या शीतल किरणांनीं अखिल जगाचा ताप शमन करणारा भगवान् रजनिनाथ नभोमंडलावर देदीप्यमान झाला. तें निळें आकाश, ती लांबचलांब वृक्षांची रांग, ती कलकल शब्द करणारी यमुना नदी, रम्य चंद्रप्रकाशांत फारच रमणीय दिसूं लागली. ती नौकाहि स्थिर गतीनें जवळजवळ येऊन पोहोंचली. कमला त्या चंद्रप्रकाशांत नौकेंतील मूर्तीचें मुखकमल न्याहाळून पाहूं लागली. पतिव्रता स्त्रीच्या कर्णरंध्रांत पतीचा कंठस्वर सदोदित गुणगुणत असतो. तिच्या हृदयांत पतीची पवित्र मूर्ति सदैव विराजमान झालेली असते. तिला त्याचा कधींहि विसर पडणें शक्य नाहीं. वायूच्या

तडाक्यांत सांपडलेल्या पानाप्रमाणें कमलेची देहलता कंपित झाली. एकाएकीं मूर्च्छित होऊन ती भूमीवर पडली.

थोड्या वेळानें ती शुद्धीवर आली. डोळे उघडून पहाते तों आपल्या जीवितेश्वरानें आपल्याला हृदयाशीं धरिलें आहे, आपल्या ललाटावर तो हळुहळू जलसिंचन करित आहे. तिनें डोळे उघडलेले पहातांच उपेंद्रनाथानें स्नेहभरानें तिच्या कंपित ओष्ठांचें चुंबन घेतलें. दुःखानें पोळलेली कमला पतीच्या स्पर्शानें रोमांचित झाली. तिनें पुन्हा डोळे मिटून घेतले आणि मनांतल्यामनांत ह्मणाली "देवा! हें सारं स्वप्नच का? मला या सुखनिद्रेंतून मुळींच जागी करूं नकोस!"

त्या शुभ्र चंद्रकिरणांत, त्या जनशून्य नदीतीरावर, त्या घनदाट वृक्षश्रेणींसमोर उपेंद्रनाथ पुष्कळ दिवसांनीं पुन्हा दृष्टीस पडलेल्या आपल्या प्रियपत्नीच्या मनोहर मुखकमलाचें अतृप्त नेत्रांनीं पुनःपुनः अवलोकन करूं लागला. तिचें तें सुंदर ललाट, काळ्याभोर भिंवया, प्रेमपूर्ण चिंताप्रकाशक नेत्र, कोमल मधुर ओष्ठ, निबिड कृष्ण केशगुच्छ, उन्नत वक्षःस्थल, गोंडस हात पहातांपहातां उपेंद्रनाथाची वेड्यासारखी अवस्था झाली. हृदयांत प्रतिबिंबित झालेल्या त्या प्रतिमेचें तो पुनःपुनः चुंबन घेऊं लागला. देवतुल्य पतीची प्राप्ति होतांच आपल्यासारखी भाग्यवान् या जगांत कोणी नाहीं, असें कमलेला वाटूं लागलें. अत्यानंदानें पुलकित झालेला तिचा देह तिच्या पतीनें आलिंगनानें बद्ध करून टाकिला. पतीच्या हृदयावर मस्तक ठेवून ती स्वर्गसुखाचा पुनः अनुभव घेण्यांत मग्न झाली.

बऱ्याच वेळानें उपेंद्रनाथ ह्मणाला "कमले! माझी नौका बुडाल्यावर मी मोठ्या शर्थीनें वांचलों; पण तुझी प्राप्ति पुनः होईल अशी कांहीं मला आशा नव्हती. गांवांत परत आल्यावर मला गांवांतील लोकांनीं दुखण्यानें तुझा अंत झाला ह्मणून सांगितलें!"

"आपल्याबद्दलची ती अनिष्ट बातमी ऐकून मी फार दिवस अत्यवस्थ पडल्यें होत्यें खरी, पण शेवटीं बरी झाल्यें. त्या वेळीं मी पिताजी चंद्रशेखर यांच्या वनग्रामांतील आश्रमांत होत्यें."

उपेंद्रनाथ गंभीर स्वरानें ह्मणाला "त्या कृपाळु जगदीश्वरानें आपणां उभयतांचें रक्षण केलें! त्याच्या पवित्र नांवाचें चिंतन कर. कमले! चल, आतां मी तुला तुझ्या सासरीं नेतों!"

"माझं सासर! कुठं आहे तें?"

कमलेला मोठें आश्चर्य वाटलें. उपेंद्रनाथ तिला घेऊन जमीदार नगेंद्रनाथ यांच्या वाड्यांत आला. एकंदर हकीगत जेव्हां सर्वांनां समजली तेव्हां तेथें जो कांहीं आनंदीआनंद झाला, तो सांगतां येत नाहीं! जमीदाराच्या वडील पुत्राचा पुष्कळ दिवसांपूर्वी अंत झाला, असाच सर्वांचा समज होता; परंतु तोच पुत्र आज सुखरूप घरीं परत आला, इतकेंच नाहीं तर लक्ष्मीसारख्या सुनेनें नगेंद्रनाथाचें गृह प्रकाशित केलें, हा सर्व वृत्तांत जमीदाराच्या वाड्यांतून हां हां ह्मणतां सगळ्या गांवभर झाला, आणि त्या गांवांतून आजूबाजूच्या गांवांत पसरण्यालाहि वेळ लागला नाहीं. इच्छापुर नगर जयध्वनीनें भरून गेलें. मोठमोठ्या हवेल्यांपासून तों अगदीं क्षुद्र झोंपड्यांपर्यंत जिकडेतिकडे पताका फडकूं लागल्या. अहोरात्र लोकांच्या आनंदोत्सवांनीं नगर दुमदुमूं लागलें.

वृद्ध नगेंद्रनाथ पुनःपुनः आपल्या वडील पुत्राला आलिंगन देऊन आनंदाश्रु ढाळूं लागला. कमलेवर अगोदरच त्याचें कन्येप्रमाणें प्रेम जडलें होतें. तशांत ती आपली सून आहे हें समजून आल्यावर तर त्याच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं.

घरें, झोंपड्या, घाट, रस्ते सर्व आनंदानें गजबजून गेलीं. जिकडे तिकडे मंगलवाद्यें वाजूं लागलीं. नगरांतील लोकांनीं आनंदानें उपेंद्रनाथावर पुष्पवर्षाव केला. सकाळपासून संध्याकाळपर्यंत नगरांत

जिकडेतिकडे आनंदाच्या लहरी उसळत होत्या. नरनारी आनंदांत दंग झाल्या होत्या.

प्रातःकाळीं सुरेंद्रनाथ–ह्मणजे आपला इंद्रनाथ–वडील बंधूच्या चरणांवर मस्तक ठेवून अश्रुपूर्ण नेत्रांनीं म्हणाला "दादा! मुंगेरीस आपण अज्ञातवासांत असतांना मी आपल्याशीं अश्रद्धेनें वागलों, त्याबद्दल मला क्षमा करावी. मीं आपल्याला ओळखिलें नाहीं. अज्ञानामुळें माझ्या हातून तसें झालें."

उपेंद्रनाथानें भावाला उठवून प्रेमानें आलिंगन दिलें, आणि सद्गदित स्वरानें ह्मटलें "सुरेंद्रनाथ! क्षमा मागण्याची तुला आवश्यकता नाहीं. अरे, या पृथ्वीच्या पाठीवर तुझ्यासारखा भाऊ मिळायचा नाहीं. तुझें साहस, शौर्य आणि युद्धकौशल्य पाहून सर्व बंगदेश आज तुझें यश गात आहे; त्याचप्रमाणें तुझी दया, तुझें प्रजावात्सल्य आणि औदार्य पाहून सर्वांनां मोठा आनंद झाला आहे. ज्यांच्या हातीं संपत्ती आणि सामर्थ्य आहे असे सर्व लोक जर तुझ्यासारखे उदार आणि निष्कपटी होतील तर हा मृत्युलोकदेखील स्वर्गाची बरोबरी करील!"

## प्रकरण ३५ वें.

## शकुनीची चौकशी.

Behold where stands
The usurper's cursed head.

*Shakespeare.*

शेवटीं राजा तोडरमल्ल इच्छापुरांत येऊन दाखल झाले. नगरांतील लोक आनंदानें बेहोष होऊन गेले.

राजांच्या दरबारासाठीं एका विस्तीर्ण मैदानांत एक भव्य मंडप उभारिला होता. जरीची सुंदर वेलबुट्टी काढलेला बहुमूल्य रेशमी चांदवा वर विराजत होता. सुंदर आणि सुगंधी पुष्पांच्या माळा जिकडे तिकडे लोंबत होत्या. पांढऱ्या, तांबड्या, निळ्या, पिवळ्या इत्यादि तऱ्हे-तऱ्हेच्या पुष्पांनीं चांदव्याला अपूर्व शोभा आली होती. खालीं विस्तीर्ण बैठक घातली होती, आणि त्या बैठकीवर इराणांतून आणलेले मनोहर गालिचे पसरले होते. त्या गालिच्यांवर ठिकठिकाणीं काढलेलीं फळें, फुलें आणि वेलबुट्टी हीं इतकीं कांहीं सुंदर आणि हुबेहुब होतीं, कीं त्यांवर एकदम पाय ठेवण्यासहि संकोच वाटे. मंडपाच्या मध्यभागीं एक उच्च आसन मांडिलें होतें. तें आसन हस्तिदंत आणि रुपें यांचें केलेलें असून सुवर्णानें अलंकृत होतें. या आसनाच्या चाऱ्ही बाजूंस मोठमोठे योद्धे आणि जमीदार आपापल्या योग्यतेनुरूप बसले होते. जागोजागीं ठेविलेल्या सुगंधी पुष्पगुच्छांचा परिमल मंडपांत चोहोंकडे पसरला होता. चोहोंकडे बहुमूल्य वस्त्रें परिधान केलेले भृत्य चामरें ढाळित होते. जमीदार, जहागिरदार आणि मोठमोठे योद्धे यांच्या बहुमूल्य पोषाखांनीं आणि रत्नखचित अलंकारांनीं त्या भव्य मंडपास अपूर्व शोभा आली होती.

मंडपाच्या तिन्ही बाजूंस शस्त्रास्त्रांनीं सज्जित असें सैन्य उभें केलें होतें. प्रथम पायदळाच्या रांगा लागल्या होत्या, त्याच्या मागें घोडे-

स्वार नागव्या तरवारी घेऊन उभे होते आणि त्यांच्याहि मागें हत्तींच्या रांगा लागून राहिल्या होत्या. चौथी ह्मणजे समोरची बाजूच कायती मोकळी होती. या बाजूनें मंडपांत जाण्याला एक प्रशस्त मार्ग सोडला होता. राजा तोडरमल्ल यांच्यासाठीं तो मार्ग तांबड्या लाल मखमालीनें मंडित केला होता, आणि त्याच्या दोहों बाजूनें पुनः तसेंच सैन्य उभें केलें होतें. हातांत पताका घेऊन पायदळांतील सैनिक येथें उभे होते आणि त्यांच्यामागें हातांत नागव्या तरवारी घेऊन घोडेस्वार उभे होते.

सूर्योदयानंतर राजा तोडरमल्ल दरबारांत दाखल झाले. ते मंडपाच्या दरवाज्यांत शिरतांच दरबारांतील सर्व लोकांनीं उठून त्यांचा जय-जयकार केला. तो जयघोषाचा ध्वनि बाहेर उभ्या असलेल्या सैन्यांत पसरून सर्व सैनिक 'महाराजांचा जयजयकार असो!' असें उच्च स्वरानें ओरडूं लागले. याप्रमाणें क्रमाक्रमानें तो जयघोष चोहोंकडे पसरून इतका मोठा झाला कीं, दूरदूरच्या गांवींहि तो ऐकूं गेला.

महाराज हळुहळू आसनाकडे चालले होते. त्यांच्या उजव्या बाजूनें नगेंद्रनाथ आणि उपेंद्रनाथ चालत होते, आणि डाव्या बाजूला सुरेंद्रनाथ चालत होता. पाठीमागें आणखीहि कित्येक विख्यात जमीदार व योद्धे हळुहळू चालत होते. महाराज शांत वृत्तीनें आणि प्रसन्न मुद्रेनें आसनावर अधिष्ठित झाले.

त्याबरोबर पुन्हा जयघोष सुरू झाला. रणवाद्यें वाजूं लागलीं. त्या वाद्यांच्या गंभीर आणि सुश्राव्य ध्वनींनें दशदिशा दुमदुमून गेल्या. तीं रणवाद्यें बंद झाल्यावर कित्येक नामांकित वस्तूंचें प्रदर्शन सुरू झालें. दिल्लीश्वराचा सेनाधिपति आणि प्रतिनिधि संपूर्ण बंगदेश पादाक्रांत करून आज इच्छापुरास आला होता. बंगदेशाचा राज्यकारभार चालविण्याकरितां एक हिंदु सेनाधिपति आज आला आहे, ही बातमी दूरवर पसरून बंगदेशांत जेथेंजेथें जी जी आश्चर्यकारक वस्तु होती

ती ती राजांच्या दृष्टीस पडावी ह्मणून तेथें आणण्यांत आली होती. दूरदूरचे नामांकित वाद्यें वाजविणारे तेथें जमले होते. त्यांनीं आपापलीं वाद्यें वाजवून दाखवून दरबारांतील लोकांनां संतुष्ट केलें. विख्यात गवयांनीं आपल्या गायनानें सर्वांचीं मनें तल्लीन करून सोडिलीं. नृत्यांगनांनीं आपल्या अनुपम सौंदर्यानें, नृत्यकौशल्यानें आणि मधुरस्वरानें सर्वांनां मोहित करून सोडलें. जादुगारांनीं जादूचे अद्भुत प्रयोग दाखवून सर्वांनां थक्क करून टाकलें. योद्ध्यांनीं मल्लयुद्धांत आपल्या विलक्षण शक्तीचें आणि युक्तीचें प्रदर्शन करून सर्वांकडून वाहवा मिळविली. धनुर्विद्येंत निपुण असलेल्या वीरांनीं अतर्क्य शरसंधानें दाखवून सर्वांनां विस्मित केलें.

नंतर कवि पुढें सरसावले. बंगाल्यांतील त्यावेळचे सुप्रसिद्ध कवि राजांनां आपल्या गुणांचा परिचय करून देण्याच्या हेतूनें तेथें जमले होते. एकएकानें पुढें येऊन आपल्या कवित्वशक्तीचें प्रदर्शन आरंभिलें. कोणीं युद्धाचें वर्णन करून वीररसानें समस्तांचीं अंतःकरणें उत्तेजित करून सोडिलीं; कोणीं देवादिकांचीं स्तुतिपर काव्यें ह्मणून श्रोत्यांचीं अंतःकरणें भक्तिरसानें तल्लीन केलीं; कोणीं प्रेमरसानें त्यांनां मोहित करूं लागला तर कोणीं करुणरसानें सर्वांनां विव्हळ करून सोडिलें.

याप्रमाणें बराच वेळ गेल्यावर राजा तोडरमल्ल ह्मणाले "आतां हें आटोपतें घेऊन आपण आपल्या मुख्य कार्याला लागूं या. त्या बंदिवानाला समोर घेऊन या."

चौघां शिपायांनीं चतुर्भुज केलेल्या शकुनीला पुढें आणिलें, तेव्हां सुरेंद्रनाथ महाराजांसन्मुख उभा राहिला आणि कठोरस्वरानें म्हणाला "महाराज, महात्मा समरसिंह यांची निराश्रित विधवा आणि अनाथ कन्या यांच्या वतीनें मी या बंदिवानावर असा आरोप ठेवितों कीं, या नराधमानें राजा समरसिंह यांविरुद्ध खोटीं विधानें करून खोटे कागद तयार करून त्यांनां देहदंड करविला. त्याचप्रमाणें दिवाण

सतीशचंद्र यांच्या अनाथ कन्येच्या तर्फेनें मी असें सांगतों कीं, या चांडाळानें सतीशचंद्राचा खून करविला."

शकुनीचा दोष सप्रमाण सिद्ध करण्यास पुराव्याची कमतरता नव्हती. त्याचीं बनावट पत्रें राजा तोडरमल्लांच्या हातांतच होतीं. त्यांनीं तीं पुनःपुनः वाचून पाहिलीं. राजा समरसिंह यांच्या नांवानें पठाण सेनाधिपतीला पाठविलेलीं तीं पत्रें होतीं. या पत्रांवरून राजा समरसिंह हे पठाणांशीं दिल्लीश्वराविरुद्ध कारस्थानें करित आहेत असें सिद्ध होऊन त्यांनां देहांताची शिक्षा भोगावी लागली होती. तीं सर्व पत्रें शकुनीच्या हातचीं असून त्यांवर राजा समरसिंह यांची फक्त मोहर केलेली होती. ही मोहरहि शकुनीनें बनावट केली होती, आणि तीहि त्याच्या खोलींत सांपडली होती. तीहि यावेळीं राजा तोडरमल्लांपुढें होतीच.

नंतर गेलीं सहा वर्षें महाश्वेतेनें कशा स्थितींत घालविलीं, शकुनीनें तिचा कसकसा छळ केला, आपल्या नोकरांकडून तिला ग्रामांतून त्या गांवीं कसें पळवून लाविलें, आणि शेवटीं महाश्वेता आणि सरला या दोघींनांहि चतुर्वेष्टित दुर्गांत कैद करून कसें ठेविलें, याबद्दलच्या पुराव्याला मुळींच उणीव नव्हती. शिवाय दिवाण सतीशचंद्र यांच्या खुनाची हकीगत तर खुद्द तोडरमल्लांनां माहितच होती.

राजा तोडरमल्ल सिंहासारखी गर्जना करून संतापून ह्मणाले "दुष्टा, तुझें संपूर्ण आयुष्य पापकर्मांत गेलें आहे; आतांतरी त्या जगदीश्वराचें स्मरण कर. निदान इहलोकींतरी कांहीं तुझ्या पापाला क्षमा नाहीं; परंतु परलोकचीतरी कांहीं व्यवस्था कर."

हें ऐकून शकुनि म्हणाला "महाराज, आतांपर्यंत आपण माझ्या शत्रूंचेंच ह्मणणें ऐकून घेतलें आहे; मला कांहीं सांगायचें आहे तें कृपा करून ऐका आणि मग काय करणें तें करा."

"सांग, सांग," तोडरमल्ल ह्मणाले. "तुला कांहीं सांगायचें असेल तर खुशाल सांग. मात्र फारसा वेळ घालवूं नकोस. कारण, तुझ्या आयुष्याची मर्यादा आतां अगदीं संपत आली आहे."

शकुनि गंभीरस्वरानें ह्मणाला "महाराज, माझा अपराध जरी पूर्णपणें शाबित झाला असला, तथापि मी ब्राह्मण आहें आणि ब्राह्मण अवध्य आहे! आपण हिंदुधर्माचे परम भक्त आहां, हिंदुशास्त्रांत आपण पारंगत आहां; त्या एकंदर हिंदुशास्त्रांचें सार काय आहे? सहस्त्रावधी दोष हातून घडले असले, तथापि ब्राह्मण ह्मटला ह्मणजे तो अवध्यच समजला पाहिजे. मी आज निराश्रित बंदिवान् आहें. जिकडे पहावें तिकडे माझे शत्रूच दृष्टीस पडत आहेत. तेव्हां आपल्या आज्ञेच्या आड येण्यास इथें कोणीहि नाहीं. माझा वध याक्षणीं करण्याची आपली इच्छा असली तर ती आपल्याला सहज पूर्ण करून घेतां येईल; परंतु एवढेंच लक्ष्यांत ठेवा कीं, हें कृत्य शास्त्रविरुद्ध होणार आहे. आज जवळजवळ चारशें वर्षें मुसलमान लोक बंगदेशावर राज्य करित आहेत; हिंदुधर्माचे ते कट्टे द्वेष्टे; परंतु त्यांच्यांतहि ब्राह्मणाचा वध करण्यास कोणी धजला आहे असें मला वाटत नाहीं. आज ईश्वराच्या कृपेनें बंगदेशाला एक परम धार्मिक हिंदु राजा शासनकर्ता लाभला आहे; परंतु शास्त्रविरुद्ध आचरण करून— ब्राह्मणाचा वध करून तो आपल्या कारकीर्दीला प्रारंभ करणार कीं काय? महाराज, आज आपण एखादें पुण्यकर्म केलें तर त्याबद्दल अक्षय्य कीर्तीचा आपल्याला लाभ होईल; परंतु जर का असें पापकर्म करण्यास प्रवृत्त झालां तर कायमची अपकीर्ति मात्र मिळवाल. याचा कांहीं विचार करा. मी निराश्रित बंदिवान्, माझा शिरच्छेद करण्याला ह्मणजे कांहीं अवकाश लागेल असें मुळींच नाहीं; परंतु महाराज, आपल्या निर्मल, निष्कलंक यशोराशीला हा कायमचा कलंक लागेल. माझ्यापासून माझ्या मुलाला, मुलापासून नातवाला याप्रमाणें आपल्या या दुष्कृत्याची माहिती पिढ्यानपिढ्या राहील. राजा तोडरमल्ल यांनीं बंगदेशांत राज्यकारभार चालविण्यास येतांच प्रथम ब्रह्महत्या केली, हें आणखी हजारों

वर्षांनींदेखील लहानलहान मुलें इतिहासांत वाचतील. महाराज, आपण मला शिक्षा सहज करूं शकाल, परंतु त्यामुळें आपला कायमचा दुर्लौकिक होईल, देशदेशांतरीं, युगयुगांतरीं फडकत रहाणाऱ्या आपल्या कीर्तीला अक्षय्य काळिमा लागेल, ब्रह्महत्त्येसारख्या महापातकानें आपलें उज्ज्वल यश कलंकित होईल !"

इतकें बोलून शकुनि स्तब्ध राहिला. त्याचें हें भाषण ऐकून राजा तोडरमल्ल विचारांत पडले. त्यांनीं आपलें मस्तक खालीं घातलें. दरबारांत सर्वत्र शांतता आणि स्तब्धता झाली.

थोड्या वेळानें सादिकखां ह्मणाला " महाराज ! आपण सेनाधिपति; सेनाधिपतीचें कर्तव्य आपण विसरूं नका. त्याचप्रमाणें आपण राज्यकर्ते आहां आणि राज्यकर्त्यांचा धर्म काय आहे हेंहि आपण जाणत आहां. अपराध्याला योग्य शिक्षा झालीच पाहिजे."

राजा तोडरमल्ल कांहींएक बोलले नाहींत.

हें पाहून सुरेंद्रनाथ ह्मणाला " समरसिंह यांच्या विधवा स्त्रीचा आणि अनाथ कन्येचा वाली आतां आपल्यावांचून कोण आहे? महाराज, याचा कांहीं विचार करा आणि त्यांचा छळ करणाऱ्या या दुष्टाला योग्य ती शिक्षा करा. दिवाण सतीशचंद्र यांनीं मृत्युसमयीं आपल्याला विनंति केली आहे ती आपण विसरलां नाहीं ना? त्यांचा खून करणाराला योग्य ती शिक्षा झालीच पाहिजे !"

तरीहि तोडरमल्ल कांहीं बोलले नाहींत.

तेव्हां दरबारांतील दुसरे मोठमोठे लोक ह्मणूं लागले "महाराज, सज्जनांचें पालन आणि दुर्जनांचें दमन करणें हा आपला धर्म आहे. या नराधमाला आपण शिक्षा दिली नाहीं तर कोण देईल?"

तरीहि राजा तोडरमल्ल विचार करित होते.

इतक्यांत मंडपाबाहेर थोड्या अंतरावर मोठा ग
ऐकूं आला. त्याबरोबर सर्व तिकडे पाहूं लागले ...त्या

कुष्ट वर्णाची, उंच, कृश स्त्री मलीन वेषानें मंडपांत धावत आली आणि एक मोठी किंकाळी फोडून धाडकन् जमिनीवर पडली. ती वेडी विश्वेश्वरी होती!

शकुनि हा वेळपर्यंत स्थिरचित्तानें उभा होता; परंतु त्या वेडीला पहातांच त्याच्या हृदयांत धडकी भरली. तो थरथर कांपूं लागला. वेडी किंचित्काळानें उभी राहून बोलूं लागली "महाराज! माझं रक्षण करा! या मेल्यानं माझ्या आईचा खून केला आहे. मीं या माझ्या डोळ्यानं पाहिलं आहे. माझ्या आईची त्या वेळची ती भयंकर मुद्रा अद्यापिहि मला दिसत आहे. महाराज! मी आपणांजवळ न्याय मागण्याकरितां आल्यें आहें."

विश्वेश्वरीचें हें भाषण ऐकून सर्वांनां पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. नंतर तिनें हळुहळू आपली साद्यंत हकीकत सांगितली.

विश्वेश्वरी ही एका गौळ्याची मुलगी होती. तिच्या गांवांत तिच्या आईची सौंदर्याविषयीं ख्याति होती. या सौंदर्यसंपन्न विधवा गौळणी-वर एक ब्राह्मण मोहित झाला, आणि त्या ब्राह्मणापासून त्या गौळणीच्या पोटीं शकुनीचा जन्म झाला.

तो ब्राह्मण जिवंत होता तोंपर्यंत त्यानें त्या गौळणीचें, पूर्वीच्या पतीपासून झालेल्या तिच्या कन्येचें—विश्वेश्वरीचें पाळणपोषण केलें. त्याच्या पश्चात् त्याचें जें कांहीं थोडेंबहुत होतें त्याचा शकुनि मालक बनला. शकुनीला सर्व लोक 'दासीपुत्र' ह्मणून चिडवित असत. त्यामुळें अल्पवयांतदेखील त्याला मनस्वी राग येत असे. आपल्या जन्म देणाऱ्या आईला तो या रागामुळें फार छळी. तिला निष्ठुरतेनें [illegible]वी. वेळेस तिच्यावर हातदेखील टाकण्यास मागेंपुढें पहात नसे. [illegible]पासून [illegible] पुत्राच्या छळणुकीनें तिला असह्य शारीरिक आणि मानसिक पिड्या राहील[illegible] आणि त्यांतच शेवटीं तिचा अंत झाला. विश्वेश्वरी चालविण्यास येतांच [illegible] गेली. आईच्या या भयंकर मृत्यूनें तिच्या

कोंवळ्या मनाला असा कांहीं जबरदस्त धक्का बसला कीं, त्या घटकेपासून ती भ्रमिष्ट झाली. आईच्या मृत्यूचें हें भयंकर पातक पदरीं बांधून शकुनीनें नंतर देशत्याग केला आणि आपण अनाथ ब्राह्मणपुत्र आहों असें सांगून शेवटीं तो दिवाण सतीशचंद्राच्या घरीं राहिला.

प्राणाच्या भयानें विश्वेश्वरी जी पळाली ती देशदेशांतरीं अनेक दिवस लपूनछपून भटकत राहिली; परंतु शेवटीं ज्या दिवशीं महाश्वेता आणि सरला या दोघींनां शकुनीनें वनग्रामांतून नेऊन चतुर्वेष्टित दुर्गांत बंदिवान् करून ठेविलें, त्याच दिवशीं विश्वेश्वरीलाहि पकडून आणून त्याच दुर्गांत बंदींत टाकण्यांत आलें. आपल्या हीन कुलाची हकीगत तिच्या तोंडून कोणाला समजूं नये, ह्मणून शकुनीनें तिला इतके दिवस त्याच दुर्गांत मोठ्या बंदोबस्तानें ठेविलें होतें.

आतां स्वतः शकुनीच बंदिवान् झाल्यामुळें विश्वेश्वरी बंदिखान्यांतून सुटून आली होती; परंतु बंदींत असतांना तिला अशा कांहीं निर्दयतेनें वागविलें होतें आणि तिचे असे कांहीं हाल केले होते कीं, तिचा आतां फक्त अस्थिपंजर काय तो शिल्लक राहिला होता. तिला प्रत्यक्ष पाहून आणि तिचा हा हृदयद्रावक वृत्तांत ऐकून दरबारांतील सर्व लोक क्रोधानें जळफळूं लागले.

आतां वांचण्याची कांहींच आशा राहिली नाहीं, हें शकुनि समजून चुकला; आणि त्याबरोबर त्या दृढप्रतिज्ञ आणि प्रसंगावधानी शकुनीनें शेवटचा उपाय अमलांत आणिला. संतापातिशयानें सर्व लोक दांतओंठ चावित आहेत असें पाहून त्यानें लपवून ठेविलेली कट्यार बाहेर काढिली आणि सर्वांसमक्ष ती आपल्या छातींत खुपसून घेतली. छिन्न झालेल्या वृक्षाप्रमाणें शकुनीचा मृतदेह धाडकन् जमिनीवर पडला!

## प्रकरण ३६ वें.

## मुद्रिका.

Why let the sticken deer go weep,
The hart ungalled play,
While some must watch, while some must sleep,
Thus runs the world away.

*Shakespeare.*

मागील प्रकरणांत सांगितलेली गोष्ट घडल्यानंतर कांहीं दिवसांनीं राजा तोडरमल्ल हे इच्छापूर सोडून परत गेले. आपल्या संपूर्ण जहागिरीचा भार आतां आपल्या पुत्रांनीं वहावा अशी नगेंद्रनाथास सहाजिकच इच्छा झाली, आणि त्याप्रमाणें उपेंद्रनाथानें इच्छापुरच्या जहागिरीचा भार स्वीकारिला. सुरेंद्रनाथ चतुर्वेष्टित जहागिरीचा कारभार पाहूं लागला. लवकरच सुरेंद्रनाथाचा सरलेबरोबर मोठ्या समारंभानें विवाह झाला, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. त्याचें प्रजावात्सल्य आणि औदार्य पूर्वीप्रमाणेंच आतांहि दृग्गोचर होऊं लागलें. गुप्त वेशानें गांवोगांवीं फिरून प्रजेची स्थिति समक्ष समजून घेऊन यथा-साध्य त्यांची उन्नति करण्यास झटण्याचा त्याचा पूर्वक्रम आतांहि चालू झाला.

आपला जुना मित्र वृद्ध नवीनदास याला सुरेंद्रनाथानें आपला दिवाण केला. रुद्रपुरांत वेड्या विश्वेश्वरीनें नदीच्या घाटावर अमलेचा हात पाहून जें भविष्य सांगितलें होतें तें खरें झालें. अमला खरो-खरच दिवाणाची पत्नी झाली! अमला सरलेवर पूर्वीप्रमाणेंच भगिनी-सारखें अकृत्रिम प्रेम करित होती, त्याचप्रमाणें आपला फार दिवसांचा बंधु 'इंद्रनाथ' याजबरोबरहि पूर्वीप्रमाणें मोकळ्या मनानें थट्टामस्करी करण्याचा तिचा क्रम चालूच होता, हें सांगावयास नकोच.

हें आमचें कथानक येथेंच समाप्त करण्याची आमची इच्छा होती; परंतु या जगांत सर्वांच्याच दैवीं सुख लिहिलेलें नसतें; कोणाच्या कपाळीं सुख तर कोणाच्या कपाळीं दुःख भोगावयाचें असतें. या सृष्टिनियमानुसार आम्हांलाहि एकदोन दुःखाच्या गोष्टी सांगितल्याविना गत्यंतर नाहीं.

पतिवधाबद्दल सूड घेण्याची प्रबल इच्छा महाश्वेतेचें जीवनसर्वस्व होऊन राहिली होती, हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. वृद्धावस्थेंतील गेलीं सहा वर्षें तिचीं ज्या दुर्धर चिंतेंत गेलीं, तीच चिंता तिच्या जीवनाची प्रतिकृति होऊन राहिली होती. त्याच चिंतेवर तिचें जीवन अवलंबून होतें. आतां ती चिंता दूर झाली, अर्थात् तिच्या जीवनाची ग्रंथी शिथिल झाली. सरलेच्या विवाहानंतर कांहीं दिवसांनीं कांहींएक रोग किंवा कसलेंहि दुःख झाल्याविना महाश्वेता स्वर्गलोकीं चालती झाली.

आणि विमला! उन्नतचरित्र, धर्मपरायण, रूपलावण्यसंपन्न अशा त्या विमलेचें काय झालें? ज्या दिवशीं विमलेचा पिता निवर्तला, त्याच दिवशीं तिचें हृदय शून्य झालें, तिला पृथ्वी ओस झाली, संपूर्ण जगत् अंधकारमय झालें. त्या दिवसापासून तिला कसलीहि आशा राहिली नाहीं, कसलाहि भरंवसा राहिला नाहीं, कसल्याहि सुखाची अणुमात्र अभिलाषा राहिली नाहीं आणि कसल्याहि दुःखाचें भय राहिलें नाहीं. ज्या मायापाशांत सांपडून समस्त मानवजातीला या जगांतील अनेकविध सुखदुःखें अनुभवावीं लागतात, विमलेचा तो मायापाशच मुळीं तुटला होता.

आपली प्रियमैत्रीण सरला हिचा विवाह होतांच विमला वनग्रामांतील महेश्वराच्या मंदिरांत जाऊन राहिली. तिनें चतुर्वेष्टित दुर्गांतच वास्तव्य करावें, ह्मणून सुरेंद्रनाथानें तिला पराकाष्ठेचा आग्रह केला; सरलेनें आपल्या प्रियसखीचा प्रेमानें हात धरून तिला आपल्या

गोड शब्दांनीं नानाप्रकारें विनविलें, नानाप्रकारें तिचें मन वळविण्याचा यत्न केला; परंतु व्यर्थ. विमला हंसतहंसत ह्मणाली "अग वेडे! संसारांत पडून क्रीडाकौतुक करायचे माझे दिवस संपले; आतां मला आपली जाऊं दे कशी. तुह्मी सुखानं संसार करतां असं ऐकलं ह्मणजे माझं समाधान झालं; मला असा भलताच आग्रह करण्याच्या भरीस तुह्मी पडूं नका."

नाइलाजास्तव सुरेंद्रनाथानें आणि सरलेनें तिला जड अंतःकरणानें निरोप दिला.

विमला वनग्रामांतील महेश्वराच्या मंदिरांत येऊन राहिली. तिनें शुभ्र वसनें परिधान केलीं; कंठांत रुद्राक्षमाळा धारण केल्या. अहोरात्र महेश्वराचें चिंतन आणि गांवांतील दरिद्री, दुःखी स्त्रियांची जिवापाड जोपासना, या पुण्यकृत्यांत ती आपल्या आयुष्याचा काळ घालवूं लागली.

महंत चंद्रशेखर या पुण्यव्रती तापसीला 'माई' ह्मणून हांक मारित असत. त्यांच्या आश्रमांत रहाणारे सर्व लोक तिचा मायाळूपणा वात्सल्य आणि परोपकारबुद्धि पाहून तिजवर पराकाष्ठेची भक्ति करूं लागले, तिला पूज्य मानूं लागले. त्या आश्रमांत विमलेचा काळ पुण्यकृत्यांत आणि पवित्र सुखांत जाऊं लागला.

याप्रमाणें कित्येक महिने निघून गेले. एके दिवशीं सरला आपल्या प्रिय मैत्रिणीचें दर्शन घेण्याच्या हेतूनें आली. महेश्वराच्या मंदिरांत येतांच प्रथम तिनें महंत चंद्रशेखर यांनां नम्रपणें प्रणिपात केला; नंतर योगिनीचा वेष धारण केलेल्या विमलेचा हात धरून स्नेहभरानें ती ढळढळां रडूं लागली. विमलेचाहि कंठ सद्गदित झाला. महंत चंद्रशेखर यांचे डोळेदेखील भरून आले. बराच वेळ कोणी बोललें नाहीं. शेवटीं आपले अश्रु पुसून सरला ह्मणाली "ताई, आमच्या पडत्या काळीं, आमच्या विपत्तीच्या दिवसांत तूं आमच्यावर जें अ... प्रेम केलंस त्याबद्दल कधींतरी आह्मांला उतराई होतां येईल ...

तुझ्यासाठीं कांहींतरी करावं असा मोठा हेतु धरून मी आज आल्यें आहें. नाहीं का ताई मला कांहीं करतां येण्यासारखं?"

शांतनयना, शांतवदना विमला स्मित हास्य करून ह्मणाली "सरले, तूं मोठी प्रेमळ आहेस. तुझं सर्व शरीर मूर्तिमंत प्रेमानं भरलेलं आहे. पण बाईग, मला आतां त्या तसल्या प्रेमाचं प्रयोजन काय? या शांत आणि एकांत आश्रमापेक्षां अधिक सुखकर असं स्थान या पृथ्वींत दुसरं आहे कुठं? पिताजी चंद्रशेखर यांच्यापेक्षां अधिक स्नेहपरायण आमच्यांत तरी कुणी कुठं मिळणार आहे? दुःखाच्या वेळीं, चिंतेच्या प्रसंगीं स्वतः देवाधिदेव महादेव माझं सांतवन करतो. त्याच्या इच्छेनुसार वर्तन ठेवल्यास मला या जगांत कधींहि क्लेश भोगावे लागणार नाहींत; उलट अधिकाधिक शांतिसौख्य प्राप्त होत जाईल."

दोघी मैत्रिणींनीं अनेक प्रकारच्या गोष्टींत तो दिवस आनंदांत घालविला. त्या आश्रमांतील जीं जीं स्थळें सरलेच्या आवडीचीं होतीं त्या त्या स्थळीं विमला तिला बरोबर घेऊन ती गेली.

संध्याकाळीं विमलेचा दुःखतानःकरणानें निरोप घेऊन सरला आपल्या घरीं परत जाण्याकरितां शिबिकेंत बसली. विमलाहि बोलत बोलत शिबिकेपर्यंत आली होती. ती हंसून ह्मणाली "सरले, अग आतां तूं राजाची राणी आहेस! या आश्रमांत रहाणाऱ्या माझ्यासारख्या गरिबाची आतां आठवणतरी राहील ना?"

विमला हें केवळ थट्टेनें बोलली होती. परंतु सरलेच्या नेत्रांत मौक्तिकबिंदु चमकूं लागले. सद्गदित होऊन ती ह्मणाली "हें काय तुझं बोलणं ताई! तुला मी कधींतरी विसरेन?"

"सरले, ह्मणूनच मी ह्मणत्यें बरं कीं तूं ह्मणजे मूर्तिमंत प्रेमाची पुतळी आहेस! तूं मनांत आणलंस तरीदेखील मला विसरणार नाहींस. तथापि मी तुला कांहीं स्मरणचिन्ह देत्यें, त्याला नाहीं ह्मणूं नकोस."

असें ह्मणून विमलेनें आपल्या गळ्यांतील माळेंतून एक सुवर्णमुद्रिका हळूच बाहेर काढिली आणि ती सरलेच्या बोटांत घातली. हें पाहून सरला विस्मित होऊन ह्मणाली "हें काय ताई? ही सुवर्णमुद्रिका आहे! ही नाहीं गडे घ्यायची मी. तुझ्या बाबांच्या वेळची एखाददुसरी वस्तु कुठं तुजजवळ राहिली आहे ती मीं घ्यावी हें चांगलं दिसतं का? तुजजवळ राहिल्यानंच ती चांगली शोभते."

विमलेला हसूं आलें. ती ह्मणाली "तूं अगदींच वेडी कशी सरले! अग नीट पहा, ही कांहीं बाबांची मुद्रिका नाहीं आणि हिच्यावर माझा मुळींच हक्क नाहीं. सुदैवानं तो हक्क तुला लाभला आहे. आजन्म ही मुद्रिका तूं धारण कर. जगदीश्वर तुह्मां उभयतांनां सुखी राखो! ये आतां हो!"

